1606

# कर्तव्यसुख

अथवा

## संसारसुख.

हा ग्रंथ.

दी राइट ऑनरेबल सर जॉन ल्बक

[illegible]

जे हल्लीं लॉर्ड एव्हबरी ह्या बहुमानपदानें
विभूषित झाले आहेत,

ह्यांच्या

"The Pleasures of Life" ह्या ग्रंथाधारें

**कृष्णाजी परशुराम गाडगीळ**

यांनी लिहिला

आवृत्ति दुसरी

लिहविणार आणि प्रकाशक

**बळवंत गणेश दाभोळकर**

पुणें

शकवर्ष १८२३—इ० सन १९०१.

# आतांपर्यंत प्रकाशित झालेले
## माझे उपयुक्त ग्रंथ

१. **नीतिशास्त्राचीं मूलतत्त्वें**—हर्बर्ट स्पेन्सर ह्यांच्या "The Data of Ethics" ह्या ग्रंथाच्या आधारानें प्रो० **चिंतामण गंगाधर भानु**, बी. ए. ह्यांकडून लिहविला.—प्रती शिल्लक नाहींत

२. **न्यायतत्त्वें**—सदरप्रमाणें "Justice" ह्या ग्रंथाच्या आधारानें. किंमत २ रुपये; टपालहंशील ३ आणे.

३. **ज्योतिर्विलास** अथवा **रात्रीची दोन घटका मौज**—रा० रा० **शंकर बाळकृष्ण दीक्षित** ह्यांकडून लिहविला.—प्रती शिल्लक नाहींत.

४. **संसारसुख**—दी राइट ऑनरेबल सर **जॉन लबक** एम्. पी. ह्यांच्या "The Pleasures of Life" ह्या ग्रंथाच्या आधारानें रा० सा० **कृष्णाजी परशुराम गाडगीळ** ह्यांकडून लिहविला. आवृत्ति दुसरी किंमत १॥ रुपये; टपालहंशील ३ आणे.

५. **शास्त्ररहस्य**—रा० रा० **ना० ल० फडके**, बी. ए.; रा० रा० **शं० बा० दीक्षित**; प्रि० **म० शि० गोळे**, एम्. ए.; प्रो० **वि० बा० भाटे**, बी. ए.; प्रो० **धों० के० कर्वे**, बी. ए.; रा० सा० **कृ० प० गाडगीळ**; प्रो० **चिं० गं० भानु**, बी. ए.; रा० रा० **ह० ना० आपटे** व रा० रा० **रा० भि० जोशी** ह्या नऊ विद्वानांकडून निरनिराळ्या ९ विषयांवर निबंध लिहवून एकत्र तयार केला.—प्रती शिल्लक नाहींत.

६. **आत्मनीतीचीं तत्त्वें** आणि **परोपकार**—हर्बर्ट स्पेन्सर ह्यांच्या "The Ethics of Individual Life" व "Beneficence" ह्या ग्रंथांच्या आधारानें यथाक्रम रा० रा० **नारायण लक्ष्मण फडके**, बी. ए. व प्रो० **धोंडो केशव कर्वे**, बी. ए. ह्यांकडून लिहवून एकत्र केला.—प्रती शिल्लक नाहींत.

७. **नीतिशास्त्राचे सामान्य सिद्धान्त**—हर्बर्ट स्पेन्सर ह्यांच्या "The Inductions of Ethics" ह्या ग्रंथाच्या आधारानें प्रो० धोंडो केशव कर्वे, बी. ए. ह्यांकडून लिहविला.–किंमत १॥। रुपये; टपालहंशील ३ आणे.

८. **धर्ममीमांसा–नैसर्गिक धर्म** आणि **भौतिक धर्म**—भट्ट मोक्षमूलर ह्यांच्या "Natural Religion" व "Physical Religion" ह्या ग्रंथांच्या आधारानें रा० रा० शंकर बाळकृष्ण दीक्षित ह्यांकडून लिहविला.–किंमत २॥ रुपये; टपालहंशील ३ आणे.

९. **राजनीतीचीं मूलतत्त्वें** (भाग १)—हेनरी सिजविक ह्यांच्या "The Elements of Politics" ह्या ग्रंथाच्या आधारानें रा० रा० वासुदेव बळवंत पटवर्धन, बी. ए. व प्रो० धोंडो केशव कर्वे, बी. ए. ह्यांकडून लिहविला.–किंमत २॥ रुपये; टपालहंशील ३ आणे

१०. **अज्ञेयमीमांसा** (स्पेन्सरचरित्रासह)—हर्बर्ट स्पेन्सर ह्यांच्या "First Principles" ह्या ग्रंथाच्या "The Unknowable" भागाच्या आधारानें रा रा० नारायण लक्ष्मण फडके, बी. ए. ह्यांकडून लिहविला.—किंमत १॥। रुपये; टपालहंशील ३ आणे.

११. **धर्ममीमांसा–पितृमूलक धर्म** आणि **आध्यात्मिक धर्म**—भट्ट मोक्षमूलर ह्यांच्या "Anthropological Religion" व "Psychological Religion" ह्या ग्रंथांच्या आधारानें रा० रा० शंकर बाळकृष्ण दीक्षित ह्यांकडून लिहविला.-किंमत २॥ रुपये; टपालहंशील ३ आणे.

१२. **जीवनशास्त्राचीं सामान्य तत्त्वें** (पुस्तक १)—रा० रा० विठ्ठल बाळकृष्ण भाटे, बी. ए., फर्ग्युसन कॉलेजांतील "प्राणिशास्त्र आणि वनस्पतिशास्त्र" ह्या शास्त्रांचे प्रोफेसर ह्यांकडून स्वतंत्रग्रंथरूपानें लिहविला.—किंमत १॥। रुपये; टपालहंशील ३ आणे.

१३. **ज्ञेयमीमांसा** (पूर्वार्ध)—हर्बर्ट स्पेन्सर ह्यांच्या "First Principles" ह्या ग्रंथाच्या "The Knowable" भागाच्या पूर्वार्धाच्या आधारानें रा०

रा० नारायण लक्ष्मण फडके, बी. ए. ह्यांकडून लिहवि-ला.—किंमत २॥ रुपये; टपालहंशील ३ आणे.

१४. भारतवर्षीय भूवर्णन (प्राचीन)—रा० रा० शंकर बाळकृष्ण दीक्षित ह्यांनी लिहिला. किंमत १॥। रुपये टपालहंशील ३ आणे.

१५. ज्ञेयमीमांसा (उत्तरार्ध)—हर्बर्ट स्पेन्सर ह्यांच्या "First Principles" ह्या ग्रंथाच्या "The Knowable" भागाच्या आधाराने रा० रा० नारायण लक्ष्मण फडके, बी. ए. ह्यांकडून लिहविला.—किंमत २॥ रुपये; टपालहंशील ३ आणे.

१६. जीवितकर्तव्य अथवा संसारकर्तव्य—दी राइट ऑनरेबल लार्ड एव्हबरी ह्यांच्या "The Use of Life" ह्या ग्रंथाच्या आधारें रा० रा० दत्तात्रेय नारायण नावर, बी. ए., एलएल. बी. ह्यांनी लिहिला. किंमत १॥। रुपये; टपालहंशील ३ आणे.

## कायम वर्गणीदार आणि त्यासंबंधानें माहिती

प्रतिवर्षी दोन नवीन ग्रंथ मी प्रसिद्ध करित असतों: एक साधारणपणें मे-जून महिन्यांत व दुसरा नवंबर-डिसेंबरांत. हे ग्रंथ अर्वाचीन शास्त्रांवर, विद्वानांस श्रमांचा मोबदला देऊन, भाषांतररूपानें अगर स्वतंत्रग्रंथरूपानें मी मुद्दाम लिहवितों. आतांपर्यंत निरनिराळ्या शास्त्रांवर विद्वानांकडून १६ मराठी ग्रंथ मी लिहविले व प्रसिद्ध केले. शास्त्रीय ग्रंथ बहुधा कोणासहि रुक्ष व नीरस वाटणार असतां, इतके ग्रंथ मी प्रसिद्ध केले कसे, हें खरोखर आश्चर्य वाटण्यासारखें आहे. परंतु सुशिक्षित व समंजस माणसांच्या मदतीचें, आणि माझ्या अल्पसंतोषाच, सतत उद्योगाचें व दीर्घ परिश्रमाचें हें फल आहे. मजकडून प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक ग्रंथाच्या अमुक प्रती घेत जाऊं अशाबद्दल आजरोजी सुमारें ५०० सभ्य गृहस्थांचें मजजवळ लेखी वचन आहे. आणि जोंपर्यंत त्यांत कमतरता ये-

णार नाहीं तोंपर्यंत आणखी कांहीं ग्रंथ लिहवीन व प्रसिद्ध करीन अशी माझी उमेद आहे. कायम वर्गणीदार असलेल्यांखेरीज ज्या कोणांस ह्या उद्योगास मदत करणें योग्य वाटेल व सोय असेल त्यांस पुढीलप्रमाणें नियमांनीं कायम वर्गणीदार होतां येईल.

( १ ) प्रत्येक ग्रंथाच्या अमुक प्रती घेण्याबद्दलचें लेखी वचन असावें.

( २ ) आवडीप्रमाणें अमुक विषयाचा ग्रंथ हवा अगर अमुक विषयाचा ग्रंथ नको. असें म्हणतां यावयाचे नाहीं. प्रसिद्ध होत जाईल त्या प्रत्येक ग्रंथाच्या वचन दिल्याप्रमाणें तितक्या प्रती स्वीकारल्या पाहिजेत.

प्रत्येक ग्रंथाची किमत १॥ किंवा २ रुपये असते. म्हणजे वर्षाचे काठीं ३ किंवा ४ रुपये किमतीचे ग्रंथ प्रसिद्ध होतात. आणि पुढें प्रसिद्ध होणाऱ्या ग्रंथाची तपशीलवार माहिती अगोदरच्या ग्रंथांत प्रसिद्ध होते. तसेंच परगांवच्यांस व्हाल्युपेएबलनें व पुण्यांतल्यांस प्रती घेऊन येणाराजवळ किमत द्यावी लागते.

## कायम वर्गणीदारांस फायदा एणेंप्रमाणें आहे:—

( १ ) पुण्यांतील कायमवर्गणीदारांस, अगाऊ वर्गणीदार होणारांकरितां ठरविलेल्या किंमतींत ४ आणे कमी पडतील.

( २ ) परगांवच्यांस टपालहशील व व्हाल्युपेएबल मनीआर्डरचा खर्च पडावयाचा नाहीं.

( ३ ) बाहेरगांवीं ५ प्रती एकत्र घेणारांस टपाल व व्हा. पी. चा खर्च न पडतां ५ प्रतींऐवजीं ६ प्रती मिळतील.

नारायण पेठ, घर नंबर १०१, पुणें सिटी

**बळवंत गणेश दाभोळकर**
प्रकाशक

## सूचना

पुढील ग्रंथ महाराणी व्हिक्टोरिआ ह्यांच्या कारकीर्दीच्या इतिहासाचा आहे. व तो डिसेंबर महिन्यांत प्रसिद्ध होईल.

ब० ग० दाभोळकर.

# प्रस्तावना

" स्वे स्वे कर्मण्यभिरतः संसिद्धिं लभते नरः । "

**—श्रीमद्भगवद्गीता**

जो प्रपंच करील प्रमाण । तोच परमार्थ करील जाण ॥
जो प्रपंची अप्रमाण । तो परमार्थी खोटा ॥ १ "

**—रामदास**

" प्रपंच साधुनि परमार्थाचा लाहो ज्यानें केला ।
तो नर भला भला रे भला भला ॥ "

**—शिवदीन केशरी**

ह्या ग्रंथाची ही द्वितीयावृत्ति आहे. प्रथम सन १८९३ साली श्रीमंत सरकार **सयाजीराव महाराज गायकवाड** यांच्या शिफारसीनें व मदतीनें तो प्रसिद्ध केला होता. त्या वेळीं छापलेल्या प्रती बहुतेक वर्षभरांतच खपल्या व पुढें आजपर्यंत कोठेंहि प्रत मिळेनाशी झाली. आतां नुकत्याच प्रसिद्ध केलेल्या 'संसारकर्तव्या' मुळें ह्या संसारसुखाची अवश्यकता दिसून आली. म्हणून ही पुनरावृत्ति छापिली आहे.

हा ग्रंथ लिहिणारे **कृष्णाजी परशुराम गाडगीळ** हे परलोकवासी आहेत. ते हयात असते तर कदाचित् त्यांनीं कांहीं अल्पस्वल्प दुरुस्त्या केल्या असत्या. आतां तशा दुरुस्त्या करण्याची मि० **नावर** ह्यांस पात्रता आहे. परंतु आमच्या युनिव्हर्सिटीनें हा ग्रंथ यंदां स्कूलफायनलच्या विद्यार्थ्यांस वाचण्याकरितां नेमिल्यामुळें गाडगीळांच्या कृतींत कांहींच बदल न करणें बरें वाटलें. खेरीज

गाडगीळ हे एक सबार्डिनेट जज्ज होते तरी, इंग्रजी अति उत्तम जाणणारे ते मार्मिक विद्वान् होते. तेव्हां त्यांच्या कृतींत बदल करण्यासारखेंहि कांहीं नसलें पाहिजे.

मात्र ह्या आवृत्तींत ही प्रस्तावना मीं नवी लिहिली आहे. संसारकर्तव्यामुळें संसारसुखाची जशी अवश्यकता दिसून आली. तशीच त्या ग्रंथांतील प्रस्तावनेप्रमाणें ह्या ग्रंथासहि प्रस्तावना लिहावी असें मला वाटलें. कारण,

ह्या जगाचें ऐश्वर्य पाहून माणूस निराश होतो, व त्याला ह्या जगांत कांहीं सुख आहे कीं नाहीं? असा मनाशीं विचार होतो. पण सुख म्हणजे काय? दुःख नव्हे तें. एवंच त्याची सापेक्षता आहे. म्हणजे दुःखावांचून सुखाची प्राप्ति नाहीं. तें *दुःख कर्तव्य होय. एकादा श्रीमंत माणूस रोज जिलब्या खाऊन मऊ बिछान्यावर लोळत आहे पण त्यास सुख नाहीं. तोच एकादा गरीब कुणबी कांदाभाकरी खातो व काबाडकष्ट करितो त्यास सुखानें निद्रा येते.

ह्यावरून उघड आहे कीं, सुख म्हणजेच कर्तव्य नव्हे किंवा कर्तव्य म्हणजेहि सुख नव्हे. तर कर्तव्य केल्यानें सुख होतें, व सुख म्हणजे काय हें कर्तव्यानें समजतें जगांत सुखदुःखाची जी जोडी आहे ती हीच होय. ह्या ग्रंथाचें "संसारसुख" नांव होतें तें आतां "**कर्तव्यसुख** अथवा **संसारसुख**" असें करण्यास सदरील विचारच माझ्या मनांत आला.

* Pains of Life म्हणून इंग्रजींत एक ग्रंथ झालेला आहे, त्यांतील विचार सर **जॉन** लबक ह्यांच्या विचारांशीं विरुद्ध असतील असें वाटत नाहीं.

असो; मानवजीविताचीं किंवा संसारांतील कर्तव्यें कोणतीं ह्याचें प्रतिपादन " **जीवितकर्तव्य** अथवा **संसारकर्तव्य** " ह्या ग्रंथांत झालेलें आहे, तेव्हां त्या कर्तव्यांस धरून संसारसुखांविषयीं सर **जॉन लवक्** ह्यांच्या विचारांचा ओघ प्रतिध्वनित होतो तो असा:—

आकाश ' हें अगाध आहे व ' काल ' हा अनंत आहे; परंतु देशकाजांत गढून गेलेल्या माणसास आकाशांतील तारांप्रमाणें त्याच्या नियमबद्ध जीविताची व सत्कार्यांत खर्चिलेल्या घडीची योग्यता कांहीं कमी वाटणार नाहीं. उद्योगानें, सामाजिक वर्तनानें आणि नागरिकत्वानें त्याच्या वेळेचें मोल अमोल होईल.

देशकाजांत गढून जाण्यास वाचन, मनन आणि निदिध्यास ही पूर्व तयारी आहे. त्या वाचनानें होणारें सुख सुहृत्समागमलाभ हें होय. म्हणूनच सर **जॉन लवक्** यांनीं ग्रंथांची प्रशंसा केली आहे. मात्र ग्रंथांच्या म्हणजे सुहृदांच्या समागमाचें सुख संपादन करण्याची दिशा त्यांनीं दाखविली आहे त्या दिशेनें आपल्या आवडीप्रमाणें थोडा बदल करून प्रत्येकास त्याच्या सुहृदांची निवड करावीशी वाटेल तशी करितां येणार आहे. अर्थात् वाचन म्हणजे आत्मशिक्षण आणि आत्मशिक्षण म्हणजेच राष्ट्रीय शिक्षण असल्यामुळें, राष्ट्रीय शिक्षणाविषयीं कर्तव्य बजावणारास सुहृत्समागमलाभानें केवढें सुख होईल ह्याची कल्पना ज्याची त्यासच अनुभवाला येणार आहे.

आतां आपल्या नियमबद्ध आचरणानें देशकाजांत गढून जाणारें व अनंत अशा कालाचें मोल करणारें जें ' द्रव्य ' म्हणजे माणूस त्याच्या स्वतःविषयीं आरोग्य

ह्या कर्तव्यानें होणारें सुख हें प्रवाससुख आणि गृहसुख होय. कारण प्रवास ही 'गति' श्रम उत्पन्न करणारी असून, आपल्या गृहाचे ठायीं मिळणारी विश्रान्ति किंवा ममत्व हें तर अलभ्य होय.

आणखी असें कीं, प्रवास हें कित्येक प्रसंगीं व्यवहार-चातुर्याचें निधान आहे. आणि शास्त्रपठन ही तर द्रव्य-संपादनाची केवळ 'शक्ति' च आहे. शास्त्रपठन म्हणजे पदार्थविज्ञानशास्त्राचें शिक्षण होय, हें तीं ( शास्त्र-पठन, शिक्षण ) प्रकरणें वाचतांना लक्षांत येणारेंच आहे.

एकंदरीनें पाहतां शिक्षण हें ऐहिक सुखसाधनांचें मूळ असून, त्याच्या योगानें मनाचा केवढा विकास होतो हें ह्याच ग्रंथांतील एपिक्टिटसच्या शब्दांनीं लक्षांत आणिल्यास, ह्या संसारांत ऐहिक दृष्टीनें सुखाची मर्यादा कोठवर आहे हें समजण्यासारखें आहे.—

" तुम्हीं टोलेजंग वाडे उभारिले म्हणजे देशाचें हित केलें असें समजूं नका. तुमच्या हातून देशबांधवांचीं मनें उत्कर्ष पावलीं तर देशाची तुम्हीं मोठी सेवा केली. कारण, हलक्या दासांनीं मोठ्या राजवाड्यांत राहण्यापेक्षां, मोठ्या मनाचे लोक झोंपड्यांत असलेले बरे."(पृष्ठ १५१)

हा ऐहिक सुखांचा विचार झाला. पण माणसानें आजपर्यंत जो उद्योग केला आहे त्यामुळें ह्या सुखांनीं त्या-

१. देशाटनं पंडितमित्रताच । * * * * राजसभाप्रवेशः ॥
अनेकशास्त्रार्थविलोकनं च । चातुर्यमूलानि भवन्ति पंच ॥ १

—सुभाषित

२. विद्यानाम नरस्य रूपमधिकं प्रच्छन्नगुप्तं धनं ।

—भर्तृहरि

च्या आत्म्यास शांति, सौख्य किंवा समाधान कधींहि झालेलें नाहीं ( आमच्या भरतखंडांतील तत्त्वज्ञांसंबंधानें तर हें विधान विशेषच लागू पडतें. ) व व्हावयाचेंहि नाहीं. त्याच्या ठिकाणीं कांहीं तरी अज्ञेयाचा किंवा अप्रमेयाचा* नेहमीं भास झालेला आहे. आणि त्याविषयीं श्रद्धेनें माणसाच्या महत्त्वाकांक्षेस पाझर फुटलेला आहे. म्हणून महत्त्वाकांक्षा ही पुढील सद्वृत्तींचें उद्गमस्थान समजून एथून पुढें ह्या ग्रंथाच्या दुसऱ्या भागास म्हणजे संसारसंबंधी पारमार्थिक सुखांच्या विवेकास सुरुवात होते.

श्रद्धा ह्या कर्तव्यानें महत्त्वाकांक्षेस पाझर फुटतो असा भावार्थ वर आलाच. ही महत्त्वाकांक्षा अर्थातच सदाशेची होय. आणि ऐहिक विचारांच्या दृष्टीनें त्या सदाशेला अर्थसंपत्ति ही जरी साधन आहे, तथापि सर्वार्थसिद्धीला शरीरसंपत्ति हीच साधन आहे. कालिदासानें म्हटलेंच आहे कीं. —

" शरीरमाद्यं खलु धर्मसाधनम् ।

तेव्हां पारमार्थिक विचारांच्या दृष्टीनें श्रद्धान्वित सदाशा ह्या कर्तव्यानें होणाऱ्या शरीरसंपत्तीच्या सुखाचा महिमा काय वर्णावा ! दुसरें असें कीं, सदाशेनेंच प्रेमाची उत्पत्ति होते. व तें प्रेम प्राणिमात्रांविषयीं असल्यानें म्हणजे सौजन्यानें कला, काव्य*, संगीत आणि सृष्टिसौ-

* न भूस्वरूपं न जलं प्रकाशं । न वायुरूपं न खमेव ढुंढे ॥
न राजसं सत्त्वतमोयुतं न । नमामि निर्मायिकमप्रमेयम् ॥ १

—गणेश कृष्ण आपटे

* संसारकर्तव्य आणि संसारसुख ह्या दोन्ही ग्रंथांत मुळांतील इंग्रजी पद्यांचें जें कांहीं ठिकाणीं पद्यरूप भाषांतर केलें आहे, तें

दर्य ह्यांयोगें मनाचा उत्कर्ष होऊन, संसारबाधा कशी ती ठावकीच होत नाहीं.

इतकेंच काय पण. सर्वसुखांचें आदिकर्तव्य जें सद्वर्तन त्याच्या योगानें, श्रमांअंतीं आराम अथवा कर्तव्याअंतीं सुख हाच काय तो श्रेष्ठ धर्म बाणून, प्राणिमात्रांच्या उत्कर्षाविषयीं आशा हीच सद्गति किंवा ज्ञानाचे पोटीं आनंद हेंच सुखसमाधान ह्या तत्त्वमसीचा बोध होतो.

एकंदरींत प्रपंचांतच परमार्थ आहे, व प्रपंचसुखांनींच परमार्थसुखाचा लाभ होतो, हा ह्या ग्रंथाचा भावार्थ आहे.

असो; सर जॉन लबक् ह्यांचे हे वरील आशयाचे विचार खरोखरच मोठे रमणीय आहेत, किंबहुना संसारकर्तव्य आणि संसारसुख (The Use of Life & The Pleasures of Life) हे त्यांचे दोन* ग्रंथ म्हणजे संसा-

(मागील पृष्ठावरून)

कित्येकांच्या दृष्टीनें वेडगळपणाचें दिसतें. परंतु काव्य हें उत्कर्षाचें साधन आहे हा विचार केल्यास त्यांचें मत चुकीचें ठरेल.

* "टाइम्स आफ् इंडिआ" वर्तमानपत्राच्या ता० ६ जुलैच्या दैनिकांत पुढीलप्रमाणें आशयाचा मजकूर प्रसिद्ध झाला आहे:—

"......हे विचार आमच्या मनांत येण्यास ३७० पृष्ठांचा बराच सुंदर ग्रंथ कारण झाला. सर जॉन लबक ह्या नांवानेंच जो नेहमीं लोकांत अतिविश्रुत राहणार आहे अशा सरदाराच्या 'यूस ऑफ् लाइफ' नामक ग्रंथाचें त्याच्यांत एक उत्कृष्ट मराठी भाषान्तर आहे. भाषान्तरकार सातार्‍याचे पुढें येणारे तरुण वकील **द० ना० नाबर**, बी. ए., एलएल. बी. हे असून त्यांनीं श्रम घेऊन तें तयार केलें आहे, व पुष्कळ ठिकाणीं तें त्यांस उत्तम साधलें आहे. ......त्याचें नांव जीवितकर्तव्य ठेविलें आहे......त्यांचीं (सर **जॉन लबक् ह्यांचीं**) संसारसुख व संसारकर्तव्य (जीवितकर्तव्य) हीं दोन

राचें एक सुंदर कीर्तनच आहे. व हें त्यांचें कीर्तन लक्षपूर्वक श्रवण करणारांनीं आपणावर होणाऱ्या संस्काराबद्दल त्यांचें आभारीहि असलें पाहिजे. आतां हें खरें आहे कीं. सर जॉन लबक् ह्यांच्या विचारांशीं समान अर्थाचीं वचनें आपल्या संस्कृतप्राकृत ग्रंथांतून प्रत्येक प्रकरणांत मिळालीं आहेत, व शोध करणारास आणखीहि पाहिजे तेवढीं मिळूं शकतील. श्रीमद्भगवद्गीतेंत ज्ञानयोगापेक्षां कर्मयोगाचें प्राधान्य सांगितलेलें वाचकांस माहितच आहे. तसेंच ६ व्या अध्यायांत शरीररक्षणाविषयीं केलेला बोध ह्या ग्रंथाच्या शरीरसंपत्ति ह्या प्रकरणांत व निष्काम कर्मयोगाची छटा सद्गति ह्या प्रकरणांत बरेच अंशीं निदर्शनास येणार आहे. तथापि एकत्र केलेले व साधारण बुद्धीच्या वाचकांस समजण्यासारखे व्यवस्थेशीर मांडलेले विचार सर जॉन लबक् ह्यांच्या ग्रंथांतून वाचावयास मिळत आहेत हें देखील आपण लक्षांत ठेविलें पाहिजे.

बळवंत गणेश दाभोळकर
प्रकाशक.

( मागील पृष्ठावरून )

पुस्तकें अत्यन्त लोकप्रिय झालेलीं आहेत, व तीं चांगल्या उताऱ्यांनीं कोंबून भरलेलीं आहेत......पुण्याचे मि० बळवंत गणेश दाभोळकर ह्यांचे नांवाकडे आह्मी कळकळीनें वळतों. हे प्रकाशक, लहानशा प्रमाणावर आणि दक्षिणा किंवा इतर फंडांची कांहीं एक मदत नसतां खरें शिक्षणाचें काम करीत आहेत......ह्या एकंदर मालेस अत्यन्त यश यावें अशी आह्मी सहजच इच्छा करितों. ”

ह्या मजकुराबद्दल व सदहू अंक मजकडे मुद्दाम पाठवून दिल्याबद्दल एडिटर साहेबांचा मी उघडच आभारी आहें.

# प्रस्तावना



हा ग्रंथ कोणत्या ग्रंथाधारें लिहिला आहे, हें एथें नव्यानें सांगण्याचें कारण नाहीं. परंतु तो कोणतीं धोरणें धरून तयार केला आहे, त्याचें दिग्दर्शन वाचकांचे समजुतीकरितां थोडेंसें तरी केलें पाहिजे. प्रस्तुतच्या ग्रंथांत मूळ ग्रंथांतील विचारसरणी बहुतेक कायम ठेविली आहे. परंतु ठिकठिकाणीं नवीन माहिती व नवीन विचारहि घालण्यांत आले आहेत. एकंदरींनं मूळ ग्रंथ बोधपर असल्यामुळें, आपल्या धर्मांत, व्यवहारांत, रूढ म्हणींत, संस्कृत व प्राकृत काव्यांत जो निरनिराळ्या स्थळीं बोध करण्यांत आला आहे, त्याचा व मूळ ग्रंथांतील बोधाचा जेथे मेळ घालितां आला, तेथे तो घातला आहे. परंतु मूळ ग्रंथाच्या हेतूकडे दुर्लक्ष न होईल अशी ठेववेल तितकी तजवीज ठेविली आहे. ज्या निरनिराळ्या विषयांचें ह्या ग्रंथांत विवेचन करण्यांत आलें आहे, त्यांपैकीं कित्येकांचें पूर्ण हृद्गत, आपल्या व्यवहाररत व जुन्या मतांचे कट्टे अभिमानी, अशा लोकांस समजेल कीं नाहीं याची शंका आहे; म्हणून विषयास लागू अशीं जीं प्राकृत किंवा संस्कृत वचनें माझ्या अवलोकनांत आलीं, तीं त्यांच्या पुष्ट्यर्थ योग्य स्थळीं मीं अधिक घातलीं आहेत.

मूळ ग्रंथांत गद्यपद्यांचे बहुत वेंचे दिले आहेत. त्याऐव-

जीं संस्कृतप्राकृत ग्रंथांत, त्याच भावार्थाचीं जीं वचनें सांपडलीं तीं नमूद केलीं आहेत. परंतु अशीं स्थळें थोडीं आहेत. बहुतेक गद्यपद्य महाराष्ट्र भाषेंत उतरावें लागलें. मूळ पद्यांचीं भाषांतरें नुसता भावार्थ घेऊन केलीं आहेत; तसा गद्याचाहि, थोडीं स्थळें शिवाय करून, भावार्थच घेतला आहे. मूळ ग्रंथाचें भाषांतर करून निर्वाह लागेल असा तो ग्रंथ नाहीं. तो प्रथमदर्शनीं सोपासा भासतो खरा, परंतु अनुभवान्तीं त्याचें खरें ऐश्वर्य उदयास येतें. मूळ ग्रंथाच्या इतर भागांचेंहि सर्वथैव भाषांतर करण्याचे नादीं मीं लागलों नाहीं; परंतु जेथे त्यांचा भावार्थ घेऊन इष्ट हेतुहि साधेल असें वाटलें, तेथे भावार्थावर भागविलें आहे व हा ग्रंथ जितका समजण्यास सोपा होईल तितका करण्याचा मीं अल्पमतीनें यत्न केला आहे. ज्या कल्पना व जे विचार मराठींत उतरावयाचे होते त्यांपैकीं बऱ्याच विचारांची मोड व पद्धत आशिआ खंडांतील लोकांच्या अद्यापपर्यंत परिचयाची झाली नसल्यामुळें, ते विचार मराठींत उतरतांना, कदाचित् ग्रंथास कांहीं थोड्या स्थळीं दुर्बोधत्व आलें असल्यास निरुपाय आहे.

वाचकांस सादर केलेला ग्रंथ मननपूर्वक वाचिल्यास, मनावर चांगलाच संस्कार होतो, हें मी स्वानुभवावरून सांगतों. हल्लीं माझ्यावर सर **जॉन लबक्** यांच्या ग्रंथानें चांगले उपकार केले आहेत. परंतु हाच ग्रंथ दहा वर्षांपूर्वीं मला वाचावयास मिळाला असता तर मी त्यांचा याहूनहि अधिक ऋणी झालों असतों. आपण आपल्या मनोरंजनाकरितां अथवा दुःखित मनाचे समाधानाकरितां कथाकीर्तनें, पुराणें ऐकतों व घरीं शुचिर्भूत होऊन, भगवद्गीते-

सारख्या ग्रंथाचें पठन करून आपल्या मनाची उद्विग्नता घालविण्याचा यत्न करितो. परंतु सर्व ठिकाणीं व सर्व काळीं कथाकीर्तनें ऐकावयास सांपडतात असें नाहीं, व भगवद्गीतेसारखा ग्रंथ पुष्कळांस समजत नाहीं. तेव्हां मधून मधून हल्लींचा ग्रंथ लक्षपूर्वक वाचला तर वाचकांच्या मनाचें समाधान होण्यासारखें आहे असा माझा दृढ समज आहे. कारण हा ग्रंथ म्हणजे अथपासून इतीपर्यंत बोधपर परंतु मनुष्याच्या नेहमींच्या व्यवहारास धरून केलेलें एक सुंदर कीर्तनच आहे. आतां असें सर्व वाचकांचे अनुभवास येईल कीं नाहीं, हा प्रश्न निराळा.

पुणें, सन १८९२.

कृ० प० गा०.

# अनुक्रमणिका



## भाग १



## भाग २

**प्रकरण** **पृष्ठ**

( श्लोक )

" नृपाळाचे गेहीं सकल सुख भोगी नर जरी,
वृथा जन्मा आलों, मज न सुख ऐसा रव करी;
परी रंका वाटे उटजिं हरि दुःखासि नुरवी,
समाधानें ऐसें स्वकिय मन संसारिं रमवी. "

—ट्रेंच

# प्रकरण १

## सुखकर्तव्य

यथा कारी यथा चारी तथा भवति; साधु-
कारी साधुर्भवति, पापकारी पापी भवति.

—बृहदा०

**भावार्थः**—जो जसें काम करितो व आचरण ठेवितो, तो तसा होतो; चांगलें कृत्य करणारा चांगला होतो, पाप करणारा पापी होतो.

परमेश्वरानें आपणास जन्मास घातलें, ही त्याची आपणावर मोठी कृपाच समजली पाहिजे. आपणास समजूं लागलें म्हणजे, आपल्या अस्तित्वाचा प्रधानहेतु काय असावा, हें आपण शोधूं लागतों. 'बहुजनसमाजाचें जितकें करवेल तितकें कल्याण करीत असावें' ह्या अर्वाचीन सिद्धांताचे जे अनुयायी नाहींत, ते देखील, आपल्या बांधवांचे सुखांत घालवेल तितकी भर घालावी हें आपलें कर्तव्य आहे, असें कबूल करितात. परंतु स्वसुखाकरितां आपण परिश्रम करावे कीं नाहीं, याचा बरेच लोकांस भ्रम पडतो. वस्तुतः स्वसुखाचीच नुसती हाव धरणें योग्य नाहीं व अशी हाव धरूनहि सुखप्राप्ति होते असें नाहीं. ह्या संसारांत बहुत सुख होतें; परंतु आपण त्या सुखाचे स्वाधीन झाल्यास आपण आपल्यावर दुःख ओढवून घेतों. "सुख आणि दुःख हे दोन मोठे निष्ठुर व खोटे शास्ते आहेत. यांचा एकदांका आपणावर पगडा बसला, म्हणजे आपल्या पराधीनतेस मर्यादा राहत नाहीं व ते दोघेहि आपला करडा अंमल आपणावर क्रमवार गाज-

१ सेनेका

वितात." तथापि, सुखप्राप्ति करून घेणें हें आपलें कर्तव्य आहे व कर्तव्य केल्यानें सुख होतें, हीं दोन प्रमेयें आपणांस आपले गुरु शिकवितील, तर ही संसारयात्रा चांगली सुखावह होईल. आपल्या आनंदी वृत्तीनें दुसऱ्याचे सुखांत चांगलीच भर पडते; एवढ्याकरितां तरी निदान, राहवेल तितकें आपण आनंदी राहावें. आनंदी स्नेह्यांचा समागम किती सुखावह असतो, ह्याचा सर्वांस अनुभव आहेच. ह्या जगांत राहून राजमंदिरांतील सुख भोगणें अगर नरकयातना सोसणें ह्या दोन्ही गोष्टी आपल्याच स्वाधीन आहेत.

आपलें नशीब लटकें आहे असें मानणें व नसत्या दुःखाची व्यर्थ कल्पना करून घेणें यांतच कित्येकांस सहजरीत्या समाधान होतें. परंतु आपली वृत्ति आनंदी ठेवण्यास बहुत लोकांस प्रयास पडतात. आनंदी राहणें, ही एक इतर कलांसारखी कला आहे. ती संपादन होण्यास आपण कोणी अन्य व्यक्ति आहों, असें समजून आपणांस आपल्यावर पूर्ण नजर ठेवावी लागते व आपल्या वर्तनास इष्ट वळण देण्यास श्रम घ्यावे लागतात.

सुखदुःखांची जगांत एक चमत्कारिक खिचडीच होऊन राहिली आहे. मनुष्य वारंवार—

( ओंव्या )

गतसुखाचा शोक करी, भावी सुखाशा अंतरीं वरी,
अप्राप्ताची हाव धरी, समाधानीं दुःखीं होय.
मनापासुनी जरी हांसे, दुःखछाया वदनीं भासे;
तयाच्या मनोहरगीतीं वसे दुःखद कथाधार कीं !

इंग्रज लोकांची वृत्ति स्वभावतःच खिन्न असून त्यांस आनंदांत निमग्न असतांना जरी पाहिलें, तरी त्यांत देखी-

ल त्यांच्या चर्येवर खिन्नतेची छाया दिसते असें म्हणतात. परंतु खरें पहातां पृथ्वीच्या पूर्वेकडील देशांत राहणाऱ्या लोकांच्या आचारविचारांत खिन्नवृत्ति फार आढळून येते. ओमर खय्यमच्या काव्यांतील ह्या उद्गारासारखा खिन्नतेचा उद्गार कोठे आढळेल ?

( श्लोक )

" जन्मा येउनि अल्पकाळ धरणी मुक्काम केला निका,
तेथें शोक, अनिष्ट, दुःख उलटें जोडीयलें मीं फुका;
फेडाया निज जन्ममृत्यु विरडें गेलों, परी भागलों,
अंतीं खिन्न, निराश होउनि वृथा प्राणांतही पावलों. "

अथवा ही उक्ति किती उदासीनतेची आहे पहाः—

( श्लोक )

" हे भागले पवन मार्गांत दीनवाणा
आराम, शांति, परि त्या न मिळे शिराणी;
ह्या वायुवाणिसम जीवित हें विलाप,
आक्रोश गद्गद करी; झगडे अमूप. "

अशा उद्गारांस जर सत्य मानिलें व हा संसार जर खरोखर कष्टमय असेल, तर ज्या निर्वाण अवस्थेंत चेतना, ज्ञान, वगैरे नष्ट होतात, त्या अवस्थेंत दुःखाचाहि अंत होतो, म्हणून तिचा लोक छंद घेतात, ह्यांत नवल तें कोणतें ?

परंतु अशा गुरूंच्या शिक्षणावर भरंवसा ठेवून व ह्या जगांत दुःखाशिवाय आपल्या वांट्यास दुसरें कांहींच येणें नाहीं असें मानून हताश होऊन बसण्यापेक्षां, ज्या बोधानें नरजन्माचे महत्त्वास साजणारी व मनास उत्साह देणारी अशी सद्गतीची आशा उत्पन्न होते, त्याचें अवलंबन करणें फार चांगलें !

कसेंतरी उदरभरण करून दिवसरात्री कंठणें, म्हणजे जन्मास येण्याचें सार्थक झालें, असें नाहीं. आयुष्याचा आपल्या हातून सदुपयोग घडला म्हणजेच जन्माचें चीज झालें. आपल्या एकंदर हयातींत, आपणास अमकें कर्तव्य आहे, याचा कित्येकांच्या ठिकाणी कधीं निश्चयच ठरलेला नसतो. गंगेस वाहिलेलें फूल ओघानें कोठें जाईल अथवा न जाईल, त्याचा ठाव ना ठिकाण, त्याप्रमाणें कित्येक लोक अव्यवस्थित आयुष्यक्रमण करितात. "कसें तरी जिवंत राहिलें म्हणजे लोकयात्रा पार पडली, असें समजून हातपाय न हालवितां तटस्थ राहणें व उपयोगानें जसें धातु प्रकाशमय होतात तसें आयुष्य क्रमीत असतां मनुष्याचा उत्तरोत्तर भाग्योदय होऊं न देणें यासारखी मनुष्याची दुसरी शोचनीय स्थिति नाहीं."

दीर्घ अथवा अल्प आयुष्य कोणतें, ह्याचा निर्णय वर्षांवरून करावयाचा नाहीं. आयुष्य अल्प कां असेना, परंतु तेवढ्याच अवधींत ज्यानें अनेक विचार, अनेक आचार व अनेक पराक्रम केले, तोच दीर्घायु खरा. अशा दृष्टीनें पाहिलें, म्हणजे हा संसार सुखावह व रमणीय वाटलाच पाहिजे.

जर आपल्या सामर्थ्यानुरूप आपण उद्योग केला, क्षुल्लक अडचणींचा मोठा बाऊ केला नाहीं, वस्तुस्थितीच्या खऱ्या स्वरूपाचें आस्थापूर्वक अवलोकन केलें व आपल्या हाताशीं असलेलीं सुखसाधनें आपलीशीं करून घेतलीं, तर जन्म ही एक परमेश्वराची अमोल देणगीच आहे, असें आपणास वाटल्याशिवाय राहणार नाहीं. का-

१ होमर

रण, हा जगाचा विस्तार आपल्या सेवेकरितां कसा सादर आहे तो पहाः—

( ओंव्या )

" सुखद असे हें जगत मानवसेवा कारणीं रत;
येथें दास असती अनंत, गणना त्यांसी असेना.
मार्गी पायां तुडविली ऐशी अनेक क्षुद्रवल्ली,
रोगें तनू पीडिली तीतें आरोग्यदायक.
हें प्रेम देवाचें ! मनुज एक जगत साचें,
तयाभोंवतीं दुजें नाचे, हुजरियापरी."

—हर्बर्ट

परंतु बहुतेकांस ह्या अलभ्यजन्माचें व परमेश्वराच्या कृपेचें कौतुकच वाटत नाहीं. जो जगद्विस्तार, इच्छा असल्यास, आपल्या अंकित करून घेतां येतो, त्याच्या सौंदर्याची व ऐश्वर्याची त्यांस कल्पना होत नाहीं. 'करणी करे तो नरका नारायण होय' असें आपलें सामर्थ्य असतां, त्याचा त्यांस उमज पडत नाहीं. व दुःख आणि क्लेश यांस जिंकून सुखसमाधानांची जोड करून घेण्यासारखी अंगीं ऐपत असून. ती त्यांस कळत नाहीं. जो मनुष्य हलगरजीपणानें हातीं असलेल्या सुखसाधनांचा सदुपयोग करून घेण्याचें वर्जितो तो महादोषी ठरतो.

( श्लोक )

" मनुज करि सुखाचा व्यर्थ एथे अव्हेर,
पुढिल जननिं त्यातें शोक होई अपार;
विफळ गणुनि जन्मा, वंचिल्या शक्ति ज्यानें
दवडूनि सुख, दुःखा जोडिलें सत्य त्यानें."

—ड्यान्टि

" ह्यां दिव्य जगाचें अलौकिक सौंदर्य नेहमींच्या प्रचारांतलें पडून जातें; म्हणून त्याची आपणास व्हावी तशी आठवण होत नाहीं. कदाचित् झालीच तर त्याविषयीं आपल्या ठिकाणीं कृतज्ञताबुद्धि निपजत नाहीं. परमेश्वर अत्यंत कृपावंत आहे, असा साधुसंत उपदेश करितात खरा; परंतु ज्या साधनांनीं त्याचें प्रेम प्रत्यक्ष व लागलेंच परिचयास येतें, त्यांचा ते उल्लेख करीत नाहींत. क्षुल्लक प्राण्याप्रमाणेंच आपल्या पोटासहि परमेश्वर अन्न, अंगास लत्ताकपडा व देहास आरोग्य देतो असें सांगतात, परंतु त्याच्या कृतींचें वैभव समजण्याचें सामर्थ्य फक्त मनुष्यासच आहे, म्हणून त्याचे आपण ऋणी आहों, असा ते उपदेश करीत नाहींत; एकांतांत बसून परमेश्वरकरणीचें मनन करावें असा बोध करितात, परंतु तीच उघड्या रानावनांत जाऊन पहाण्यास सांगत नाहींत; आत्मसंयमन करण्यास सांगतात, परंतु सुखोपभोग घेणें हें एक मनुष्याचें कर्तव्य आहे, असा उपदेश करीत नाहींत. " खरोखर पहातां असा उपदेश आपल्या गुरूंनीं केलाच पाहिजे. कारण परमेश्वरानें जगताची अशी कांहीं रचना केली आहे कीं, त्यापासून सुज्ञ मनुष्यास सुखच झालें पाहिजे. मग त्या सुखाचा त्यानें अनादर कां करावा ? " रानांत पक्षी गातात, वारे सोंसों करितात व झरे झुळझुळ वाहतात. मनुष्य मनांत घेईल तर ह्या सर्वांची वाणी हें एक परमेश्वरानें कृपाळू होऊन आपल्या मनोरंजनार्थ गीतच निर्माण केलें आहे असें त्यास वाटेल; नाहीं तर, तीच वाणी रडगाणें भासून तो तिचा निषेध क-

१ रस्किन्

रील व तींत व्यक्त होणाऱ्या परमेश्वरकृपेचा अशा रीतीनें तो लोप करून टाकील."

"[1]आपण आपल्या आयुष्याचें सिंहावलोकन केल्यास, सुखसाधनाची आली संधी आपण घालविली, असेंच वारंवार घडलेलें आपणास आढळून येईल." "[2]ज्या मनुष्यास जन्म सुखांत काढितां येत नाहीं, त्यानें जरी देह धारण केला असला तरी ती पिशाचवत् छायाच समजावी." "[3]आपणास दुःख देण्यास आपणाशिवाय दुसऱ्या कोणाची प्राज्ञा नाहीं. जी इजा आपणास होते ती आपल्याबरोबर असते व आपल्या चुकीशिवाय आपलें खरें नुकसान कधीं होत नाहीं."

"[4]सुखोत्पत्तीचीं सर्व साधनें परमेश्वरानें मनुष्याचे स्वाधीन ठेविलीं आहेत." "[5]जें घडून येतें तें यथार्थ येतें, कारण जें जें परमेश्वर घडवितो तें तें शहाणपणानेंच घडवितो. तुला जसें वाटतें तसें घडावें, अशी इच्छा करूं नको. जशा गोष्टी घडतात तशाच घडणें हितकर आहे असें मान, म्हणजे तुझा काळ समाधानांत जाईल. * * * दुसऱ्याच्या वस्तूची त्वां इच्छा केली कीं तुझें तुला नाहींसें झालेंच, असें समज."

परंतु वर नमूद केलेल्या मतांपैकीं बर्नार्डच्या मताप्रमाणें थोडक्याच लोकांचें मत असेल. कारण दुःख, काळजी व रोग हीं आपणास बाह्य कारणांनींहि होतात. आपलीं जिव्हाळ्याचीं माणसें जर आपल्यास आंचवलीं, अथवा त्यांनीं आपल्यावर राग धरिला, किंवा तीं आडमा-

१ हेनरी टेलर  २ सर टी. ब्राउन  ३ सेंट बर्नार्ड
४ मार्कस आरिलिअस  ५ एपिक्टिटस

गोनें गेलीं, तर आपणास दुःख होतें; दुसऱ्यानें आपणास शब्दानें ताडन केलें तर तो दिवस गोड वाटत नाहीं. ज्या लढाईनें स्वदेशाचा चक्काचूर उडाला तिची वार्ता स्वदेश-भक्त हेजेल ह्यास कळली नाहीं, म्हणून लढाईचे दिवशीं-च त्यास आपला एक मोठा ग्रंथ संपूर्ण करितां आला. तीच बातमी त्यास त्या दिवशीं कळली असती, तर तो दिवस त्यानें दुःखांत काढिला नसता काय ? तेव्हां सुख हें सर्वतोपरी आपल्या हातीं आहे असें नाहीं.

आपण आकाशांतील ग्रहांचें अनुकरण करून आ-युष्य क्रमावें. हे—

( ओंव्या )

" अनंत शांतता देखोनी ग्रह न भीती गगनीं
दुजी ईर्शालाला निरखुनी न व्यग्र मनीं ते.
नोहे अन्य गोष्टींचा त्यां हाव, इच्छिती न त्यांचा स्नेहभाव
अथवा तयांचें विभव, निरिच्छ जैसे.
स्वकीयावस्था आदरोनी अन्य कौतुका दुर्लक्षुनी
कार्य करिती मनेंकरुनी निजशक्त्यनुसार.
विश्वचलनी लाविल्या सेवे संतोषूनि क्रमिती पथ भावें;
हेंच जन्मसार्थक्य लेखावें दुजें कोठें नाढळे. "

—म्याथ्यु अर्नोल्ड

( अभंग )

आपुले रे हातीं आपुलें प्राक्तन; घडवूं तैसें ध्यान घडतसे.
संसार ओखटा किंवा रे गोमटा, जो तोचि एकटा करूं जाणे.

वरील पद्यांतील रहस्य जरी कांहीं अंशीं खरें आहे, तरी कोणी समाजास सोडून अलग राहील तर त्याचा नि-भाव लागणार नाहीं. मनुष्याचें अंतःकरण हें स्वभावतःच संगतीचें भुकेलें असून, तें बेटासारखें अलग राहूं शकत

नाहीं आणि त्यास इतर लोकांचा समागम झाल्याशिवाय समाधान होत नाहीं. आपल्या बांधवांच्या हिताहिताकडे दुर्लक्ष करून तो उदासीन व तुटक राहील व त्यांच्या दुःखाचा वांटेकरी होणार नाहीं, तर त्यांचें सुख पाहून होणाऱ्या आनंदास तो आंचवेल.

( ओंव्या )

" दुसऱ्याच्या दुखें दुखावे, दुसऱ्याच्या सुखें सुखावे;
अवघेंचि सुखी असावे, ऐसी वासना.
दुःख दुसऱ्याचें जाणावें, ऐकोन तरी वांटोन घ्यावें;
बरेंवाईट सोसावें, समुदायाचें. "

—रामदास

केवळ स्वार्थाच्या नादीं लागून, परदुःखानें आपल्या मनास कनवाळा कसा तो येऊंच दिला नाहीं, तर संसारांत होणाऱ्या कित्येक शुद्धसुखांस आपण अंतरतों. परदुःख पाहून ज्या हृदयास द्रव येत नाहीं, त्यास सुखप्राप्तीचाहि संभव नाहीं.

आपणावर जीं संकटें येतात तीं नेहमीं खरीं संकटें नसून, त्यांतच आपलें हित असतें. "[1] ज्या आपत्तीचें खरें मर्म आपणास कळलें नाहीं, तिचा अविचारानें खेद मानून तिच्या अंगभूत असणाऱ्या आपल्या हिताकडे आपण दुर्लक्ष करूं नये. " "[2] शरीर व आत्मा ह्यांस एके ठिकाणीं जखडणारे असे सुख आणि दुःख हे दोन खिळे आहेत." दुःख हें भावी संकटाचें सूचक होय. असें नसतें तर आपणास जिवंत राहणेंच दुरापास्त झालें असतें, व आपल्या भोंवतीं सर्वत्र असणारीं सुखसाधनें निश्चयानें आप-

१ सर टी. ब्राऊन २ प्लूटार्क

त्या नाशास कारण झालीं असतीं. ज्यांनीं चांगलें मनन केलें नाहीं त्यांचा ग्रह असा आहे कीं शरीरांतील खोल भाग नाजूक असून, त्यास सुखदुःख त्वरित होतें. परंतु हें खरें नाहीं. शरीरावरील कातडी ही खरोखर नाजूक असून, जवळ आलेल्या दुःखाची एकाद्या पहारेकऱ्यासारखी सदैव सूचना करीत असते; परंतु त्यांतील मांस व इतर अंगें हीं जोंपर्यंत निकोप आहेत, तोंपर्यंत त्यांस सुखदुःखांचें ज्ञान मुद्धां होत नाहीं.

अनिष्टाचें मूळबीज काय, ह्या गोष्टीची आपण चर्चा करितों; परंतु अनिष्टाचें खरें स्वरूप काय, याचा कधींच विचार करीत नाहीं. आपणास जे क्लेश व यातना होतात त्या बहुतकरून अंतीं सुखावह होतात असें आपण म्हणतों; परंतु त्या स्वतःसिद्ध हितकर आहेत, असें क्वचित् समजतों. तथापि हें ज्ञान अनुभवानेंच प्राप्त होतें; तें मनुष्यास सर्वसाक्षी देव बनविल्याखेरीज एकदम होणार नाहीं. मनुष्य जे क्लेश भोगितो, ते त्यास कल्याणप्रद असण्याचा संभव आहे; निदान त्यांचा जो रूढ अर्थ आपण समजतों तसे ते नाहींत.

इच्छिल्या वस्तु जरी आपणास मिळाल्या नाहींत, तरी परमेश्वरास सर्वांची काळजी आहे व तो कोणाचें उणें पडूं देत नाहीं, हें मनांत आणून, आपलें समाधान आपण केलें पाहिजे. कारण,

( अभंग )

“ अन्न देणार श्रीहरी, तोचि प्रतिपाळ करी,
ज्या देवाचे आज्ञेवरी, मेघ वर्षती अंबरीं.

देव तारी, देव मारी, देव सर्व कांहीं करी;
अब्धोदक देवें केलें, त्याणें सर्वांचि निर्मिलें. "

—रामदास

परमेश्वरसत्तेवांचून एक पान मुद्धां हालत नाहीं असें जे लोक मानितात त्यांचा हा विचार झाला; परंतु जे लोक तसें मानीत नाहीत, त्यांस देखील, जगताची राहटी ज्या एकदां घालून दिलेल्या अबाधित नियमांनीं चालते त्या नियमांनींच सरासरी सर्वांचें कल्याणच होतें, असें मानिल्यास समाधान होण्यासारखें आहे.

आपल्यावर दुःख लोटलेंच तर त्यांतच आनंद मानावा.

( श्लोक )

" गणावें दुःखातें स्थिर, अढळ, आनंदभरतें,
तयासंगें व्हावें दृढ, निवळ, उन्नत मन तें;
तसें यावें त्यातें, बल सकल जें क्लेश निवर्वी,
मनीं, ध्यानीं, अंतीं, स्थिरतर विवेका निपजवी. "

—डिव्हेरी

ही लोकयात्रा सर्व सुखकर होईल असें आपणास जरी मानितां आलें नाहीं, तरी निदान ती पुष्कळ अंशीं सुखावह करून घेतां येण्यासारखी आहे. आपल्या विपत्तीस धैर्यानें तोंड दिल्यास तीच शेवटीं कल्याणप्रद होते. "आपणावर गुदरलेलें अरिष्ट आपल्यास हितकर होतें व ज्या ठिकाणीं सुखडाचा अत्यंत विघड होतो तेथेच महाभाग्योदय घडतो." हेमहोल्ड हा एकदां नवज्वरानें बेमार होऊन इस्पितळांत जाऊन राहिला. परंतु तो विद्यालयांतील एक विद्यार्थी असल्यामुळें त्याचें औषधपाणी व खा-

१ सेनेका

णेंपिणें मोफत झालें. इतक्या अवधींत त्याच्या थोड्या ऐपतींतून जी अल्प रक्कम मागें पडली, ती देऊन त्यास एक सूक्ष्मदर्शकयंत्र विकत घेतां आलें व तें हातीं येतांच त्यास ज्ञानाचा छंद लागून तो पुढें नामांकित तत्त्ववेत्ता झाला. जो नवज्वर अनिष्टसा वाटला तोच पुढें हितकर कसा झाला हें या गोष्टीनें वाचकांस चांगलें समजेल.

" सेव्हानरोला नामक जगद्विख्यात पुरुषानें ज्या तापत्रयांत काळ काढिला, त्याहून अन्य अवस्थेंत त्यानें यथास्थित संसार केला असता खरा; परंतु त्याचें नांव इतिहासांत गाजलें नसतें व त्यानें आपल्या आचरणानें मनुष्यमात्रास जो कित्ता घालून दिला आहे, तोहि त्याच्यानें घालवला नसता. परंतु त्याजवर विपत्ति कोसळून त्याचें काळीज दुभंग झालें व दुःखातिशयानें पोळल्यासारखी त्याची वृत्ति खिन्न झाली. जें दुःख त्यास कांट्यासारखें विव्हळ करी, तेंच दुःख त्याच्या अजरामर कीर्तीस व भूषणास कारण झालें. एका स्त्रीवर त्याचें अत्यंत प्रेम बसलें होतें. ती प्राप्त कशी होईल या गोष्टीशिवाय त्यास कांहींच सुचेना. परंतु ज्या वेळेस त्याचा धंदा व रूप पसंत न झाल्यामुळें तिच्या कुटुंबांतील माणसांनीं त्यास ती देण्याचें नाकारिलें, तेव्हां ती गोष्ट त्यास मरणाहून मरण भासली व त्यानेंच त्याचें नांव चिरंजीव झालें."

दुःखास अस्तित्व आहे असें गृहीत धरून, तें कां असावें, ह्या प्रश्नाचा विचार फार दिवसांपासून मनुष्यमात्र करीत आहे. जगतांत दुष्ट पिशाचें आहेत तीं दुःख देतात, असें एकजण म्हणतो. देवदेवतांत द्वैत व द्वंद्वभाव

१ क्यास्टेलर

असल्यामुळें दुःखोत्पत्ति होते, असें ग्रीक लोक मानीत असत. कित्येकांनीं मनुष्यास सुखदुःख देणारीं कल्याणकर व अनिष्टकर अशीं दोन परस्परविरुद्ध दैविक तत्त्वें आहेत, अशी कल्पना केली आहे व आपण मागच्या जन्मांत केलेलें कर्म हें दुःखाचें बीज असें मानीत आलों आहों.

परंतु क्रियास्वातंत्र्य हें सर्वांस आहे असें गणिलें, म्हणजे त्याचे पोटींच दुःखाच्या अस्तित्वाचा अंतर्भाव होतो. कारण, मनुष्य जसा वागेल तसें त्यास सुख किंवा दुःख होईल. जसें २ आणि २ यांची बेरीज कधींहि ५ होणें नाहीं, तसेंच मनुष्य जसा बनविला आहे त्याहून अन्य प्रकारचा बनविणें शक्य नाहीं. जुपिटर हा मनुष्यास उद्देशून उपदेश करीत आहे, असें कल्पून एपिक्टिटस[1] यानें त्याचेकडून वदविलें आहे कीं, "तुला कोणतीहि उपाधी लागूं नये असें तुझें शरीर व स्वभावधर्म मला करितां आलें असतें तर तें तसें घडविलें असतें; परंतु मला तसें करितां येईना, म्हणून तुझे ठिकाणीं मीं आपला अल्प अंश ठेविला आहे."

हा अल्प अंश आत्मा होय. ह्या देणगीचा शहाणपणानें सदुपयोग करणें आपलें कर्तव्य आहे. ही देणगी म्हणजे एक मोठें अमोल भांडार आपल्या हातीं लागलें आहे. "आत्म्यासारखी दुसरी उत्तम वस्तु मनुष्यास कधींच गवसली नाहीं. तिचा संभाळ कसा केला, हें दाखविणें त्याचें काम आहे. तो शहाणा आहे, तेव्हां अविचारानें व हयगयीनें जीवात्म्यासारख्या अत्यंत दुर्मिळ गोष्टीचा अव्हेर करून ती नष्ट होऊं देणार नाहीं."

१ एपिक्टिटस

शिवाय, दुःख हें सर्वांशीं जरी टाळितां आलें नाहीं, तरी ही लोकयात्रा श्रेयस्कर आणि उपयुक्त होणें अथवा अनिष्टकारक व निरुपयोगी होणें, इतकेंच नाहीं, तर ती सुखद अथवा दुःखद होणें, हें आपल्या अधीन आहे. कारण " शहाणे विवेकानें तेव्हांचे तेव्हांच दुःखापासून मुक्त होतात, परंतु मूर्खास तसें मुक्त होण्यास बहुत काळ लागतो. " स्वतःचे दोषाशिवाय कोणीहि मनुष्य हालअपेष्टा सोशीत नाहीं. आपण जरी पराधीन असलों, तरी आपले निर्माणकर्ते आपणच आहों, असें म्हटलें तरी चालेल.

बहुतेक लोक दुःख, रोग किंवा मृत्यु यांची फारशी पर्वा करीत नाहींत. परंतु दररोज होणाऱ्या अल्पस्वल्प बाधेनें मात्र त्यांच्या जन्माचा वीट होतो. आपल्या संकटांपैकीं बहुतेक संकटें क्षुल्लक असून त्यांचें सहज निवारण करितां येतें. मूढपणानें उपस्थित झालेले गृहकलह व गैरसमज नाहींसे झाले तर आपल्या गृहसुखास पारावारच नाहीं.

आपण जर कुरकूर करीत बसलों अथवा आपली मर्जी जाऊं दिली, तर तो दोष आपला आहे. दुसऱ्यांनीं जरी आपणाशीं असेंच वर्तन ठेविलें, तरी आपल्या आनंदांत बिघाड करूं नये.

जी हालअपेष्टा आपण भोगितों, त्यापैकीं बहुतेक आपणच आपल्यावर अविचारानें अगर अज्ञानानें ओढवून घेतलेली असते. क्षणभंगुरसुखाकडे लक्ष देऊन आपण सर्व जन्म क्लेशांत काढितों. संकटें बहुधा आपण होऊन चाल करून येत नाहींत; आपणच त्यांजकडे जातों. आ-

१ एपिक्टिटस

पणांपैकीं बहुतेक आपलें आयुष्य व्यर्थ घालवितात. "बहुतेक, वेळेचा असा दुरुपयोग करितात कीं, त्यांचें शेष राहिलेलें आयुष्य दुर्दशेंत जातें."

( ओंवी )

" सर्व युगीं सर्व काळीं, कष्टाकुल मानव माळी
पेरी व्यर्थ आशा भूतळीं; निराशेचा हंगाम "

—गेटी

भावी संकटांची अगोदर कल्पना करून आपण आपल्या मनाला बहुत कष्ट करून घेतों. इतकेंच नव्हे तर, जीं संकटें शेवटीं आपणांवर येतच नाहींत, त्यांच्या भयानें वारंवार आपण आपल्या मनास व्यर्थ व्यग्र करून घेतों. आपल्या अंगीं जेवढें सामर्थ्य असेल तेवढें खर्ची घालून त्यांची वाट पहावी. हें खरें शहाणपण होय. असके गृहस्थ अतिश्रमानें बेमार थकून गेले आहेत असें आपण ऐकतों. परंतु शोधाअंतीं त्यांतले शेंकडा नव्वद लोक फक्त काळजीनें रंजीस आलेले आढळून येतात.

( अभंग )

" हृद्रोग-उपाव आपुले रे हातीं; व्यर्थ मागतातीं देवापाशीं "

—शेक्सपिअर

परंतु हें वरील म्हणणें सज्ञान मनुष्यास लागू पडतें; लहान मुलास लागू पडत नाहीं. मुलें सुखी असतात असें म्हणण्याचा परिपाठ आहे; परंतु ही चूक होय. मुलें आपल्या मनास फाजील हुरहूर लावून घेतात व त्यांस अल्प कारणावरून राग येतो. मोठ्या मनुष्यानें आपलें सुख आपल्या अधीन ठेविलें पाहिजे, परंतु मुलांस जवळच्या

१ ब्रूयेअर

मनुष्यांवर सर्वस्वीं अवलंबून राहिल्याशिवाय गत्यंतर नाहीं. रेरी ह्या विख्यात घोडेस्वारानें असें म्हटलें आहे कीं, मी आपल्या घोड्यास एक शब्द रागानें बोललों, तर एका मिनिटांत त्याच्या नाडीचे नेहमींपेक्षां १० ठोके जास्ती पडतात. ही जर घोड्याची दशा, तर आपण मुलांस रागें भरल्यावर त्यांची काय अवस्था होत असेल याचा विचार करा.

लहान मुलांनीं आपल्या जीवास विनाकारण कष्ट करून घेतले, तर त्यांत त्यांचा फारसा दोष नाहीं. परंतु जाणत्या मनुष्यानें तसें केल्यास तो सर्वथैव दोषी ठरतो. धैर्य धरून आल्या संकटास जुमानिलें नाहीं तर तें त्यास सहजरीत्या निवारण करितां येतें. वादळाचें भय जितकें एकाद्या खोलींत कोंडून घेतल्यावर वाटतें. तितकें बाहेर वाटत नाहीं.

आपणावर संकट येणार आहे. अशी आपण कित्येक प्रसंगीं व्यर्थ कल्पना करून तें टाळण्याकरितां खरे कष्ट सोसतों. " ज्या मनुष्याचें थोडक्यानें समाधान होत नाहीं, त्याचें तें कशानेंहि व्हावयाचें नाहीं. असें असूनहि ज्यानें आपलें कधीं समाधान होत नाहीं, त्याकरितां आपण परिश्रम करीत नाहीं काय ? " " ज्या गोष्टींचा आपणास उपयोग नाहीं, त्यांची आपणास जरूरीहि नसते व त्यांचें आपणास विनाकारण ओझें होतें." परंतु अशा निरुपयोगी गोष्टींच्या आपण वारंवार मागें लागतों. एका सरदारानें प्रवासास निघतांना सटरफटर जिनसांचा भला मोठा बोजा बरोबर घेतला. त्यांत रात्रीं उंदीर आपल्या-

१ एपिक्यूरस २ सेनेका

स त्रास देतील म्हणून त्यांस धरण्याकरितां एक सांपळा व मधमाशांचा थवा भेटल्यास त्यांच्याकरितां एक पोळें त्यानें आपल्याबरोबर घेतलें होतें अशी एक गोष्ट सांगतात. हर्न यानें आपल्या प्रवासवृत्तांत एके ठिकाणीं असें म्हटलें आहे कीं, मी प्रवासास निघाल्यानंतर थोड्याच दिवसांनीं मला इंडियन लोकांची एक टोळी भेटली. त्यांनीं माझी बरीच चीजवस्त बुचाडिली. परंतु मीं आपलें समाधान करून घेतलें कीं, माझा बोजा आतां हलका झाल्यानें पुढील प्रवास मला अधिक सुखानें करितां येईल. वर सांगितलेल्या गोष्टींतल्या सरदारासारखे बहुत लोक ही संसारयात्रा क्रमीत असतां निरुपयोगी ओझ्यानें आपणांस लादून घेतात; परंतु तसें न करितां हर्न ह्या प्रवाशाप्रमाणें आपलें समाधान करून घेत नाहींत.

" तुम्हांवर संकट गुदरून ज्या ज्या प्रसंगीं तुमच्या मनास पीडा होईल, त्या वेळेस असें मनांत आणा कीं, आलेलें संकट हें आपलें दुर्दैव नसून, तें धैर्यानें सहन करणें यासारखें आपलें दुसरें भाग्यच नाहीं. "[1] ज्यानें आपल्यास राग येतो; त्यापेक्षांहि आपल्या रागानें आपणास अधिक इजा होते. कुटुंबांतील कलह व वांकडीं पाहून पुष्कळ लोक आपलीं मनें व्यग्र व बावरीं करून घेतात. आपणास कोणी दूषण दिलें, तर शेंकडा नव्वद प्रसंगीं आपण त्याचा विषाद मानूं नये. कारण त्या दूषणास आपण पात्र असलों, तर ' आपणास लाविलेला बोल ' ही एक सूचना आहे असें समजून तिचा आपण आदर करावा; त्यास जर आपण पात्र नसलों, तर आप-

१ मार्कस आरिलिअस

त्यां मनाला निष्कारण काय म्हणून उपाधि लावून घ्यावी ?

( श्लोक )

क्रोध एष महान् शत्रुस्तृष्णा वैतरणी नदी,
संतोषो नंदनवनं, शांतिरेव हि कामधुक्.
—अध्यात्मरामायण

**भावार्थः**—क्रोध हा महान् शत्रु, आशा ही वैतरणी नदी, संतोष हें नंदनवन व शांति ही कामधेनु होय.

शिवाय, आपण संकटांत सांपडलों तर, त्याबद्दल दुःख केल्यानें तें अधिकच दुःसह होतें. एपिक्टिटस म्हणतो कीं, " मला मरण हें ठेविलेंच आहे, मग मीं दुःख करीत कां मरावें ? माझ्या पायांत शृंखळा पडणारच असल्यां, तर मीं आक्रोश करावा काय ? मला देशत्याग करणें भाग पडलें, तर तो आनंदानें व संतोषानें करण्यास मला प्रतिबंध कोणाच्यानें करवणार आहे ? मला जर कोणीं म्हटलें, कीं मी तुला बंदींत घालीन, तर त्याचे म्हणण्याचा अर्थच मला कळणार नाहीं ! कारण, माझा देह बंधनांनीं जखडला जाईल, परंतु प्रत्यक्ष परमेश्वरासहि माझ्या मनास बंधन करून त्यास जेरीस आणितां येणार नाहीं ! "

जर आपणास सुखानें राहतां येणार नाहीं, तर त्याचा दोष आपलेच माथीं येतो. साक्रेटीस हा '३० जुलमी राज्यांचे ' अंमलाखालीं राहत होता व एपिक्टिटस तर एक बिचारा दास होता. अशा विपत्तींत असतांहि, आपल्या स्वतःच्या उदाहरणानें त्यांनीं मनुष्यास सुखप्राप्तीचा मार्ग दाखवून त्यांस आपलें ऋणी करून सोडिलें नाहीं काय ?

एपिक्टिटस म्हणतो कीं, ज्याचे पदरीं अडका नाहीं,

ज्यास वस्त्रप्रावरण अथवा घरदार नाहीं. जो कळाहीन राहतो, ज्यास नोकरचाकर ठेवण्यास ऐपत नाहीं अथवा डोकें ठेवण्यास ठिकाण नाहीं, त्याच्यानें आपले दिवस कसे काढवतील असा लोक प्रश्न करितील; परंतु अशा विपन्न अवस्थेंतहि आनंदानें काळ घालवितां येईल, असें प्रत्यक्ष उदाहरणानें दाखविण्याकरितां मला परमेश्वरानें धाडिलें आहे. मजकडे पहा. मला गांव नाहीं; घर नाहीं; संपत्ति नाहीं; नोकरहि नाहींत. मी नुसत्या जमिनीवर निजतों. मला बायको नाहीं; पोर नाहीं; ठिकाण नाहीं. आमचें वैभव काय तें खालीं पृथ्वी, वर आकाश व एक ओबडधोबड कांबळें! मला कशाची अपेक्षा नाहीं; कसलें दुःख नाहीं व कोणाची भीति नाहीं. मी स्वतंत्र आहें. मी एकाद्या इष्टवस्तूच्या मागें लागलों आणि त्यांत फसलों, अगर जें संकट मी टाळूं इच्छितों त्यांत जाऊन पडलों, असें कधीं कोणीं पाहिलें आहे काय? मीं कधीं परमेश्वरास अगर मनुष्यास नांवें ठेविलीं आहेत काय? मीं कोणावर दोषारोप केला आहे काय? कधीं कोणीं माझी खिन्न मुद्रा पाहिली आहे काय? ज्यांचें तुम्हांस भय व कौतुक वाटतें, अशा लोकांची व माझी गांठ पडली तर माझें वर्तन कसें असतें बरें? मी त्यांस दासांप्रमाणें गणीत नाहीं काय? जो मला पाहतो त्यास, हा आपला धनी व राजा आहे, असें वाटत नाहीं काय?

आपण परमेश्वराचे किती ऋणी आहों याचा विचार करा. प्रत्येक दिवशीं तो आपणावर कृपा करीत आहे; परंतु तिचें मोल आपल्या ध्यानीं येत नाहीं. आलेंच तर तिला आपण क्षुल्लक समजतों. परंतु क्षुल्लक वस्तूंच्या स-

ह्याच्यानें सर्व कांहीं पूर्णावस्था पावतें, हें आपण विसरतों. ती कृपा आपल्या रूढींत पडून गेली आहे, म्हणून तिचा आपणास विसर पडतो. "भाकरी, दूध, फळफळावळ, अशांसारख्या परमेश्वराच्या सामान्य देणगीस अतिपरिचयामुळें आपण तुच्छ मानिलें नाहीं, तर तिचें जितकें महत्त्व असावें तितकें तीस प्राप्त होईल." "आपणांवर होणारे परमेश्वराचे उपकार, दररोजच्या परिचयांतले असले, तरी ते अमोल आहेत असें मानून, त्यांजबद्दल त्याचे आभार मानण्यास चुकूं नये. दहापांच लोक एकत्र जमल्यापासून त्यांस जो शुद्धानंद होतो. त्याजबद्दल त्याचा स्तव करण्यास विसरूं नये. अंधास डोळे येऊन तो जर रमणीय नद्या, वनें, फुलें व झरे पाहील, तर तो आपणास केवढा भाग्यशाली समजेल ! पण हीच मनोहर शोभा व इतर अशींच सुखसाधनें नित्यशः तुम्हांस सहज प्राप्त होतात."

"आपल्या गरजा थोड्या असल्या म्हणजे जसें समाधान होतें, तसें आपल्या जवळ अखंड द्रव्यभांडार असल्यानें होत नाहीं. मनुष्याच्या सुखास सहाय्य करणाऱ्या प्रधान गोष्टी परमेश्वर त्यास उदारहस्तानें देतो." "आपलें शेत पिकास येतांना अगर वृक्षवल्लीचा मोहोर झडतांना पाहणें; नांगर हाकतांना अथवा पोटासाठीं इतर योग्य कष्ट करतांना श्रमणें; वाचणें; मनन, प्रेम आणि ध्यान करणें ह्यानेंच मनुष्यास सुख होतें." हीं सर्व सुखसाधनें मनुष्याचे हातीं नाहींत काय ! "मी चोरांचे तावडींत सांपडलों मग त्यांत माझें काय नुकसान झालें

१ पेटर २ ऐझाक वाल्टन् ३ एपिक्यूरस
४ रास्किन् ५ जेरिमी टेलर

सूर्य, चंद्र, अग्नि, पाणी, माझी प्रिय बायको, मजवर प्रेम करणारे अनेक स्नेही व मजला सहाय्य करणारे बहुत मित्र जोंपर्यंत आहेत, तोंपर्यंत मी असाच उपदेश करीत जाईन. माझी आनंदी मुद्रा, संतोषवृत्ति व निर्मळ अंतःकरण हीं चोरांस चोरून नेतां आलीं नाहींत. ज्या मनुष्यास इतकीं मोठीं सुखाचीं साधनें आहेत त्यानें तीं व्यर्थ गमाविलीं व आपल्या जिवास क्षुल्लक दुःखरूपी कांट्यावर निजवून यातना करून घेतल्या, तर त्यास दुःखच आवडतें, असेंच समजलें पाहिजे." "सूर्य, चंद्र, पृथ्वी व सागर अशीं परमेश्वरनिर्मित कौतुकें मनन करण्यास व पहाण्यास असल्यावर, आपण वनवासी अगर दुर्बळ आहों असें मनुष्यास वाटणार नाहीं."

"स्वर्गसुख सर्व जगतांत आहे, मग आपण देवाजवळ जाऊन तें काय मागणार? प्रत्येक इंद्रिय तोषित करणारें व प्रत्येक आवड पुरविणारें असें सौंदर्य, अत्यंत मनोहर व रम्य घाट व डौल, झळझळीत व नाजूक असे रंग, गोड सुवास, मनास शांतवन करणारें अगर त्यास स्फुरण चढविणारें गीत, दिवसाचा प्रकाश, रात्रीची आल्हादकारक चंद्रिका, सरोवरें, पर्वत, निबिड अरण्यें आणि अफाट सागर, तशींच एका अर्ध गोलांत अनंत हिमानें आच्छादिलेलीं उंच व जुनींपुराणीं शिखरें, दुसऱ्यांत वृक्षवल्लींचा अमर्याद भर, सूर्याची प्रसन्नता, चंडवाताची प्रगल्भता, अशा आनंददायक शोभेचा परमेश्वरानें उदारहस्तानें ह्या आपल्या इहलोकावर वर्षाव केला आहे. आपल्या सभोंवतीं जें दिसतें त्यापेक्षां अधिक सुं-

१ एपिक्टिटस २ ल्यूथर

दर व पूर्णावस्था पावलेल्या गोष्टीची आपल्यास कल्पना करवणार नाहीं व तिची इच्छाहि होणार नाहीं. आपल्या इंद्रियांस त्या सौंदर्याचा पूर्ण उपभोगहि घेतां यावा असें त्यांच्या अंगीं सामर्थ्यहि ठेविलें आहे. जशी आपल्या इंद्रियसुखाची योजना परमेश्वरानें केली आहे, तशीच दुसऱ्या मनुष्यधर्माकरितांहि केली आहे. प्रथम ज्या वेळेस आपली कल्पनाशक्ति धांव घेऊं लागते त्या वेळेस होणाऱ्या अथवा विचारसृष्टींत उपलब्ध होणाऱ्या आनंदांत जो निमग्न झाला असेल, त्यास. इंद्रियसुखाकरितां जशी देवानें यथेच्छ योजना केली आहे तशी आपल्या बुद्धीकरितांहि केली आहे. असें कबूल करणें भाग पडेल. परमेश्वरप्रमानंदाचा आस्वाद घेऊन, ज्यानें त्याचें रहस्य ताडिलें असेल, तो अशा अतर्क्यसुखप्राप्तीबद्दल देवास दुवा दिल्याविना राहणार नाहीं. घटकाभर आपण अशी कल्पना केली कीं. ज्या बालकांवर परमेश्वराचें नेहमीं प्रेम आहे त्यांच्या सुखाकरितांच नवीन सुखसाधनें निर्माण करण्याचे योजनेंत तो गुंतला आहे. तरी देखील आपणास उपलब्ध असलेल्या साधनांबाहेर एकही सुखसाधन त्यास आढळून येईल. असें वाटत नाहीं."

( श्लोक )

परिभ्रमसि किं वृथा ! क्वचन चित्त विश्राम्यताम
स्वयं भवति यद्यथा, भवति तत्तथा नान्यथा.

—भर्तृहरि

**भावार्थः**- हे मना, व्यर्थ भटकत्या कां मारितोस ! कोठे तरी विश्रांति पाव; कारण की, जी गोष्ट घडावयाची ती निःसंशय तशी घडणार.

# प्रकरण २

## कर्तव्यसुख

कर्तव्य हा कोणी आपणास राबवून काम करून घेणारा निर्दय धनी आहे, असें आपण मानूं नये व दुसऱ्यास तसें सांगूंहि नये. उलट, तो एक ममताळू, कृपाळू व जगांतील क्लेश व काळजी यांजपासून आपला सांभाळ करणारी मातेसारखी देवता आहे असें समजावें.

मनुष्यमात्राचा त्याग करून, एकांतवासांत राहिलों म्हणजे आपण आपला स्वार्थ पाहिला, असा आपणावर दोष येतो व कित्येक प्रसंगीं आपलें जिणेंहि उदास होऊन जातें. दुसऱ्याच्या उपयोगीं पडावें हा आपला धर्म आहे व हा धर्म सांभाळिला म्हणजे हा जन्म चित्तवेधक होऊन त्यांत प्रायः आपणास क्लेश होत नाहींत.

परंतु ह्या इहजन्मीं दगदग न पडतां, तो सतेज, सोत्साह व रमणीय कसा व्हावा, हा एक मोठा गूढ प्रश्न आहे.

आजपर्यंत पुष्कळ महापुरुष, अमक्यांत सुख आहे असें समजून, त्याचे मागें लागले. परंतु त्यांस सुखाचा तर पत्ताच लागला नाहीं; उलटा त्यांनीं आपला जगांत बदलौकिक करून घेतला. प्रेमांत सुख आहे असें अन्टनीनें मानिलें; ब्रूटसनें वैभव व सीझरनें राज्यविस्तार ह्यांत सुख गणिलें. पण त्यांस शेवटीं फलप्राप्ति काय झाली ? पहिल्याचे नांवास सदैव कलंक जडला, दुसऱ्याच्या जन्माचें मातेरें झालें व तिसऱ्याशीं सर्व लोक कृतघ्न झाले, आणि शेवटीं तिघेहि नाश पावले. आपल्याजवळ पुष्क-

ळ संपत्ति असली म्हणजे सुख होतें, असें मानिलें तर, तिच्या मागें भय, विपत्ति व मोह हे आहेतच. संपत्तीचा विचारानें जर सदुपयोग झाला, तर सुख होतें खरें; परंतु ती रक्षण करण्याची मोठी दगदग असते.

मग सुख हें संपादन करावें तरी कसें ? **मार्कस आ-रिलिअस** म्हणतो कीं, " फक्त एका ज्ञानानें ही लोक-यात्रा उत्तम पार पाडितां येईल. मनुष्यानें आपल्या अं-तःकरणास क्लेश करून घेऊं नयेत. सुखदुःख तुच्छ मा-नीत जावें. निरर्थक कोणतीहि गोष्ट करूं नये. जें कराव-याचें तें खोडमाळबुद्धीनें व दांभिकपणानें करूं नये. दु-सरा अमकें करील अथवा करणार नाहीं असें अनुमान करून त्याजवर अवलंबून राहूं नये. जें घडून चुकलें व जें नशीबीं आलें, तें ज्या परमेश्वरापासून आपली उत्प-त्ति झाली त्याचीच कृपा समजून त्याचा आदर करावा. व मृत्यु म्हणजे विशेष एकादी आपत्ति नसून ज्या पंच-तत्त्वांचे सर्व प्राणी बनले आहेत तीं तत्त्वें पृथक् होऊन आपापल्या ठिकाणीं जातात, असें समाधान करून घ्यावें व शेवटीं उत्साहवृत्तीनें त्याची वाट पहावी. "

वरील लेखांत जो शेवटीं उल्लेख करण्यांत आला आहे, त्याचा एकंदर विचारसरणीशीं संबंध नाहीं. का-रण मृत्यूच्या भयानें वाटतो तितका मनुष्याचे मनावर परिणाम होत नाहीं.

" [1]जिनें मृत्यूचें भय मानिलें आहे, अशी एकहि वृत्ति मनुष्याचे ठिकाणीं वसत नाहीं; मग ती कितीहि दुर्बल असेना ! सूड उगविण्याची बुद्धि झाली म्हणजे

१ बेकन

कोणी मृत्यूची पर्वा करीत नाहीं. प्रेम तर त्यास तृणवत् मानितें. अब्रूकरितां मरण यावें असें लोक इच्छितात व दुःख तर त्यास जवळच करितें."

( श्लोक )

" त्यजून जरि जाय हा क्षणिक जीव मातें उद्यां,
अजाण, मरणा भितों, मजसि दोष ऐसा न द्या;
सदा सुयशसाधनीं सकल आयु मी वेंचितों;
कुकर्म करि तो खरा मरणभीतिनें कांपतो."

**—ओमर खय्यम**

जर परोपकाराकरितां आपण देह झिजविला, व 'पृथ्वीवर शांति व मनुष्यांत प्रेमभाव' निर्माण होण्याकरितां मनापासून झटलों, तर मृत्यूचें आपणास भयच नको. ज्या जन्मतापाखालीं आपला सर्व काळ जाऊन आपलें जीवित दुःखमय होतें, त्यापासून मुक्त होण्यास परोपकाराचें जसें सहाय्य होतें, तसें अन्य वर्तनाचें होत नाहीं. आपण आपली पराकाष्ठा करावी, शांत मनानें फलाची वाट पहावी, व जें घडतें त्यांत समाधान मानावें. कारण, विश्वचालक जें कांहीं घडवून आणितो, त्यांत त्याचा नेहमीं चांगलाच हेतु असतो.

आपल्या इच्छेप्रमाणें जरी सर्व कांहीं करितां आलें नाहीं, तरी जेवढें आपल्या हातून घडेल, त्याचा आपल्यावर सुपरिणाम होईल. एका व्यक्तीस सर्व कांहीं करितां येणार नाहीं हें खरें आहे. कारण **"तुम्हांस भीमासारखें बल नाहीं, दुसऱ्याची दुष्टबुद्धि तुम्हांस समूळ नष्ट करितां येत नाहीं, व जेवढें अनिष्ट म्हणून आहे ते-**

**१ एपिक्टिटस**

वढें इहलोकपार करितां येत नाहीं; परंतु तुमच्या अंगीं जे दुर्गुण आहेत ते तुम्हांस घालवितां येतील. तुम्ही खेद, भीति, लोभ, मत्सर, द्वेष, धनलोभ व अमर्यादा या अवगुणांस मनांत ठाव देऊं नका; तुम्हीं देवावर भार घातला, त्याजवर प्रेम ठेविलें व त्याचे आज्ञांकित राहिलां, तर हे अवगुण तुम्हांस दूर करितां येतील."

जें पाहिजे तें करण्यासारखे आपण स्वतंत्र असलों, म्हणजे त्यासारखें सुख नाहीं, असें कित्येक लोक समजतात. परंतु "पाण्यांतील मासा मनुष्यापेक्षांहि स्वेच्छ आहे, व माशी तर स्वातंत्र्याचा अवतारच आहे" तरी तो व ती सुखी आहे काय? छानछोकींत अगर इंद्रियोपभोगांत आपला काळ गेला, तर त्यापासून खरें सुख व स्वातंत्र्य आपणास प्राप्त होत नाहीं. अशा उपभोगानें एकदांका आपण आपल्या मनाचे स्वाधीन झालों, म्हणजे त्यासारखी दुःसह पराधीनता दुसरी नाहीं. जसें मद्य पिण्याचें व्यसन, तसेंच इतर मोहाचें स्वरूप आहे. मद्य पहिल्यानें घेतलें म्हणजे सुखकर भासतें, परंतु शेवटीं तें विषासारखें कडू लागतें. एकदां घेतलें म्हणजे दुसऱ्यांदां घेण्याची इच्छा होते. हाच प्रकार इतर गोष्टींत होतो. पुनःपुनः केल्यानें त्या गोष्टीची खवखव लागते, परंतु त्यापासून सुख होत नाहीं. अशा मोहपाशास तोडणें उत्तरोत्तर दुःखद होतें, व त्याचे पूर्ण हारीं गेल्यास पहिल्यांदां जरी क्षुल्लक समाधान झालें, तरी लवकरच तें लयास जाऊन तो मोह अप्रिय होतो.

आत्मसंयमन प्रथम जरी अवघडसें वाटलें तरी तें इ-

१ रस्किन्

कूहकू सवघड होऊन आनंदजनक होतें. आपलें मन आपल्या स्वाधीन ठेविलें, तर त्यासारखा खरा विजय व आनंद दुसरा नाहीं. मेटाखुटीस आलेल्या भाडोत्री तट्टास वरचेवर टोले देऊन र र करीत जाण्यापेक्षां, एखाद्या पाणीदार घोड्यास लगामीं ठेवून त्यास भरधांव फेंकण्यास जरी विशेष कौशल्य व बळ लागतें, तरी त्यापासून मनास आल्हाद होतो. तसेंच दासासारख्या पराधीन व नादान मनास वरचेवर टोंचण्यापेक्षां तेंच आपल्या ताब्यांत ठेवून पाणीदार राखिलें तर अधिक आनंद होतो.

" जो आपला स्वामी बनला, तो इहलोकींचे राजवैभवाची इच्छा करीत नाहीं. " कारण, ज्यांचा मानमरातब किंवा अधिकार मोठा, ते खरोखर मोठे नव्हत. ज्यांस आपलें मन आपल्या स्वाधीन ठेवितां येत नाहीं, त्यांस राजपद असलें तरी ते राजे नाहींत. साधूंचे अंगास जरी भस्म असलें व ते भणंग आणि एकटे भटकत फिरले, तरी ते जगाच्या उद्धाराकरितां जन्म घेतात म्हणून त्यांस जग थोर मानितें. यासंबंधानें पिऱ्हस व सिनिअस यांचा याप्रमाणें संवाद झाला असें म्हणतात:—

सिनिअस —तुम्हीं इटाली काबीज केल्यावर पुढें काय करणार?

पिऱ्हस—मी सिसिली बेट जिंकणार.

सिनिअस—त्यानंतर?

पिऱ्हस —आफ्रिका.

सिनिअस—समजा, तुम्हीं सर्व पृथ्वी काबीज केली, नंतर तरी काय करणार?

१ सर टी. ब्राउन

पिन्हस—नंतर विश्रांति घेऊन आपला काळ आनंदांत घालविणार.

सिनिअस—मग तसें आतांच कां करीत नाहीं ?

शिवाय, समुद्रवलयांकित पृथ्वीचें राज्य जरी प्राप्त झालें, तरी त्याची सर्व जगद्विस्तारापुढें काय थोरवी आहे ? " त्रिभुवनाचा विशाल विस्तार पाहून, मनुष्यास आपण किती क्षुद्र आहों हें समजतें व त्याची उमेद खचून जाते. कारण आपल्यास राजपद जरी प्राप्त झालें, तरी विश्वविस्तारांत सूक्ष्म जी पृथ्वी, तिच्याच एकाद्या तुकड्याचे आपण सुलतान, शेख, अमीर, किंवा राजे ना ? " " राजपदास चढण्याची वाट मोठी बिकट असते, आणि राजे हे ग्रहांसारखे असतात. त्यांस लोक पूज्य मानितात, परंतु त्यांस त्यांचें भ्रमण कधीं चुकत नाहीं. "

" राजा सविश्रम तसा क्षणमात्र नाहीं. "

—शाकुंतल

प्लेटो हा आपल्या ' प्रजासत्ताक राज्य ' नामक ग्रंथांत अशी एक दंतकथा सांगतो कीं, " मरणानंतर प्रत्येक आत्म्यास पुढच्या जन्मीं जी वाटेल ती अवस्था पत्करण्याची मोकळीक असे. त्याप्रमाणें युलिसिसवर जेव्हां पाळी आली तेव्हां त्यानें सुखवस्तु-गृहस्थावस्थेचा बराच वेळ शोध केला, परंतु ती कोनाकोंपऱ्यांत पडली असल्यामुळें तिचा त्यास पत्ता लागला नाहीं. तथापि, पुष्कळ शोध केल्यानंतर जेव्हां ती त्यास सांपडली तेव्हां त्यास आनंद झाला. कारण जगाच्या अनुभवानें त्याचे ठिकाणीं महत्त्वाकांक्षेचा बीमोड झाला होता. "

१ फेल्प्स् २ बेकन

आपण हेंच आपलें एक भलें मोठें राज्य आहे. " जो आपली जिव्हा आपले स्वाधीन ठेवितो, तो एकादें नगर काबीज करणाऱ्या योद्ध्यापेक्षांहि अधिक पराक्रमी होय. " आत्मनिग्रह हें अत्यंत खरें व अति मोठें राज्य आयतें क्वचितच मिळतें. प्रत्येकानें तें संपादन होण्यास स्वतःस जिंकिलें पाहिजे व जर तो सदसद्विचारास अनुसरून वागेल, तर त्यास तें मिळेल. कारण, जो परिश्रम करितो त्यास अपयश येत नाहीं.

" जे लोक उदीमव्यापार करितात, ते असावे तसे सज्जन नसतात व त्यांचीं मनें उदार व मोठीं होत नाहींत " हें आरिस्टॉटलचें म्हणणें आश्चर्य करण्यासारखें आहे. हा अभिप्राय कदाचित् प्राचीन ग्रीक लोकांस लागू पडत असेल; परंतु हल्लींच्या काळीं तो सत्य असेल असें वाटत नाहीं. एके ठिकाणीं सदर ग्रंथकारानें ह्या म्हणण्याविरुद्ध उल्लेख केला आहे. " जो धंदा केल्यानें आपल्यास वेळ मिळेल तोच आपण पत्करावा व सद्वर्तन साधण्यास ज्या गोष्टींचें सहाय्य होतें, त्यांची आपण जोड करावी."

इंग्लंदांतील सर्वसाधारण लोकांचा धंदा शेतकी, व्यापार व कारखाने हा होय. हेच धंदे चालवून बहुतेक लोक आपला उदरनिर्वाह करितात. परंतु त्यामुळें तेथील लोक सद्वर्तनी व उदार नाहींत, असें म्हणतां येणार नाहीं. आपलें जीवित थोर अथवा हलकें असणें, हें ज्या भावानें तें आपण घालवूं, त्यावर अवलंबून आहे. एकाद्या रंकाचा आयुष्यक्रम पाहून आपण मान डोलवितों. तोच एकाद्या सत्ताधीश बादशहाचा अथवा अत्यंत बुद्धि-

१ सालोमन

मानाचा पाहून त्याचा आपण तिरस्कार करितों. उदार व थोर मनानें व्यापारधंदा केल्यास त्यांत उत्तम यश येत, इतकेंच नाहीं. तर मन व वर्तन हीं अनुदार होत नाहीत. रस्किन् कलाकौशल्यासंबंधानें जें म्हणतो, तेंच थोडा फेरबदल केल्यास आपल्या वर्तनास लागू पडेल. त्याच्या म्हणण्याचा भावार्थ असा आहे कीं. " धंदा हलका असो थोर असो, तो जर आपणास आवडेल, तो करीत असतांना त्याचें आपणास कौतुक वाटेल, तो करण्यांत आपला सद्धेतु असेल व त्यानें आपलें मन थिमें व शांत राहून उद्योगाची जर आपणास हौस येईल, तर तो आपण खुशाल करावा. परंतु सर्व धंदे जरी चांगले असले, तरी धंद्याधंद्यांत फरक आहे. सर्वांत म्हणजे परोपकार साधतो असें नाहीं. तेव्हां, संधी मिळाल्यास ज्यांत तो साधेल तो आपण पत्करावा; तसा न साधल्यास आपल्या आटोक्यांत असेल तो करून सुखानें रहावें. "

पुराणप्रसिद्ध योद्धयांचा पराक्रम ऐकून आपण चकित होतों, परंतु ह्या जीवयात्रेंत प्रत्येकास त्या योद्धयांसारखाच पराक्रम केल्याशिवाय गत्यंतर नाहीं. दुराचरण व सदाचरण हीं दोन तुम्हांपुढें मांडिलीं आहेत. वाटेल त्याचा आदर करण्याची तुम्हांस मोकळीकहि दिली आहे. दुराचरणाचा त्याग करून सदाचरणाचा आदर करणें, हा लहानसहान पराक्रम नाहीं.

कित्येकांचें असें म्हणणें आहे कीं, हल्लींच्या मनूंत संसार फार दुर्घट व क्लेशमय झाला आहे. मनुष्यास पूर्वींसारखी आतां उसंत मिळत नाहीं, आणि जीवनकलह तर अत्यंत कडाक्याचा माजला आहे. परंतु ह्या युगांत

आपण किती निर्भय झालों आहों व आपलें रक्षण किती तऱ्हेनें होत आहे. ह्या गोष्टी आपण विसरून जातों. आपणास ह्या काळांत कष्ट करावे लागत असतील; परंतु ते जिवापाड न केल्यास आपलें नुकसान होणार नाहीं. आपल्यास फुरसतहि मिळत नसेल. ह्याचें एक कारण असें आहे कीं, ह्या काळांत आपला जन्म आल्यानें तो चांगला सुखावह होऊन उद्योगाची आपणास हौस आली आहे. हल्लीं आपला काळ उद्योगांत गेल्यानें आपली आनंदवृत्ति असते; आणि सरासरीच्या मानानें पाहतां, ह्या काळांत गुणांची जशी चहा होते व दीर्घोद्योगाचें जसें निश्चयानें फळ मिळतें, तसें इतर युगांत मिळत नसे.

हातीं धरलेल्या कामांत यश मिळण्यास अवधि लागला, तर आपण आपली उमेद खचूं देऊं नये. तेंच जर जलद मिळालें, तर गर्वानें ताठूं नये. ज्या वेळेस सर्व दोष आपलाच असतो त्या वेळेस नशिबास आपण टपका देतों. सेनेका आपल्या एका लेखांत असें म्हणतो कीं, " माझ्या बायकोची दासी हिर्पास्टा हिचे डोळे गेल्यासारखे होते, तरी, मी अंधळी आहें, असें ती मानीत नसे. उलटा घरांत अंधेर आहे असें म्हणे. ही गोष्ट जरी आपणांस हास्यास्पद वाटते, तरी आपलें वर्तन अगदीं ह्या दासीसारखें आहे. कोणत्याहि महत्त्वाकांक्षी मनुष्यास विचारल्यास तो असें सांगेल कीं, ' मी महत्त्वाकांक्षी नाहीं, परंतु रोम नगरांत अन्य मार्गानें टिकाव लागत नाहीं. व खरेखर मला झळकफळक राहण्याची हौस नाहीं; परंतु काय करावें, असें राहणें भाग पडतें. ' सारांश जो तो आपला दोष दुसऱ्यावर घालूं पाहतो. "

न्यूमननें रचिलेल्या एका सुंदर स्तोत्रांत असें म्हटलें आहे कीं—

( अभंग )

" एक पाउल टाकिलें, तोंचि मजगी पुरे झालें;
दूर जाऊं मी कामया ? पुढे यावा थारा पायां. "

परंतु संसारांत कोणताहि मार्ग धरिला तरी, आपण एका विश्वासू मार्गदर्शकाच्या मागें जातों आहों, अशी खात्री करून घेतली पाहिजे; व उगीच आळसानें इकडे तिकडे भटकत फिरण्याचें सोडून दिलें पाहिजे. असा खात्रीचा वाटाड्या आपल्यामध्येंच आहे; तो आपल्यास बहुधा सरळ मार्गानेंच नेतो:—

( ओंव्या )

" विवेक आणि सुविचारु, ईश्वरें नेमुनी दिधले गुरु;
त्यांचिया बुद्धी वर्ततां नरु, आघातातें न पविजे.
यांचा केलिया अवज्ञा, दुःख भोगील महाप्राज्ञा;
जाणते जाणती संज्ञा, दुराग्रही नेणती. "

—मुक्तेश्वर

धर्म हा एक उत्तम मार्गदर्शक आहे खरा, परंतु त्यांत बहुत कारणांमुळें शंका येण्यास पुष्कळ ठिकाणीं अवसर मिळतो. भाव कशावर ठेवावा, याविषयीं संदेह जरी उत्पन्न झाला तरी, आपण काय करावें याची क्वचितच आपणास पंचाईत पडते.

( श्लोक )

" सुवाक्य वदनीं बरें, सुकृति त्याहुनीही बरी,
सुवाक्य मुख शब्द हा, सुकृति त्यांत अर्थापरी;
सुकृत्य वचनें तशीं, अखिल वर्तनीं साधलीं,
तरी सकल साधलें, फलद कीर्तिही लाभली. "

—न्यूमन

क्रिआंथीस देवास म्हणतो कीं—

( अभंग )

" तुवां दावियेला मार्ग मी धरीला, पुढें वाट मला दावीं देवा;
न जाय मी मागें जाणें पुढें मार्ग, मूढ मी कां मग व्हावें जना ?
तुझ्या मार्गे जाण्या केला मी निश्चय, सुख मज होय काय वर्णू. "

काय करावें व काय न करावें याची कधींहि आपणास शंका येण्याचें कारण नाहीं. आज आपण अमकें करावयाचें होतें असें जर उद्यां आपणास वाटलें तर तें करणें प्रशस्त, हें मागणें नको.

एकाच कृतीनें किंवा एकाच निश्चयानें जन्म सफल होत नाहीं; तो तसा सफल होण्यास दररोज तयारी करावी लागते. षड्रिपूंस जिंकण्याकरितां आपली व्यसनासक्ति आळ्यांत ठेवावी लागते व खुद्द आपणावर व आपल्या सर्व आचरणाच्या अल्प स्वल्प बाबींवर नजर ठेवणें जरूर पडतें.

क्षुल्लक भासणाऱ्या गोष्टींच्या महत्त्वाचें वर्णन प्राचीन काळापासून आजपर्यंत ज्ञानी पुरुषांनीं केलें आहे. एक अशी गोष्ट आहे कीं, ' आपल्या मुलास एकानें एक फळ देऊन तें फोडावयास सांगितलें आणि पुसलें, कीं आंत काय आहे ? मुलगा म्हणाला, सूक्ष्म बी आहे बाबा! बापानें एक बी फोडावयास सांगितली आणि पुसलें, आंत काय आहे ? मुलगा म्हणाला, कांहीं नाहीं. बाप म्हणाला, छीः ! जेथे तुला कांहीं दिसत नाहीं, तेथे तर भला प्रचंड वृक्ष आहे ! ' खरोखर या जगतांत सूक्ष्म अथवा क्षुल्लक अशी कोणतीहि वस्तु नाहीं. कारण—

( ओंव्या )

यालागीं एकीं हेळा तुज, दावूं आतां वर्म निज,
सर्वभूतांकुरें बीज, विरूढत असे तें मी.
म्हणोनि सानें थोर न म्हणावें. उंचनीच भाव सांडावे.
एक मीचि ऐसें मानावें. वस्तुजातातें. ''

—ज्ञानेश्वर

( श्लोक )

'' घडी जो स्वयें स्थावरां जंगमांही,
तया सानमोठें असा भेद नाहीं.
तिथे सर्व राहे, जिथे संचरे तो;
तसा सर्वभूतीं स्थळीं ठाव घेतो. ''

—इमरसन

म्हणून क्षुल्लक भासणाऱ्या गोष्टीकडे दुर्लक्ष करूं नये. तुम्हांस जर वाटलें कीं आपणास राग असा कधींच येऊं नये, तर त्यांस उत्तेजन देऊं नका; जेणेंकरून तो वाढेल असें त्याचें चोज करूं नका. प्रथम स्वस्थ राहून, किती दिवस आपणास राग आला नाहीं तें पहा. तुम्हांस पूर्वीं दररोज राग येत असे; आतां एक दिवसाआड येतो; आतां दोन दिवसांआड येतो. कांहीं काळानें चार दिवसांनीं येऊं लागेल. जर महिन्यांत तुम्हांस राग आला नाहीं, तर तुम्हीं मिळविली, असें समजा. कारण कोणतीहि संवय असो, ती प्रथम कमी कमी होत जाऊन शेवटीं नष्ट होते. ' मला आज राग आला नाहीं, काल आला नाहीं व गेल्या दोन तीन महिन्यांत कधींहि आला नाहीं; कारण एकादी राग येण्यासारखी गोष्ट घडली तर मी तो न येई अशा खबरदारीनें राहत होतों. ' असें तुम्हांस म्हणतां आलें म्हणजे, निश्चयानें तुम्ही सुमार्गानें

जात आहां, असें समजा. "[1] एक मनुष्य स्वर्गमंदिरांत शिरला. तेथें देव बसले होते, व जवळपास दुसरें कोणी नव्हतें. देवांनीं त्या मनुष्यास आशीर्वाद देऊन अनेक देणग्या दिल्या व त्यास आपल्या सिंहासनीं बसण्यास बोलाविलें. इतक्यांत एकाएकीं त्या मनुष्यापुढें मायेचें पडळ उभें राहिलें. आपण मोठ्या गर्दीत उभे आहों, ती जाते तिकडे आपणहि जात आहों व तिचा प्रतिकार आपणास करितां येत नाहीं, असें त्यास भासूं लागलें. आतां काय करावें हें त्यास सुचेना. इतक्यांत तें डोळ्यावरचें झांपड निघून गेलें आणि पहातो तों पहिल्यासारखे देव आपापल्या सिंहासनावर बसले आहेत, व आपण त्यांचे पुढें एकटे उभे आहों." "सज्जन जे आहेत ते अशा गर्दीत जरी सांपडले, तरी एकांतांत असल्याप्रमाणें आपलें मन शांत, स्थिर व प्रसन्न ठेवितात."

आपल्यास आपलें मन शांत ठेवितां येतें. "[2] कित्येक लोक वनांत, समुद्रतीरीं व पर्वतांत विश्राममंदिरें बांधितात. त्यांस अशीं स्थळें फार आवडतात, परंतु अशा ठिकाणीं विश्रांतीची अपेक्षा करणें हें अज्ञानाचें चिन्ह होय. कारण, तुम्हांस पाहिजे असेल तर, आपल्या मनाचेच ठिकाणीं रमतां येतें. तेथें जशी विश्रांति मिळते व संसारबाधेचा जसा विसर पडतो, तसा दुसरे ठिकाणीं पडत नाहीं. तशांत आपल्या मनांत सुविचार व विवेक असला तर, त्या शांतीस तर मर्यादाच राहत नाहीं."

१ इमरसन २ मार्कस आरिलिअस

नाहीं व त्यास कोणाच्या सल्ल्याची गरज पडली नाहीं. तो अशा प्रश्नांचा उलगडा करण्यांत व लोकांची समजूत घालण्यांत फार कुशल असे. तसेंच, दुसऱ्याची परीक्षा करण्यांत, त्याची चूक दाखविण्यांत, व त्यास सदाचरण आणि थोरवी ह्याचा मार्ग दर्शविण्यांत. तो इतका चतुर असे कीं, तो खरोखरच अत्यंत सुखी व उत्तम पुरुष होता. जर कोणास माझा अभिप्राय रुचला नाहीं, तर त्यानें साक्रेटिसाचें आचरण दुसऱ्या कोणाच्या आचरणाशीं ताडून पाहून पाहिजे तर निर्णय करावा."

मार्कस आरिलिअस यानें अन्टोनिअस या पुरुषासंबंधानें असेच उद्गार काढिले आहेत:—"विवेकास रुजू अशा प्रत्येक कृतीवर असणारी या पुरुषाची दृढभक्ति, सर्व ठिकाणीं मनाची समता, याची धर्मनिष्ठा, याची प्रसन्न मुद्रा, याचा गोड स्वभाव व पोकळकीर्तीचा तिटकारा आणि सर्व गोष्टी समजून घेण्याची आवड या सर्व गुणांची आठवण करा. पहिल्यानें पूर्ण परीक्षण केल्याशिवाय व समजून घेतल्याशिवाय तो कोणतीहि गोष्ट होऊं देत नसे. जे त्याचा अन्यायानें निषेध करीत त्यांस उलट दोष न देतां, तो वागवून घेत असे. तो घाईनें कांहीं करीत नसे; चुगली ऐकत नसे; रीत, रिवाज व आचार यांची उत्तम ज्ञान करी व दुसऱ्यास शब्दांनें कधीं टोंचीत नसे. तो भ्याड, संशयी, अथवा अभ्यासवादी नसे. अन्न, वस्त्र, घर, नोकरचाकर, यांसंबंधानें त्याचें थोडक्यांत समाधान होई. तो अत्यंत उद्योगशील व सहिष्णु असे. तो जेवणाखाण्यांत हात राखून असे व स्नेह्यांशीं सारखा व दृढ असे. जे त्याचीं मतें खोडून टाकण्याचा प्रयत्न करीत,

त्यांचे बोलण्यात प्रमाद घडला, तर तो त्याचा विषाद मानीत नसे. एखादी अजब चीज दाखविली असतां, त्यास फार आनंद होई, आणि धर्मभोळा न होतां तो धर्मनिष्ठ राही. तुम्हांस या पुरुषासारखें आपलेंहि अंतःकरण अंतकाळीं शुद्ध असावें अशी इच्छा असल्यास, या महापुरुषाचें अनुकरण करा."

असें अंतःकरण शांत झालें, तर आपणास मोठी देणगी व केल्या कर्तव्याचें इनामच मिळालें असें समजावें. म्हणूनच एके ठिकाणीं एपिक्टिटस प्रश्न करितो:—" का रे, कोठे इनाम हा पदार्थच नाहीं काय ? जें न्याय्य व उचित आहे, तें केलें तर या कर्तव्यापेक्षां अधिक तें बक्षीस कोणतें रे ? आखाड्यांत कुस्ती मारिली व डोक्यास एक चिंधी मिळाली, तर तुझा अत्यंत गौरव झाला असें तुला वाटतें; मग जगतांत भलें म्हणून घेऊन, आपण सुखी झालों, तर हें काय लहान बक्षीस आहे ?"

( ओव्या )

" देह तरी वरिचिलीकडे, आपुलिया परी हिंडे;
परि बैसका न मोडे, मानसींची.
वाहुटोळीचेनि बळें, पृथ्वी जैसी न ढळे,
तैसा उपद्रव उमाळें, न लोटे जो;
दैन्यदुःखीं न तपे, भयशोकीं न कंपे,
देहमृत्यु न वासिपे, पातलेनी;
आर्तिआशापाडिभरें, वयव्याधीगजरें,
उजू असतां पाठिमोरें, नव्हे चित्त;
निंदा निस्तेज दंडी, काम-लोभा वरपडी,
परी रोम नव्हे वांकडा, मानसाचा."

—ज्ञानेश्वर

( श्लोक )

" अनंत, स्थिर, सौख्यदा, विमल, कष्ट जी आंवरी,
तशीच भवसागरीं कुपित वादळीं जी तरी
कुकर्मकलि–दूषणें मळलि शांति नाहीं, अशी
स्वधर्मि मधु–भाषणीं कुशल, त्या जनाशीं खुषी. "

—बर्नार्ड

या पद्यांत वर्णिलेल्या शांतवृत्तीहून अधिक मोठें इनाम तें कोणतें? ही शांतवृत्ति लहानमान नाहीं. ती मतीस आकळितां येत नाहीं. ती सोन्याचे गोळ्यांचे गोळे दिले असतां पैदा होत नाहीं व कितीहि रुपें भरीस घातलें तरी ती तोलतां येत नाहीं.

( ओव्या )

“ जो ऐकतांच गर्व गळे, कां ते भ्रांतीच मावळे,
नातरी एकसरें वोळे, मन भगवंतीं;
जेणें होय उपरती, अवगुण अवघे पालटती,
जेणें चुके अधोगती, त्या नांव ग्रंथ;
जेणें धारिष्ट चढे, जेणें परोपकार घडे,
जेणें विषयवासना मोडे, त्या नांव ग्रंथ.

-रामदास

# प्रकरण ३

## ग्रंथप्रशंसा

हल्लीं हवें तें पुस्तक अल्प प्रयासानें वाचावयास मिळतें. हा या मनूचा साधारण अधिकार नाहीं व याबद्दल आपण देवाचे ऋणी असलें पाहिजे. रिचर्ड बेरी ह्यानें सन १३४४ त 'विद्यानंद' वर ग्रंथ लिहिला आहे, त्यांत त्यानें ग्रंथप्रशंसा केली आहे. तो म्हणतो कीं, "ग्रंथ आपले गुरु होत; ते मारल्याशिवाय शिक्षण देतात; ते कठोर शब्द बोलत नाहींत; कधीं रागावत नाहींत व आपल्याजवळून द्रव्य इच्छीत नाहींत. तुम्ही केव्हांहि जवळ गेलां, तरी ते तुम्हांस निद्रिस्त सांपडत नाहींत; एकाद्या विषयाचें मनन करीत असतांना, तुम्ही प्रश्न केल्यास, ते कांहीं छपवून ठेवीत नाहींत; त्यांचें म्हणणें तुह्मांस समजलें नाहीं, तर ते नाखुष होत नाहींत. तुम्हीं अज्ञान असल्यास ते तुह्मांस हसत नाहींत. म्हणून ज्ञानानें भरलेला ग्रंथसंचय हा पृथ्वीतील सर्व संपत्तीहून श्रेष्ठ आहे. अशा संचयाची योग्यता कोणत्याहि इष्ट गोष्टीस येत नाहीं. सत्य, सुख, ज्ञान आणि भक्ति हीं आपल्याशीं करून घेण्याची ज्यास खरी हौस असेल त्यानें ग्रंथपठनाची निःसंशय आवड धरिली पाहिजे."—ज्या वेळीं ग्रंथसंचय अल्प होता त्या वेळीं जर त्याची इतकी प्रशंसा, तर हल्लींच्या काळांत ती केवढी असेल !

ज्यांस ग्रंथवाचनाचा छंद आहे, त्यांचे ठिकाणीं ग्रंथ हे आपले खरे मित्र आहेत हा भाव नेहमीं वास करितो. पेट्रार्क म्हणतो कीं, "माझ्या मित्रांची संगत मला

अत्यंत सुखावह होते. माझे मित्र सर्व मनूंत व देशांत राहणारे आहेत. त्यांनीं राजदरबारीं, तसेंच खेड्यापाड्यांत मोठी कीर्ति संपादन केली आहे व त्यांच्या शास्त्रज्ञानाची फारच वाहवा झाली आहे. त्यांजवळ मला पाहिजे तेव्हां सहज जातां येतें; ते माझ्या कामीं नेहमीं तत्पर असतात; मला वाटेल त्या वेळेस मी त्यांस सांगातीं घेतों अथवा दूर करितों; ते कधींहि मला त्रास देत नाहींत व मी जो त्यांस प्रश्न करितों, त्याचें ते लागलींच उत्तर देतात. ह्या माझ्या मित्रांपैकीं कांहीं गतयुगांतील कथा मला सांगतात; कांहीं सृष्टीचें रहस्य मला समजावून देतात; कांहीं कसें राहावें, कसें मरावें, हा बोध करितात. कांहीं आपल्या रंगेलपणानें माझी काळजी दूर करून माझ्या मनास उत्साह आणितात. कांहीं माझे मनास धैर्य देतात व षड्रिपूंचें दमन करावें व आपण आपल्यावरच सर्व भार ठेवावा हा महत्त्वाचा धडा घालून देतात. सारांश ते सर्व कलांचे व शास्त्रांचे विविध मार्ग खुले करितात आणि त्यांनीं दिलेल्या ज्ञानावर भरंवसा ठेवून मी हरएक आणीबाणीच्या प्रसंगीं वागलों तर प्रसंगांतून पार पडतों, व या उपकारांबद्दल ते विश्रांतीकरितां फक्त माझ्या लहानशा घराच्या कोपऱ्यांतील एक सोयस्कर खोली मागतात. कारण, या माझ्या मित्रांस जसें एकांतवासापासून सुख होतें, तसें बहुसमाजाचे दंगलीपासून होत नाहीं."

"जो[1] ग्रंथांवर प्रेम करितो त्यास विश्वासु मित्रांची, हितकर उपदेशकांची, आनंदी सवंगड्यांची व सांत्वन

१ बॅरो

करणारांची कधी उणीव पडावयाची नाहीं. अभ्यासानें, वाचनानें व मननानें, सर्व काळीं, सर्व अवस्थेंत कोणाहि मनुष्यास त्यांपासून आपलें मन रंजवितां व रमवितां येतें."

"पृथ्वीवर आजपर्यंत होऊन गेलेल्या ग्रंथकारांच्या संगतींत माझा काळ जातो. जिकडे मी नजर फेंकितों, तिकडे मोठ्या प्रासादिक पुरुषांच्या कृति माझ्या नजरेस पडतात. हे माझे सर्वतोपरी सहाय्य करणारे मित्र असून दररोज त्यांचा मला सहवास घडतो."[1]

"घटकाभर कल्पना करा कीं, पृथ्वीच्या पाठीवर आजपर्यंत जे अत्यंत शहाणे व मोठे पुरुष होऊन गेले, त्यांस एकाद्या मनोरंजक विषयावर आपणाशीं संभाषण करण्याकरितां जर आपल्यास बोलावितां आलें तर हा आपला केवढा अधिकार व हें आपलें केवढें भाग्य! त-शांत आपल्याजवळ एकादें चांगलें पुस्तकालय असलें म्हणजे तर ही शक्तीच आपल्या ठिकाणीं उत्पन्न होते. झेनोफन् व सीझर यांनीं केलेल्या स्वाऱ्यांची हकीकत त्यांसच पुसतां येते; डेमॉस्थेनीस व सिसरो यांस आपल्या समोर उभें करून बोलवितां येतें; साक्रेटीस व प्लेटो यांचीं वेळोवेळीं झालेलीं भाषणें आपले कानीं पडतात आणि युक्लीड व न्यूटन यांजकडून सिद्धांत सोडवून घेतां येतात. तसेंच, सुंदर भाषेचा पेहेराव घालून सजविलेले बुद्धिमान् पुरुषांचे वेंचक विचार, ग्रंथांच्या द्वारें आपल्यास समजतात."[2]

"ग्रंथ आपल्या तारुण्यावस्थेंत आपणांस सुमार्ग दाखवितात; वृद्धापकालीं आपलें मन रंजवितात; आपण ए-

१ सौदे २ एकेन् ३ जेरिमी टेलर

कटे उदास असलों, तर ते आपलें समाधान करितात व आपला जीव आपणांस नकोसा वाटूं देत नाहींत; मनुष्यांच्या प्रमादांचा व जन्मबाधेचा विसर पाडितात; आपली काळजी दूर करितात; क्रोधादि वृत्तींचें शमन करितात व निराशा नष्ट करण्यास साह्य करितात. जेव्हां आपण जिवंत मनुष्यांस कंटाळतों, तेव्हां गतपुरुषांचे ग्रंथांस जवळ करावें. ते कधीं त्रासत नाहींत. गर्वानें फुगत नाहींत व कधीं आपल्या भाषणांत कपटानें कांहीं लपवून ठेवीत नाहींत."

साधारण ग्रंथापासूनहि किती आनंद होतो, ह्याबद्दल सर जॉन हर्शलनें एक मौजेची गोष्ट सांगितली आहे.— "एका खेडेगांवांत एक लोहार आपल्या ऐरणीवर बसून, रिचर्डसननें लिहिलेली एक कादंबरी भोंवतालीं जमलेल्या लोकांस मोठ्यानें वाचून दाखवीत असे. ती कादंबरी बरीच लांबलचक असतांहि, श्रोते शांतपणानें ऐकत. शेवटीं त्या कादंबरींतील नायक व नायिका यांची गांठ पडून जेव्हां विवाह झाला, त्या वेळीं त्या श्रोत्यांनीं धांवत जाऊन देऊळ उघडिलें व मोठ्यानें घंटा वाजविली."

"ज्यास वाचनाचा शोक आहे, त्याच्या मनावर निरनिराळे ग्रंथ वाचून निरनिराळे परिणाम होतील. वाचनानें तो एकादे वेळीं भयभीत होईल; एकादे वेळीं विचारांत मग्न होईल; एकाद्या वेळीं निर्जन प्रदेशीं फिरेल; एकाद्या पुरुषाचें सख्य जोडील व एकाद्यास आलिंगन देईल; मोठमोठ्या प्रवाशांबरोबर प्रवास करील व एकाद्याबरोबर घरीं उत्तम काळ घालवील; एकाद्याबरोबर उद्यो-

१ लीहन्ट

ग करील; एकाद्याची कींव करील; एकाद्याबरोबर हसेल आणि नौका फुटून निर्जन किनाऱ्यास लागलेल्या एकाद्या पुरुषाबरोबर खिन्न व अनाथ होईल."

"पुस्तकालय हें एक विश्वविद्यालयच होय."

ह्यानीं मनीं नाहीं त्या लोकांनीं देखील ग्रंथांचें अत्यंत महत्त्व मानिलें आहे. रोकट नार्स लोक वर्णाचे ठिकाणीं कांहीं अद्भुत शक्ति आहे. असें मानीत असत. "शहाण्याचा एक दिवस म्हणजे मूर्खाची सर्व हयात" व "ज्या शाईनें शास्त्रें लिहून ठेविलीं आहेत, ती स्वधर्माकरितां प्राण देणारांचे रक्ताहून अधिक मौल्यवान् आहे" अशा अरब लोकांच्या प्रचारांतील म्हणी आहेत. कान्फ्यूशिअस स्वतःविषयीं लिहीत असतां म्हणतो कीं, "मी आस्थेनें ज्ञान संपादन करीत असतांना अन्नपाणी विसरलों होतों; तेंच ज्ञान संपादन केल्यावर जो मला आनंद झाला त्यांत मी आपलें दुःख विसरून गेलों व वृद्धापकाळ मला गांठीत आहे ह्याचें मला भान राहिलें नाहीं."

जर चिनी व अरब लोक ग्रंथांचें इतकें महत्त्व मानीत, तर आपणांवर हल्लीं होत असलेल्या ग्रंथांच्या उपकारांबद्दल आपण किती ऋणी असावें, याचें वर्णन करण्यास भाषाहि पंगु आहे. आपण एकोणविसावे[1] शतकांत राहत आहों, परंतु ह्या आपल्या सुदैवाचें मोल आपणांस कळत नाहीं. आपण फार लवकर जन्मास आलों; यापेक्षां शंभर वर्षांनीं येऊन, दुसरीं नाहींत तरी निदान शाळांत चालणारीं पुस्तकें पहाण्यास मिळतीं, तर फार चांगलें

१ कारलाइल

झालें असतें, अशी ह्या काळाचें ग्रंथवैभव पाहून एकाद्याची इच्छा झाली तर ती स्वाभाविकच आहे. शंभर वर्षीपूर्वी पुस्तकें फार महाग व बोजड असत इतकेंच नाहीं, तर स्कॉट, थॅकरे, डिकन्स, लिटन् आणि ट्रोलोप यांनीं लिहिलेल्या आनंदजनक कादंबऱ्या त्या काळीं जन्मास देखील आल्या नव्हत्या. अलीकडे उदयास आलेल्या डार्विनचें नांव घेतलें, तर त्याच्या बुद्धिमत्तेनें शास्त्रज्ञान हल्लीं किती मनोहर झालें आहे हें सांगावयास नको. हल्लींचा मनु मोठा गमतीचा आहे, असें रीन्याननें म्हटलें आहे. परंतु वास्तविक पाहतां याहूनहि ह्या काळाचें स्वरूप कांहीं निराळें आहे. या काळांत, अनेक व्यवसायांनीं मनुष्याचें मन नेहमीं वेधून जात आहे; मन गुंग करून टाकणारे असे अनेक प्रश्न उद्भवले आहेत; मनुष्यास सर्व प्रकारचीं साधनें व प्रसंग उपलब्ध झाले आहेत व आपल्या पूर्वजांपेक्षां आपलें चांगलें रक्षण होऊन आपलें मन व्यवहारांत विशेष रंगून जात आहे.

ज्या खोलींत ग्रंथ नाहींत, तिला प्राण गेलेल्या कुडीची उपमा सिसरोनें दिली आहे. परंतु वाचनाची गोडी लागण्यास आपणास विविधज्ञान संपादण्याची हौस पाहिजे असें नाहीं.

वाचन म्हणजे विद्याव्यासंग असा कांहीं अर्थ नाहीं. "जे गद्यपद्य ग्रंथ वाचिले असतां, आपल्या मनोवृत्तींचा उत्कर्ष होतो, तेवढेच ग्रंथ वाचिले असतां पुरे. कारण अशाच ग्रंथवाचनापासून दररोजच्या व्यवहारांत आपणास उपयोग होण्यासारखा असतो."[1]

१ फ्रेडरिक हॅरिसन्

मेकॉले यास कांहीं कमी नव्हतें. अधिकार, संपत्ति, बुद्धि, कीर्ति वगैरे सर्व कांहीं त्यास अनुकूल होतें. तथापि ग्रंथवाचनानें त्यास जसा आनंद होई, तसा दुसऱ्या कशानेंहि होत नसे. सर जार्ज ट्रिव्हेलियन् यानें मेकॉलेच्या चरित्रांत असें लिहिलें आहे कीं,—" गतयुगांत होऊन गेलेल्या मोठमोठ्या बुद्धिमान् पुरुषांविषयीं आमच्या चरित्रनायकाची केवढी पूज्यबुद्धि होती, हें दुसऱ्यानें सांगण्यापेक्षां तोच काय म्हणतो तें पहावें. आपणांवर त्यांचे काय उपकार आले आहेत. सत्यशोधनाचा मार्ग त्यांनीं आपणांस कसा दाखविला, उत्तम व सुंदर कल्पनांनीं आपलें मन कसें व्यापून टाकिलें, प्रसंगीं यांनीं पाठबळ कसें दिलें, दुःखांत सांत्वन कसें केलें, हंगाण असतां जागवण कशी केली व एकांतांत सोबत कशी दिली; ह्या जुन्या मित्रांची चर्या कशी बदलत नाहीं, संपन्न अथवा विपन्नावस्थेंत. तसेंच आपल्यास वैभव आलें किंवा आपण सांदीकोंदींत जाऊन पडलों, तरी हे कसे एकमार्गेच असतात हें खुद्द मेकॉलेनेंच सांगितलें आहे. मेकॉलेनें आपल्या लेखणीच्या जोरावर बहुत संपत्ति व बहुमान मिळविला, तरी दुसऱ्या ग्रंथकारांच्या कृतींपासून जो त्यास आनंद होई, त्यापुढें त्याच्या स्वतःच्या ग्रंथांपासून होणाऱ्या आनंदाची थोरवी नसे. " स्टर्न, फिल्डिंग, हॅरम, वालपोल व जॉनसन् यांच्या संगतीनें जसें त्यास समाधान होई, तसें लंडन शहरांतील कोणाहि पुरुषाचे सहवासानें होत नसे. " गिबन्नें असें म्हटलें आहे कीं,—" मला जरी सर्व हिंदुस्थानची संपत्ति कोणीं देऊं केली तरी मी आपली वाचनाची आवड

दुसऱ्या कोणास कधीं देणार नाहीं."—सर्वतोपरी सुखांत गेलेल्या मेकॉलेल्या आयुष्यक्रमांत हा वाचनाचा नाद एक मोठें तत्त्व होऊन राहिलें होतें, असें म्हटलें असतां चालेल.

" इतिहासवाचनानें मनुष्य तरुणाचा वृद्ध होतो, परंतु त्याचे केश पांढरे होत नाहींत अगर गालांवर सुरकुत्या पडत नाहींत; त्यास वृद्ध मनुष्याच्या अनुभवाचा अधिकार येतो, परंतु तो शक्तिक्षीण होत नाहीं."

ग्रंथ इतके रमणीय आहेत कीं त्यांचे नादानें आपण आपलीं दुसरीं कर्तव्यें विसरतों; तीं विसरतां कामा नये. आपलें मन संस्कृत करण्यांत गुंतून शरीरसंपत्तीची हेलना करूं नये.

ज्यास वाचनाचा व शास्त्रपठनाचा छंद आहे, त्यास व्यायाम हें त्रासदायक कर्तव्यसें भासतें व कित्येकांची जेन ग्रे¹सारखी अवस्था होते. ज्या वेळीं बाहेर शिंगें वाजत होतीं, व कुत्रे पारधीमागें भुंकत होते, त्या वेळीं तिकडे लक्ष न देतां ही बाई आपल्या खिडकींत एकटी बसून ' बुद्धिस्वातंत्र्याकरितां प्राण देणाऱ्या साक्रेटिसानें तुरुंगावरील शोकाकुल अधिकाऱ्याचे हातून नम्रपणानें व धैर्यानें विषाचा पेला कसा घेतला ' ही हृदयद्रावक कथा वाचण्यांत गर्क होऊन गेली होती. याप्रमाणें कित्येक लोक वाचनाच्या नादांत व्यायाम व खेळ यांजकडे दुर्लक्ष करितात. लार्ड डार्बीनें यथार्थ म्हटलें आहे, कीं " ज्याला व्यायामास फुरसत सांपडत नाहीं, त्यास आजारी पडून वेळ फुकट घालवावा लागेल."

हल्लीं ग्रंथ इतके स्वस्त झाले आहेत, कीं ते सर्वांस

१ फुलर

मिळतात. असें पूर्वी नव्हतें. अयरलंड हा आपल्या एका सुंदर पुस्तकांत म्हणतो कीं, " मी लहान असतांना सेलबोर्नेचा ' नॅचरल हिस्टरी ' नामक ग्रंथ मला इतका आवडला कीं त्याची एक प्रत आपल्या संग्रहीं असावी म्हणून तो सर्व मीं हातानें लिहून काढिला. "

मेरी लॅम्ब हिनें एका मुलाची गोष्ट सांगितली आहे ती फार मौजेची आहे.—" एका पुस्तकें विकण्याचे दुकानीं एके दिवशीं मी गेलें असतां, एक मुलगा पुस्तक उघडून मोठ्या उत्सुकतेनें वाचितांना पाहिला. त्या दुकानचे मालकानें त्यास पाहून म्हटलें, ' बाबारे, तूं कधीं पुस्तक विकत घेत नाहींस; तेव्हां तें एथें वाचण्याची तुला मनाई आहे. ' हें ऐकतांच तो मुलगा खिन्न होऊन दुकानांतून निघून गेला. परंतु जातांना म्हणाला कीं, मला जर कोणीं वाचावयास शिकविलें नसतें, तर बरें झालें असतें ! कारण मग मीं ह्या थेरड्याच्या पुस्तकास कशाला हात लाविला असता ? !! "

असा सांपडेल तेव्हां चुटक्या चुटक्यानें विद्यानंदाचा आस्वाद घेणें. यांत एक प्रकारची करमणूक होते. कारण हा आनंदास्वाद अल्पकाळच घेतां येतो, म्हणून तो विशेष गोड वाटतो. कित्येक वाचक एकच विषय एकसारख्या मनांत घोळीत बसतात. म्हणून ते वाचनापासून होणाऱ्या बऱ्याच आनंदास मुकतात. पुष्कळ लोक रेलवेंतून प्रवास करीत असतां आपल्या बरोबर एकच पुस्तक घेतात. याचा परिणाम असा होतो कीं, तें कादंबरीसारखें मनोरंजक नसलें तर अर्ध्या किंवा एका तासांतच त्याचा वाचकास वीट येतो. अशा प्रवासांत नि-

रनिराळ्या विषयांवर दोन अगर तीन पुस्तकें आपल्या बरोबर घेतलीं, व त्यांत एक करमणूक करणारें पुस्तक असलें, तर एका पुस्तकाचा कंटाळा आला तर मोठ्या उत्सुकतेनें आपण दुसरें पुस्तक हातांत घेऊं व अशा रीतीनें आपण घटकांच्या घटका आनंदांत काढूं. परंतु हा अनुभव सर्वांस सारखाच उपयोगीं पडेल असें नाहीं.

अशा अव्यवस्थित वाचनांत सुद्धां जितके ग्रंथ हातून जातील तितके चांगले; म्हणजे प्रत्येक विषयावरील उत्तम ग्रंथाचा आपणांस फायदा होईल. असे ग्रंथ वाचावयास आपण आरंभ मात्र करावा, म्हणजे आपण आपाप दुसरे ग्रंथ वाचावयास लागतों. कित्येक ग्रंथ फक्त वाचून चालत नाहीं; त्यांचा अभ्यास करून मनन करावें लागतें; परंतु असे ग्रंथ फार थोडे असतात. बहुतेक ग्रंथ भराभर वाचून काढून फक्त त्यांत जीं उत्तम स्थळें असतील, तेवढ्यांचेंच मनन केलें असतां प्रायः गैर होत नाहीं. अशा वाचनपद्धतीनें आपण पुष्कळ गोष्टींस मुकतों हें खरें आहे, परंतु अशा वाचनानें देखील अनेक ग्रंथ वाचण्यांत येऊन चांगला फायदाहि होतो. " कांहीं विषयांचें सर्व ज्ञान असणें आणि सर्व गोष्टींचें थोडें थोडें असणें हें चांगलें " ही ब्रूमची म्हण वाचनास सुद्धां लागू पडते. अशाच रीतीनें आपल्या मनाचा उपजत कल कोणत्या विषयाकडे आहे, हें आपणांस कळतें; कारण असा सर्वसाधारण नियम आहे कीं ज्या पुस्तकांपासून आपणांस आनंद होत नाहीं, त्यांपासून ज्ञानाचाहि फायदा व्हावयाचा नाहीं. तथापि, ग्रंथ व विषयवैचित्र्य इतकें मोठें आहे कीं, प्रत्येकानें आपल्या आवडीप्रमाणें वा-

गण्याचें मनांत आणिलें, तरी त्यास तसें करितां येईल.

पुस्तकालय हें एक अखंडसंपत्तीनें भरलेलें लहानसें मंदिर होय. इतकेंच नाहीं तर, त्याच्या सहाय्यानें आपल्या घरीं बसून पृथ्वीच्या पाठीवर आपणांस सर्वत्र संचार करितां येतो. कपतान कुक अथवा डार्वीन, तसेंच किंग्स्ले अथवा रस्किन् यांजबरोबर सर्व पृथ्वीभोंवतीं आपणांस प्रवास करितां येईल व आपणास दिसतील त्यांहूनहि अधिक चमत्कार ते आपणांस दाखवितील; जगाच्या सीमेबाहेर आपल्यास संचार करितां येईल; हंबोल्ट व हर्शल यांजबरोबर सूर्य व तारे यांच्या पलीकडे दूर असलेल्या गूढ पटलांत भ्रमण करितां येईल; त्याचप्रमाणें कालास व आकाशास मर्यादा राहणार नाहीं. कारण भूतकालांत व मनुष्याचे उत्पत्तीपूर्वीं लक्षावधि वर्षांचा काल गेला त्यांत, फार काय पण ह्या जड जगताच्या उत्पत्तिकालांत देखील, भूगर्भशास्त्र आपणास नेऊन सोडील. अशा पुस्तकालयांत एकाच प्रकारची विचारसरणी दृष्टीस पडते असें नाहीं; पूर्वशिक्षण असल्याशिवाय जिचें हृद्गत जरी कळलें नाहीं, तरी जीपासून आनंदच होतो, अशा विचारपरंपरेची व आपली अरिस्टाट्ल व प्लेटो गांठ घालून देतील.

स्वास्थ्य आणि समाधान, विश्रांति व सुख, हीं पाहिजे त्यास आपल्या ग्रंथमंदिरीं प्राप्त होतात; फक्त "त्यांच्याजवळ त्याचें द्वार उघडण्याची सुवर्णकिल्ली मात्र असली पाहिजे." [१] पुस्तकालय हें एक इंद्रभुवन, अथवा प्रत्यक्ष आनंदमंदिर, अथवा भवसागरांतील वाद-

१ मॅथ्यूज़्

ळें व तुफानें यांजपासून रक्षण करणारें बंदर होय. राजा व रंक यांस त्याचा सारखाच उपयोग होतो; कारण एथें संपत्तीस प्रतिष्ठा नाहीं. सदुपयोग केला तर त्याच पुस्तकालयास पृथ्वीवर असतांहि आपण स्वर्ग अथवा 'इडन बाग' बनवून सोडूं! ह्या आमच्या बागांत सर्व वृक्षांचीं, फार काय, ज्या ज्ञानवृक्षाचीं फळें चाखिल्यामुळें आड्याम आणि इव्ह स्वर्गानंदास आंचवले असें सांगतात, त्याचींहि फळें चाखावयास आपणांस पूर्ण मुभा आहे. पुस्तकमंदिरांत अत्यंत महत्त्वाचे इतिहास, मनास स्फुरण चढविणारीं प्रवास अथवा साहसचरित्रें, हृदयद्रावक कथा आणि सुंदर काव्यें वाचावयास सांपडतात. एथें जगद्विख्यात राज्यधुरंधर, कवि व ज्ञानी यांची व आपली मुलाखत होते; मोठ्या विवेकी पुरुषांच्या विचारांची ओळख होते व अत्यंत उदात्त बुद्धिमत्तेच्या कल्पनासृष्टीच्या वैभवाचा आपणांस उपभोग घेतां येतो.

( ओंव्या )

" माझे मंदिरा सात्त्विक, दाटले माझे हे सेवक,
कीं हे सवंगडी भाविक, प्रसन्न असती सदैव;
कीं हे स्वर्गीचे देवदूत, वेळीं अवेळीं येत जात,
मजशीं हितगुज करित, मधुशब्देंकरोनी. "

—प्रॉक्टर

# प्रकरण ४

## ग्रंथांची आवडनिवड

जेथे ग्रंथसंपत्ति विपुल आहे, तेथे कोणते ग्रंथ वाचावे व कोणते न वाचावे, अशी आवडनिवड करावी लागते. महाराष्ट्र भाषेंत असा विस्तृत ग्रंथसमूह आहे असें म्हणतां येत नाहीं. जे कांहीं जुने ग्रंथ आहेत, ते आमच्या महाराष्ट्र कवींचीं काव्यें व निरनिराळ्या दरबारी लेखकांनीं व इतरांनीं राजेरजवाडे, त्यांचीं घराणीं व त्यांनीं इतिहासांत गाजविलेले पराक्रम, यांच्या लिहिलेल्या बखरी होत. परंतु साधारण शिकलेल्या व व्यवहारांत पडलेल्या निवळ मराठी वाचकांचें फावल्या वेळीं मनोरंजन व्हावें व त्यांचा काळ आनंदांत जाऊन ते बहुश्रुतहि व्हावे असा जर वाचनाचा मुख्य हेतु धरिला, तर निरनिराळ्या विषयांवर सोप्या व सरळ भाषेंत लिहिलेले ग्रंथ त्यांस वाचावयास मिळाले पाहिजेत. तसे ग्रंथ आपल्या दुर्दैवानें महाराष्ट्र भाषेंत अद्यापि फारसे झाले नाहींत. परंतु हल्लीं जीं चिन्हें दिसत आहेत त्यांवरून ही शोचनीय स्थिति फार दिवस अशी कायम राहील, असें मानून उदास होण्याचें कारण नाहीं.

आपल्या लोकांस वाचनाचा नादच कमी असें म्हटलें असतां चालेल. तशांत भाषेंत ग्रंथसंपत्ति बेताबाताचीच. तेव्हां साधारण निवळ मराठी जाणणारा गृहस्थ घेतला तर त्याचे ठिकाणीं जितका बहुश्रुतपणा असावा तितका आढळून येत नाहीं. ह्या अज्ञानाचा परिणाम जो व्हावयाचा तो आपल्या लोकांवर झाला आहे. लहानपणीं जें धर्मसं-

बंधी व इतर अल्प गृहशिक्षण हल्लीं मिळतें व पूर्वीं मिळत असे, तेवढ्या शिक्षणावरच जन्मभर ते निर्वाह करितात. असें एकदेशीय व तेंहि अल्प असें शिक्षण मिळाल्यामुळें वृथाभिमान, धर्मभोळेपणा, दुराग्रह असे दुर्गुण वारंवार गृहस्थाचे भाषणांत व व्यवहारांत उदयास येतात. आपलें तेवढें चांगलें, असा अभिमान प्रत्येक मनुष्यानें बाळगणें कांहीं वावगें नाहीं. परंतु त्या बाहेर आपल्यास कांहींच शिकावयाचें नाहीं हा दुराग्रह देशोन्नतीस तर काय परंतु प्रत्येक व्यक्तीचे उत्कर्षास फारच घातक आहे.

( श्लोक )

" पुराणमित्येव न साधु सर्वं, न चापि काव्यं नवमित्यवद्यम्;
सन्तः परीक्ष्यान्यतरद्भजन्ते, मूढः परप्रत्ययनेयबुद्धिः "

**भावार्थः**—जुनी आहे म्हणून कोणती गोष्ट चांगली नव्हे, अथवा नवी आहे म्हणून त्याज्य नव्हे. मूर्ख लोक दुसऱ्याचे बुद्धीनें चालणारे असतात; परंतु समंजस लोक स्वतः परीक्षा करून नव्या अथवा जुन्या गोष्टी ग्रहण करितात.

ह्या वरील कालिदासाचे उक्तीप्रमाणें मोकळ्या व उदार मनानें व शोधक बुद्धीनें सर्व विषयांकडे पहाणें व दुसऱ्याचे अभिप्रायांवर फारसें अवलंबून न राहतां आपल्या सुविचारानें त्यांचें मनन व चिंतन करून त्याप्रमाणें स्वतः अभिप्राय ठरविणें, हें एक अत्मोन्नतीचें लहानसान साधन नाहीं. हें साधन ग्रंथवाचनानें अंशेंकरून तरी प्राप्त होतें, यांत तिळप्राय संशय नाहीं. परंतु वाचनांत येणारे ग्रंथ एकदेशीय असल्यास ते किती जरी वाचले तरी अल्प फल देखील हातीं लागत नाहीं. विविध विषयांवरील ग्रंथवाचनानें तें प्राप्त होतें. असे ग्रंथ

महाराष्ट्र भाषेंत जितके अभाव तितके आहेत. असें ति-
चा कट्टा अभिमानी सुद्धां कबूल करणार नाहीं.

परंतु सध्यां जें कांहीं आहे ह्यांतच निर्वाह करून घे-
तला पाहिजे. म्हणून आम्हीं, साधारण शिकलेल्या व व्य-
वहारांत पडलेल्या निवळ मराठी वाचकानें कोणकोणते
ग्रंथ वाचावे. याची चारपांच विद्वान् लोकांचे अभिप्राय
घेऊन एक यादी तयार केली आहे. ती योग्यस्थळीं वा-
चकांस सांपडेल. ही यादी जशी असावी तशी आहे कीं
नाहीं, ह्याविषयीं निरनिराळ्या लोकांचे निरनिराळे अभिप्राय
पडतील हें आम्ही जाणून आहों व ती सर्वमान्य झालीच
पाहिजे एवढें तिचें महत्त्व आम्ही मानीत नाहीं. ती फक्त
वाचनाच्या दिशेनें दिग्दर्शन करण्याचे हेतूनें दिली आहे.

ज्या परभाषांतील ग्रंथकारांच्या कृतींची कांहीं तरी
माहिती असणें जरूर आहे. त्यांस दिलेल्या यादींत स्थल
देतां येत नाहीं. ही सर्व आधुनिक सुशिक्षित लोकांनीं म-
नांत आणण्यासारखी गोष्ट आहे. कारण त्यांच्या मुख्य
मुख्य कृतींचीं सुद्धां भाषांतरें मराठींत नाहींत. मुसलमान
लोकांचा व आपला आज शेंकडो वर्षें सहवास असून, ते
हल्लीं आपले शेजारीपाजारी आहेत. त्यांनीं आपणावरच
काय परंतु इतर बऱ्याच लोकांवर दिग्विजय मिळवून रा-

* ही यादी ह्या ग्रंथाचे पहिले आवृत्तीचे वेळीं (इ० स० १८९३
त) ह्या ग्रंथाचे कर्ते गाडगीळ ह्यांनीं रा० सा० वि. मो. महाजनी,
कै० म. गो. रानडे इ० थोर विद्वानांचें मत घेऊन तयार केली
होती. तेव्हांपासून अलीकडे झालेल्या नवीन ग्रंथांची निवड कर-
ण्याचें धोरण सदरील यादीवरून समजणारें आहे.

व० ग० दाभोळकर.

ज्य केलें आहे. त्यांच्या सहवासानें आपल्या व इतर लोकांच्या राजकीय, सामाजिक व धार्मिक विचारांत कांहीं ना कांहीं तरी फेरबदल झाला आहे, आणि पुढेंमागें हे लोक आपल्या उत्कर्पास सहाय न झाले तर त्यास बरेंच विघ्न येणारें आहे. अशा लोकांचा मुख्य धर्मग्रंथ ' महंमदी शरा ' व त्यांचा पूर्वींचा इतिहास आपल्यांपैकीं कितीएकांस अवगत असेल ? कुराणाचें भाषांतर साररूपानें सुद्धां मराठींत नसणें ही मोठ्या दिलगिरीची गोष्ट आहे. ख्रिस्तधर्मानुयायी तर आपल्यावर हल्लीं राज्य करीत आहेत. त्या धर्माचा आपल्यांत प्रसार व्हावा म्हणून त्यांचा रात्रंदिवस कायावाचामनेंकरून दीर्घ उद्योग चालला आहे. त्यांनीं 'नव्या व जुन्या करारा' चें भाषांतर करून तुम्हांस सादर केलें आहे. परंतु तें भाषांतर वाचून त्या धर्माच्या प्रधान तत्त्वांची माहिती थोड्यांनींच करून घेतली असेल. आह्मीं दिलेल्या यादींत ' नवा करार ' घातला आहे. त्याची भाषा चांगली नाहीं, परंतु ख्रिस्ती धर्माची मराठी वाचकांस स्थूल तरी माहिती असणें इष्ट आहे असें वाटल्यावरून त्या ग्रंथाचा यादींत समावेश केला आहे.

या यादींत आणखी बऱ्याच ग्रंथांचा समावेश करितां आला असता तर फार चांगलें झालें असतें. प्राचीन तत्त्ववेत्त्यांत अरिस्टॉटलची कृति शिरोभागीं आहे. हल्लीं जी युरोपांत शास्त्रीय विचारपद्धति सुरू आहे तिचा उत्पादक नसला तरी पहिला ग्राहक तो होय. त्यानें दाखविलेलीं तत्त्वें युरोपांतील सुशिक्षित लोकांचे बुद्धीस इतकीं खिळून राहिलीं आहेत कीं तीं त्यांस स्वतःसिद्ध अशीं भासतात. त्यानें काढिलेले सिद्धांतहि फार अलौ-

किक आहेत. तद्वत् प्लेटोची योग्यताहि फार मोठी आहे. त्याचा बोध इतका उदात्त. नीति इतकी शुद्ध, व परमेश्वर आणि मनुष्याची मरणानंतरची स्थिति ह्यासंबंधानें विचार इतके सरळ व पोक्त आहेत कीं ते पाहून विचारी पुरुष आश्चर्यच करितात. अशा प्राचीन ग्रंथकारांच्या विचारांचा, तसाच झेनोफन्, मार्कस आरिलिअस, एपिक्टिटस व डेमास्थिनीस यांच्या मुख्य मुख्य ग्रंथांचा मराठी वाचकांस परिचय झाला पाहिजे. तसेंच कान्फ्यूशिअसचे निवडक लेख, इलिअड व इनिअड या महाकाव्यांचे मनोहर वेंचे, कुक व हंबोल्ट यांचें जलपर्यटन व प्रवासवर्णनें वगैरे ग्रंथहि यांत सामील करितां आले असते, तर मराठी वाचकांस मोठा लाभ झाला असता.

हल्लीं आमच्या तरुण लोकांचें ग्रंथकर्तृत्वाकडे चांगलें लक्ष आहे. तेव्हां वर निर्दिष्ट केलेल्या ग्रंथांचा लाभ थोडक्याच काळांत मराठी वाचकांस होऊन, महाराष्ट्रग्रंथसंचय आहे ह्यापेक्षां विस्तृत व शोभिवंत होईल, अशी आह्मांस पूर्ण उमेद आहे.

महाराष्ट्र भाषेंत ग्रंथसंग्रह थोडा आहे तेव्हां ग्रंथांची आवडनिवड करण्यास जागा नाहीं असें वर म्हटलें आहे खरें. परंतु मुदलीच तशी आवडनिवड करण्यास जागा नाहीं असें म्हणण्याचें साहस आह्मी करीत नाहीं. कारण निरनिराळ्या ग्रंथप्रकाशकांच्या ज्या यादी आमच्या दृष्टीस पडतात, व दरवर्षी ज्या कादंबऱ्या, साधीं अथवा संगीत नाटकें छापून भराभर प्रसिद्ध होत आहेत व आजपर्यंत झालीं आहेत, तीं पाहतां, कोणतें पुस्तक वाचावें व कोणतें न वाचावें अशी निवड करण्यास पु-

ष्कळ जागा आहे. शिवाय निवड करणें हें नेहमीं केवळ ग्रंथाच्या गुणदोषांवरच अवलंबून असतें असें नाहीं. वाचकांचे मनावरहि असतें. म्हणूनच आह्मीं वर उल्लेख केलेल्या यादींची योजना केली आहे. परंतु ज्या भाषेंत ग्रंथसंपत्ति अनंत आहे, त्यांतील ग्रंथांची विचारी लोक निवड करितात ती कोणत्या धोरणानें करितात हें समजणें हें एक प्रकारचें शिक्षणच आहे म्हणून सर **जॉन लबक्** यासंबंधानें काय म्हणतात तें एथे सांगितलें असतां गैर होणार नाहीं. तेव्हां, त्यांनीं ' ग्रंथांची आवडनिवड' हें एक प्रकरण आपल्या ग्रंथांत दाखल केलें आहे त्याचा भावार्थ खालीं दिला आहे. ते म्हणतात कीं:-

" माझे मंदिरीं सात्विक, दाटले माझे हे सेवक,–"

असें प्रॉक्टरनें ग्रंथांविषयीं म्हटलें आहे. आणि खरोखर पहातां ग्रंथ हे कधींकधीं आपली सेवा करण्यास चाकरासारखे तत्पर असतात. परंतु त्यांजकडून आपण सेवा घेत नाहीं. कारण ग्रंथांचा भरणा इतका मोठा झाला आहे कीं, कोणास जवळ करावें व कोणास दूर ठेवावें हें त्यांच्या गर्दींत आपणांस समजतच नाहीं.

पूर्वीं ग्रंथ दुर्मिळ असून त्यांस मोलहि फार पडे. आतां तर खालील उक्ति त्यांस सर्वथा लागू पडते.

( श्लोक )

" दहिंवरें वनलता फलभार वी,
तशि मषी मनतरंग सुर्पाकर्वा;
निरखुनी लिखित तें मग सज्जनीं
अमितमानवमनें स्थिर चिंतनीं. "

—**बायरन्**

आपले पूर्वजांस ग्रंथसंग्रह करण्यास फार कठिण पडे; आपणांस त्यांची निवड करणें कठिण पडतें. आपण कोणता ग्रंथ वाचावा अथवा न वाचावा याबद्दल सावध राहिलें पाहिजे. नाहींतर गुलिमिमच्या खलाशांच्या हातीं जशा द्रव्याच्या थैल्यांऐवजीं वाऱ्यानें भरलेल्या पिशव्या आल्या, तशी आपली गति होईल व टाकाऊ पुस्तकें वाचण्यांत आपला काळ व्यर्थ वेंचेल. कारण अशीं आडमार्गास नेणारीं पुस्तकें फार आहेत.

ग्रंथाग्रंथांत फरक आहेच, परंतु कित्येकांस तर ग्रंथ हें नांव सुद्धां शोभत नाहीं. अशा ग्रंथवाचनानें आपण किती शुद्धानंदास अविचारानें मुकतों, याचा अजमास केला तर आश्चर्यच वाटेल. अशी एक म्हण आहे कीं, ' देवानें आणिलेलें संकट एक वेळ टाळितां येतें, पण आपण होऊन ओढवून घेतलेल्या संकटापासून आपला तरणोपाय होत नाहीं.

जे ग्रंथ विचार केल्याशिवाय कळत नाहींत, अशा ग्रंथांस बहुतेक लोक, ते आपणास कळणार नाहींत अशा भीतीनें हात देखील लावीत नाहींत. परंतु प्रयत्न केला तर ते न समजण्यासारखी आपली बुद्धि मंद आहे असें म्हणण्यास आपणास जागा सांपडणार नाहीं.

ज्या विषयांची आपल्यास आवड असेल, तेच आपल्या वाचनांत यावे. " ज्या विषयांत आपलें मन रंगतें तोच आपण शिकावा " असें डार्विनचें मत आहे; आणि खरोखर पहातां सर्व आयुष्यक्रमास सुद्धां हीच गोष्ट लागू आहे.

इंग्लंदांत अशी कांहीं विद्यावृद्धि होत आहे कीं, पु-

ढल्या पिढींतले मोठे वाचक म्हटले म्हणजे कायदापंडित, वैद्य, दुकानदार अगर कारखानदार नसून, मजूर आणि कारागीर हे होत, असें मानणें स्वाभाविक होय. कारण दररोजच्या व्यवहारांत वैद्य, दुकानदार इत्यादिकांस मानसिक श्रम फार करावे लागतात, सबब त्यांचा दिवसाचा धंदा आटोपला म्हणजे त्यांस राहिलेल्या काळांत व्यायामच केला पाहिजे. परंतु कारागीर व मजूर यांस दररोजच्या धंद्यांतच व्यायाम घडून, राहिलेल्या फुरसतींत वाचन व अभ्यास करण्यास सांपडेल. अद्यापि असा प्रकार घडून आला नाहीं, याचें कारण उघड आहे. परंतु हल्लीं मजुरांस व कारागिरांस विद्यालयांतून उत्तम प्राथमिक शिक्षण मिळतें; शिवाय त्यांस उत्तम ग्रंथ वाचण्यास मिळण्याचीं साधनेंहि बहुत आहेत.

रस्किन् म्हणतो कीं, " आपण जे कष्ट सोसतों त्याचें मला जितकें आश्चर्य वाटतें, त्यापेक्षां आपण जें आपल्या हातानें घालवितों त्याचें तें अधिक वाटतें. दुसऱ्याच्या दोषांमुळें आपणास फार ताप होतो हें खरें आहे. तरी आपण आपले अज्ञानामुळें पुष्कळ सुखास मुकत नाहीं असें नाहीं. " " ज्या गोष्टीच्या छंदानें सर्व अवस्थांत माझी समाधानवृत्ति राहील, माझ्या सर्व आयुष्यक्रमांत जिच्या योगानें मला सुख होईल आणि सर्व तापांपासून माझें संरक्षण होईल, अशी गोष्ट परमेश्वराजवळ मला मागण्याची वेळ आली, तर मी ' वाचनप्रियता ' हीच मागेन; मग मला सर्व गोष्टी प्रतिकूल झाल्या आणि सर्व जग जरी मजवर फिरलें, तरी त्याची मी फिकीर करणार नाहीं.

१ सर जॉन हर्शल

ही वाचनप्रियता देवापाशीं मागेन असें मीं म्हटलें म्हणून, परमार्थविषयक प्रीति असल्यापासून जो एक समाधानाचा खरा मार्ग आपणास आढळला आहे त्याचें महत्त्व मी कमी समजतों असें नाहीं. वाचनाची अभिरुचि हा फक्त इहलोकदृष्टीनें समाधान व आनंद यांच्या प्राप्तीचा एक मार्ग आहे. याशिवाय तिची मी जास्ती शिफारस करीत नाहीं. ही वाचनाची आवड व ती पुरी करून घेण्याचीं साधनें मनुष्यास असलीं व त्याचे हातीं वाईट पुस्तकें पडलीं नाहींत, तर त्यास सुख झाल्याशिवाय राहणार नाहीं."

आपल्याजवळ ग्रंथसंग्रह असला म्हणजे झालें असें नाहीं; त्याचा शहाणपणानें सदुपयोगच झाला पाहिजे. वाचावें काय व न वाचावें काय, याविषयीं लोक बेफिकीर राहतात. हें पाहून वारंवार आश्चर्य होतें. ग्रंथसंख्येस मर्यादाच राहिली नाहीं; आणि दुर्दैवेंकरून वाचण्यास मिळणारा वेळ अगदीं अल्प आहे. अशी स्थिति असतांहि, जो ग्रंथ हातीं लागेल तो लोक वाचतात. आपल्या मित्राच्या खोलींत जो ग्रंथ सांपडेल तो ते हातीं घेतात; रेल्वेस्टेशनांतील पुस्तकविक्रीचे दुकानांत, जिचें नांव चटकदार असेल अशी कादंबरी खरेदी करितात व केव्हां केव्हां तर फक्त पुस्तकाच्या बांधणीवरच नजर देऊन तें जवळ करितात. आतां, ग्रंथांची निवड करणें सोपें काम नाहीं हें खरें आहे, म्हणून कोणी ज्ञात्यांनीं चांगल्या शंभर ग्रंथांची यादी करून ते वाचण्याची लोकांस शिफारस केली तर फार चांगलें होईल. वाचण्यासाठीं पुस्तकांची निवड करावयाची ती ज्यानें त्यानें आपण होऊनच

करावी असें कित्येक म्हणतांना आढळतात. परंतु पोहतां येण्यापूर्वी पाण्यांत कोणी जाऊं नये या उपदेशाच्या तोडीचीच ही शिफारस दिसते.

अशी एक म्हण आहे कीं 'जाळण्यास लांकडें जुनीं, पिण्यास मद्य जुनें, विश्वास ठेवण्यास मित्र जुने व वाचण्यास ग्रंथ जुने असावे.' परंतु हें म्हणणें सर्वथा सत्य नाहीं. हल्लीं लिहिलेल्या पुस्तकांत विशेष विश्वसनीय माहिती आणि भरंवशालायक निर्णय असण्याचा फार संभव आहे. जुन्या काळचे व जुन्या लोकांनीं लिहिलेले ग्रंथ भूतकालदृष्टीनें जरी मनोरंजक असले, तरी हल्लींच्या बहुतेक लोकांस ह्या काळचींच पुस्तकें आवडतात.

जुन्या काळचीं पुस्तकें, पुरातन असल्यामुळें मनोरंजक व जमेस धरण्यासारखीं नसतात असें नाहीं. ज्या ग्रंथांनीं दूरदूरच्या युगांतील व दूरदूरच्या प्रदेशांतील लक्षावधि लोकांचें मन आकर्षण करून त्यांच्या मतांस एकप्रकारचें वळण दिलें आहे, ते त्यांच्या लौकिकास साजणारे जरी नसले, तरी वाचण्यालायक असतातच. बहुतकांस असले जुने ग्रंथ भाषांतरद्वारें वाचितां येतात व हरएक प्रसंगीं भाषांतरांत मूळग्रंथाचें यथास्थित स्वरूप प्रकट होतें असें जरी नाहीं, तरी कित्येक भाषांतरें नांवाजण्यासारखीं असतात. बायबलाचें इंग्रजींत जें भाषांतर आहे तें तर अवर्णनीय आहे.

हे वरील सर जॉन लबक् यांचे विचार मनांत धरून, आपल्या वाचनाकरितां ग्रंथांची निवड केल्यास कांहीं चूक होईल असें वाटत नाहीं. अशी योग्य निवड होऊन उत्तम ग्रंथांचा परिचय झाल्यास, ज्या ज्या वे-

ळेस त्या ग्रंथांचीं नांवें आपण घेऊं त्या त्या वेळेस दिवसास काबाडकष्ट करून रात्रीं घरांत बसून वाचनांत आनंदानें घालविलेल्या घटकांची आपणांस आठवण होऊन मनाचें समाधान होईल व जे ग्रंथरूपी मित्र आपणांस कधीं कंटाळत नाहींत व आपला घातपात अगर त्याग करीत नाहींत त्यांची अमोल देणगी दिल्याबद्दल आपण परमेश्वरास सदैव दुवा देऊं.

## कांहीं निवडक मराठी ग्रंथांची यादी*

| | |
|---|---|
| भगवद्गीता ( प्राकृत भाषांतर ) | मनुस्मृति ( प्राकृत ) |
| अध्यात्मरामायण ( प्राकृत भाषांतर ) | ज्ञानेश्वरी |
| भारतसार ( प्राकृत ) | एकनाथी भागवत |
| मुक्तेश्वर | महिपति |
| मोरोपंत ( केकावलि ) | होनाजी बाळ |
| श्रीधर | दैवसेनी काव्य |
| तुकाराम | कृष्णाकमारी काव्य |

सर जॉन ल्यबक यांनी जी शंभर ग्रंथांची यादी दिली आहे, ती तुलनेकरितां एथे टिपेंत दाखल केली आहे.

LIST OF 100 BOOKS

( *Works by Living Authors are omited* )

The Bible; The Meditations of **Marcus** Aurelius; Epictetus; Aristotle's Ethics; Analects of Confucius; St. Hilaire's "Le Bouddha et sa religion;" Wake's Apostolic Fathers; Thos. á Kempis's Imitation of Christ; Confessions of St. Augustine (**Dr.**

| | |
|---|---|
| रामदास ( दासबोध व मनाचे श्लोक ) | राजा शिवाजी काव्य |
| रघुनाथ पंडित ( नलदमयंती-स्वयंवर ) | इंदिरा काव्य |
| रामजोशी ( बोधपर लावण्या ) | यशवंतराय महाकाव्य |
| अनंत फंदी | पद्यरत्नावलि |
| वामन | पोवाडे |
| अमृतराय | गंगावर्णना |
| | कुसुमांजलि |
| | कुमारसंभव (प्राकृत काव्य) |
| मुक्तमाला | राजा मदन |
| मोचनगड | विश्वासराव |
| आरबी भाषेंतील सुरस व चमत्कारिक गोष्टी | दोन सुरस गोष्टी |
| | प्रेमबंधन |
| ठगाची जबानी | गलिव्हरचा वृत्तांत |

Pusey ); The Koran ( portions of ); Spinoza's Tractatus Theologico-Politicus ; Comte's Catechism of Positive Philosophy; Pascal's Pensées ; Butler's Analogy of Religion; Taylor's Holy Living and Dying Bunyan's Pilgrim's Progress ; Keble's Christian Year.

Plato's Dialogues, at any rate, the Apology, Crito, and Phaedo ; Xenophon's Memorabilia ; Aristotle's Politics ; Demosthenes's De Coroná ; Cicero's De Officiis, De Amicitiâ, and De Senectute ; Plutarch's Lives ; Berkeley's Human Knowledge ; Descartes's Discours sur la Méthode ; Locke's On the Conduct of the Understanding.

रासेलस — रॉबिन्सन क्रूसोचें चरित्र
कादंबरीसार — अजब ऐनेमहाल
आजकालच्या गोष्टी — दाशरथीरामचरित्रामृत
इसापनीति

डफकृत मराठ्यांचा इतिहास — मुसलमानांचा इतिहास (मोड-कृत)
मर्डॉककृत एल्फिन्स्टनचा — रोमचा
हिंदुस्थानाचा इतिहास — हिंदुस्थानकथारस
काव्येतिहाससंग्रहांतील बखरी
इंग्लंडचा इतिहास

अर्थशास्त्राचीं मूलतत्त्वें — न्यायादिदर्शन
भूस्तरविद्येचीं मूलतत्त्वें — ज्योतिर्विलास
भूतलविषयकविद्येचीं मूलतत्त्वें

कविचरित्र — रिचर्ड कॉब्डेनचें चरित्र
नाना फडनविसांचें चरित्र — जार्ज वाशिंग्टनचें चरित्र

Homer; Hesiod; Virgil; Maha Bharata, Ramayana; (Epitomised in Talboys Wheeler's History of India, vols. i. and ii.); The Shahnameh; The Nibelungenlied; Malory's Morte d'Arthur.

The Sheking; Kalidasa's Sakuntala or The Lost Ring; Æschylus's Prometheus; Trilogy of Orestes; Sophocles's Œdipus; Euripides's Medea; Aristophanes's The Knights and Clouds; Horace.

Chaucer's Canterbury Tales (perhaps

| | |
|---|---|
| सार्केनिसाचें चरित्र | गौतमबुद्धाचें चरित्र |
| सरदार परशुरामभाऊ पटवर्धन ह्यांचे पराक्रम | बोनापार्टीचें चरित्र |
| | ड्यूक आफ् वेलिंगतनचें चरित्र |
| डेमास्थेनीसचें चरित्र | शिकंदर बादशहाचें चरित्र |
| आलफ्रेड दी ग्रेटचें चरित्र | सुभेदार थोरले मल्हारराव होळकर यांचें चरित्र |
| बापू गोखले यांचें चरित्र | |
| पिटर दी ग्रेटचें चरित्र | |

| | |
|---|---|
| शाकुंतल ( गोडबोले अथवा आपटेकृत ) | जानकीपरिणय |
| | प्रियदर्शिका नाटिका |
| मृच्छकटिक ( गोडबोलेकृत ) | जयपाळ ( कीर्तनेकृत ) |
| वेणीसंहार ,, | थोरले माधवराव पेशवे ,, |
| उत्तररामचरित्र ,, | शेक्सपिअरचीं नाटकें |

in Morris's edition ; or, if expurgated, in C. Clarke's, or Mrs. Haweis's ); Shakespeare, Milton's Paradise Lost, Lycidas, Comus, and the shorter poems ; Dante's Divina Commedia ; Spenser's Fairie Queen ; Dryden's Poems ; Scott's Poems ; Wordsworth ( Mr. Arnold's selection ) ; Pope's Essay on Criticism, Essay on Man, Rape of the Lock; Burns; Byron's Childe Harold ; Gray.

---

Herodotus ; Xenophon's Anabasis and Memorabilia ; Thucydides ; Tacitus's Germania ; Livy ; Gibbon's Decline and Fall ; Hume's History of England; Grote's History of Greece ; Carlyle's French Revolution ; Green's Short History of England ; Lewes's History of Philosophy.

| | |
|---|---|
| मालतीमाधव (राजवाडेकृत) | मोलिअरचीं प्रहसनें |
| विक्रमोर्वशीय | बाजीराव आणि मस्तानी |

| | |
|---|---|
| पुष्पकरंडक | बेकनचे निबंध |
| कोलंबसाचा वृत्तांत | सद्बोधमंदिर |
| उद्योग आणि नशीब | स्वातंत्र्य |
| राजगुरु दादोजी कोंडदेव आणि छत्रपति शिवाजी महाराज | अनेकविद्यामूलतत्त्वसंग्रह |
| | शिक्षणमीमांसा |
| | नीतिमीमांसा |
| बायबलचें मराठी भाषांतर | एलिझाबेथ |
| युनायटेड स्टेटसचा प्रवास आणि लोकस्थिति | केसरींतील निवडक निबंध |
| | विविधविषयसंग्रह |
| विलायतचा प्रवास | पॉल आणि व्हर्जिनिया |
| सिसरोचे निबंध | हिंदुयुनिअनक्लबचीं व्याख्यानें |

Arabian Nights; Swift's Gulliver's Travels; Defoe's Robinson Crusoe; Goldsmith's Vicar of Wakefield; Cervantes's Don Quixote; Boswell's Life of Johnson; Moliere; Schiller's William Tell; Sheridan's The Critic, School for Scandal and The Rivals; Carlyle's Past and Present.

Bacon's Novum Organum; Smith's Wealth of Nations (part of); Mill's Political Economy; Cook's Voyages; Humboldt's Travels; White's Natural History of Selborne; Darwin's Origin of Species, Naturalist's Voyage; Mill's Logic.

धोममहाबळेश्वरवर्णन
सृष्टपदार्थ नियम आणि सुधारणा
निबंधमाला ( वेंचे )
सुभाषित अथवा सुबोध वेंचे
पृथ्वीराज चव्हाण
ऐतिहासिक गोष्टी व उपयुक्त माहिती
मोक्षमुल्लरचीं व्याख्यानें
गद्यरत्नावलि
गद्यरत्नमाला
स्त्रियांची परवशता
आनंदीबाई जोशी ह्यांचें चरित्र
मधुमक्षिका

Bacon's Essays; Montaigne's Essays; Hume's Essays; Macaulay's Essays; Addison's Essays; Emerson's Essays; Burke's Select Works; Smiles's Self-Help.

Voltaire's Zadig and Micromegas; Goethe's Faust, and Autobiography; Thackeray's Vanity Fair, Pendennis; Dickens's Pickwick, David Copperfield; Lytton's Last Days of Pompeii; George Eliot's Adam Bede; Kingsley's Westward Ho!; Scott's Novels.

( श्लोक )

" शोकारातिभयत्राणं, प्रीतिविश्रंभभाजनं,
केन रत्नमिदं सृष्टं मित्रमित्यक्षरद्वयं. "

—सुभाषित

**भावार्थः**—शोक, शत्रुभय यांपासून रक्षण करणारें, प्रेम व विश्वास यांचें वसतिस्थान, असें वर्णद्वयात्मक मित्र नामक रत्न कोणीं उत्पन्न केलें असेल तें असो.

# प्रकरण ५

## सुहृत्समागमलाभ

ज्यांनीं ग्रंथप्रशंसा केली आहे, त्यांपैकीं बहुतेकांनीं ग्रंथांस मित्रांची उपमा दिली आहे. कारण ग्रंथांची थोरवी पूर्ण लक्षांत येण्यास मित्रांसारखी दुसरी चांगली उपमा त्यांस दिसली नाहीं. साक्रेटीस म्हणतो कीं, " सर्व लोक घोडे, कुत्रीं, संपत्ति, बहुमान इत्यादिकांची हाव धरून, तीं संपादन करण्याचे परिश्रम घेतात. परंतु मला एकाद्या मित्राची जोड मिळाली असतां जसें समाधान होईल, तसें ह्या एकंदर सर्व गोष्टी मिळाल्यापासून होणार नाहीं. ज्यांचे पदरीं आलोट संपत्ति आहे, त्यांस आपल्या संग्रहीं कायकाय मालमत्ता आहे, ह्याचा कांहीं ना कांहीं अजमास असतो. परंतु त्यांस मित्र जरी थोडे असले, तरी ते किती आहेत हें ठाऊक नसतें. कोणीं विचारिल्यास, त्यांनीं ते मोजण्याचा जरी प्रयत्न केला, तरी ते आपल्या मित्रांविषयीं इतके उदास असतात कीं, ज्यांस पूर्वी मित्रांत गणिलें असेल त्यांस त्यांतून वगळितात. परंतु आपल्याजवळ असलेल्या मालमत्तेशीं मित्रांची तुलना केली, तर ते अधिक मौल्यवान् ठरणार नाहींत काय ?" "सर्व पदार्थांच्या मोलाविषयीं बहुतेकांचा मतभेद असतो, परंतु मित्रांच्या मोलाविषयीं सर्वांचें एकमतच आहे. आपल्याजवळ पुष्कळ संपत्ति, अधिकार, व सर्व सुखांचीं साधनें असल्यामुळें जें आपलें वजन पडतें, तें खर्चून आपण घोडे, दास, दासी, उंची

१ सिसरो

पेहेराव व वस्त्रें पात्रें खरेदी करतों, परंतु या जन्मांत अत्यंत मौल्यवान् व हितकर असे जे मित्र ते जोडीत नाहीं, यासारखा वेडेपणा दुसरा कोणता नाहीं. आपल्या-जवळ किती घोडे व गायी आहेत, हें सर्व सांगूं शकतात; परंतु आपले मित्र किती आहेत, हें त्यांस सांगतां येत नाहीं." आपणास एकादा घोडा खरेदी करावयाचा असला, तर आपण मोठी काळजी घेऊन त्याची मूळपीठिका, जोगवण व स्वभाव पाहतों; परंतु ज्या मित्रांच्या संगतीनें आपला आयुष्यक्रम थोड्याबहुत प्रमाणानें बरावाईट होण्याचा संभव आहे, अशा मित्रांची निवड केवळ अनुमानधपक्यानेंच करितों.

"ज्या वेळेस आपणास मनुष्याची जरूर असते, तेवढा वेळ शिवाय करून बाकीच प्रसंगीं दुसऱ्याची संगत आपणास त्रासदायक होते." ही गोष्ट कांहीं मिथ्या नाहीं. कारण नेहमीं दुसऱ्याच्या संगतीची अपेक्षा करणें हें अज्ञानाचें लक्षण होय. "ज्या अविचारी लोकांस समाधानानें एकटें राहतां येत नाहीं, त्यांस दुसऱ्याची संगत नसल्यास तुरुंगांत पडल्यासारखें होतें. परंतु जे अत्यंत विचारी व उद्योगशील आहेत, त्यांस एकटें असल्यानें गर्दींत असल्यासारखें होऊन, ते कधींकधीं आनंदानें मंडळींत मिसळून एकांताचें सुख भोगितात."

"दोन मनुष्यें एके ठिकाणीं जमलीं कीं त्यांचें महत्त्व कमी होतें" ह्या इमरसनचे म्हणण्यांत विशेष तथ्यांश आहे असें दिसत नाहीं. हा ग्रंथकार आणखी असेंहि म्हणतो कीं, "एकमेकांचा जेथे सहवास झाला,

१ होल्मस् २ सर टी. ब्राउन

तेथें प्रत्येक व्यक्तीच्या सुंदर गुणांचा थोडा तरी लोप होऊन सुस्वभावाचा फुलोरा झडून जातो व सुगंध नाहींसा होतो. हें खरें असेल काय ? असेल तर मैत्रीपासून फायदा तो कसा व्हावा ? आह्मांस असें वाटतें कीं, मित्रसंगतीपासून याच्या उलट परिणाम होतो. सुस्वभावरूपी फुलाचा संकोच न होतां मित्रसंगाच्या सुखानें तें उलटें विकास पावतें व त्याचे रंगहि अधिक झळझळीत होतात.

मित्र हा कधीं ना कधीं शत्रु व शत्रु मित्र होईल असें समजून त्याशीं योग्य असेल तेंच वर्तन ठेवावें, असें कित्येक लोक म्हणतात. पहिल्या उल्लेखाविषयीं कोणाचा कांहींहि अभिप्राय असो; परंतु दुसऱ्या म्हणण्यांत बरीच दूरदृष्टि व शहाणपण आहे. कित्येक लोक मित्रांची जोड करण्यापेक्षां शत्रूंची करण्याचे अधिक श्रम घेतात व त्यांत आनंदहि मानितात. पिथ्यागोराम सर्वांस असा उपदेश करितो कीं, " बहुत लोकांशीं सलगी करूं नका. " परंतु जोंपर्यंत योग्य मनुष्याचा स्नेह संपादन करण्याविषयीं आपण दक्ष आहों तोंपर्यंत ह्या उपदेशाचें फारसें महत्त्व नाहीं. कारण,

( आर्यागीति )

जरि गा ! सहस्र असती मित्र, तयां गुज मानिती थोडे;
परि एक शत्रु असतां, लागे सर्वत्र पाठिसी कोडें.

आणि खरोखर या जगतांत आपल्या दुर्दैवानें थोर मित्र थोडे असून एक जरी क्षुद्र शत्रु असला, तरी तो आपलें अनहित करण्यास अत्यंत बलाढ्य असतो. प्रत्येक मनुष्याची पुष्कळ लोकांशीं गांठ पडते; ते सर्वच स्वभावतः दुर्जन असतात किंवा ते बुद्धिपुरःसर आपणांस आड-

वाटेस लावितात असें नाहीं. परंतु ते लोक दुसऱ्याशीं आपण काय बोलतों न बोलतों याजकडे दुर्लक्ष करितात; स्वतःच्या मनाचीहि हेळसांड करून त्यास योग्य वळण देत नाहींत; आपल्या भाषणांत नेहमीं क्षुद्र व बालिश गोष्टी अगर गप्पा आणितात, परंतु थोडे श्रम घेतले नर आपलें भाषण दांभिक न होतां फार बोधपर व आनंद-जनक होईल अथवा तेंच भाषण तसे श्रम न केल्यास निरस व फोल होईल, असें त्यांस उमजत नाहीं. प्रत्येक मनुष्यापासून कांहीं ना कांहींतरी उपदेश घेण्यासारखी त्याची योग्यता असते. त्यानें तो करण्याचें मात्र मनांत आणिलें पाहिजे. जरी अशा गृहस्थांनीं आपणास कांहीं शिकविलें नाहीं, तरी ते सूचक प्रश्न करून अथवा स्नेहलोभानें आपणास सहाय्य करितात. परंतु त्यांनीं यापैकीं कांहींहि केलें नाहीं, तर त्यांचा सहवास म्हणजे केवळ व्यर्थ कालक्षेप होय व अशा लोकांचा स्नेह तर काय पण ओळख देखील न झालेली बरी.

आपल्या संवगड्यांची व मित्रांची शहाणपणानें जशी आपण निवड करूं, तसा आपला आयुष्यक्रम सुखावह व शुद्ध होईल. आपण दुर्जनांशीं स्नेह केला, तर ते आपणास आपल्या पायरीस आणून सोडतील; चांगल्याशीं केल्यास आपला सर्वतोपरी उत्कर्ष होईल.

(आर्या)

गुणवत्संबंधानें नीचांहि पावे सदा महत्त्वास;
पुष्पाच्या संगानें सूत्रालाही घडे शिरीं वास.

परंतु ह्या बाबतींत बहुत लोक अनुमानधपक्यानेंच चालतात. जो मनुष्य भेटेल त्याशीं सौजन्यानें व मर्यादेनें

वागणें हितकर आहे. हें खरें; परंतु त्यास खरा मित्र समजून जवळ करणें गैर आहे. एकादा मनुष्य आपल्या शेजारीं राहतो, अगर आपल्यासारखाच उद्दीमधंदा करितो, अगर आपल्याबरोबर एकाच गाडीनें प्रवास करितो म्हणून अगर अशाच दुसऱ्या क्षुल्लक कारणावरून त्यास कित्येक आपला मित्र म्हणवितात. परंतु यासारखी मोठी चुकी दुसरी नाहीं. "ह्या सर्व मैत्रीच्या मूर्ति व बाहुलीं होत"; खरी मैत्री नाहीं.

( श्लोक )

दर्शने स्पर्शने वापि श्रवणे भाषणेऽपि वा,
यत्र द्रवत्यन्तरंगं स स्नेह इति कथ्यते.

—सुभाषित

**भावार्थः**—ज्याचे योगानें दर्शन, स्पर्श, श्रवण, किंवा भाषण इ० प्रसंगीं अंतःकरणांत द्रव उत्पन्न होतो, त्यास स्नेह म्हणतात.

आपला शत्रु कितीहि क्षुल्लक असला तरी तो आपलें मोठें अनहित करूं शकतो. तसेंच ज्यानें दुसऱ्यावर प्रेम केलें आहे त्याचेच ठिकाणीं सर्वांविषयीं प्रेम उत्पन्न होईल, ह्या दोन गोष्टी आपण विसरतां कामा नये. प्रत्येक मनुष्यांत कांहीं ना कांहींतरी गुण असतोच. "[२]हें जगत् आपस्वार्थी व कृतघ्न आहे. असें लोक म्हणतांना मीं ऐकिलें आहे. परंतु असा अनुभव मला आला नाहीं, हें कदाचित् माझें सुदैव असेल." विचारपूर्वक पाहिलें तर बहुतेकांस असाच अनुभव येईल.

"ह्या जगतांत आपण एकटे आहों. इहलोकीं आपल्या मनासारखे मित्र आपणास मिळतील असें लोक

१ प्लूटार्क    १ नॅस्मिथ्    २ इमरसन्

म्हणतात. परंतु हें म्हणणें स्वप्नवत् अथवा दंतकथांसारखें मिथ्या होय. आपणावर प्रेम करणारे व आपल्या प्रीतीस पात्र असे जीवात्मे हल्लीं परलोकीं वास करीत आहेत अशी आशा करून आपलें अंतःकरण समाधान मानितें."

( श्लोक )

मित्रं प्रीतिरसायनं नयनयोरानंदनं चेतसः,
पात्रं यत्सुखदुःखयोः सहभवेन्मित्रेण तत दुर्लभं."

—हितोपदेश

**भावार्थः**—ज्या मित्राचें दर्शन आलें असतां, नेत्रांत रसायन घातल्याप्रमाणें अंतःकरणास आनंद होतो व जो आपल्या सुखदुःखांचा सहभागी आहे, असा मित्र मिळणें दुर्लभ होय.

परंतु या वरील दोन्ही उक्ति सर्वांस पूर्ण मान्य होतील असें वाटत नाहीं.

मित्रांच्या संगतीनें आपला जन्म सुखांत व आनंदांत जातो ही गोष्ट निर्विवाद आहे खरी; तरी त्यांवर सर्वथैव अवलंबून राहतां येत नाहीं. खरोखर पहातां आपण आपले स्वतः मित्र अथवा शत्रु आहों. असाच मुख्यतः भरंवसा धरून वागलें पाहिजे.

" जगतांत खरी मैत्री नाहीं. व बरोबरीच्या मनुष्यांत जी आढळते, तिची वाजवीपेक्षां फाजील थोरवी मानण्याचा संप्रदाय पडला आहे. कोठें असलीच तर एकाच्या शहांत दुसरा राहील अशा वरिष्ठ व कनिष्ठ मनुष्यांत असेल. " हें बेकननें मनापासून म्हटलें असेल असें दिसत नाहीं. कारण त्यानें असेंहि म्हटलें आहे कीं, " आपणास कोणी खरा मित्र नसल्यास हें जगत् भयाण जंगल वाटून, आपला जन्म एकांतवासांत घालविल्या-

सारखा कंटाळवाणा व नकोसा होईल. परंतु आपल्या वृत्तींत व विचारांत विकल्प येऊन ज्या वेळेस गोंधळ उडून जातो व आपण अंधारांत चांचपत चालल्यासारखे व्यवहारांत वागतों, त्यावेळेस मित्रांच्या सहवासानें प्रकाश पडून आपणास सरळ वाट दिसते; संकटसमयीं आपलें मन सुप्रसन्न राहतें; त्यांच्याशीं चर्चा केल्यानें आपले विचार अव्याहत चालून त्यांस योग्य सरणी लागते; ते विचार लिहिले, तर कसे दिसतील हें कळतें व आपण आपल्याशीं एक दिवस मनन केल्यानें जितकें ज्ञान होतें, त्याहून मित्राशीं एक घटकाभर संभाषण केल्यानें अधिक होऊन, आपण उत्तरोत्तर चतुर व शहाणे होत जातों."

मित्राशीं संभाषण करणें तेंहि निष्फळ विषयांवर नसावें. एपिक्टिटस यासंबंधानें असा उपदेश करितो कीं, "घोडे, कुत्रे, मल्ल, खाणेंपिणें, अगर अशाच दुसऱ्या क्षुल्लक विषयांवर बोलूं नका; परनिंदा किंवा स्तुति तर कधीं गाऊं नका." "ज्या वेळेस तुम्हांस करमणूक करून घ्यावयाची असेल, त्या वेळेस तुमच्या सहवासास असणारांच्या सद्गुणांचें मनन करा; अमका चलाख आहे, अमका मर्यादशील आहे, तसाच अमका उदार आहे असें मनांत आणा. कारण जे आपल्या संगतीस असून हरहमेष आपल्या डोळ्यांपुढें येतात, त्यांच्या सद्गुणांचा कित्ता पुढें ठेवून तो वळविण्यांत जो आनंद होतो तसा दुसरा कशानेंहि होत नाहीं." पण सदरील उपदेशाप्रमाणें आपल्या हातून वर्तन होत नाहीं. ज्यांस आपण आपले मित्र

• मार्कस आरिलिअस

समजतों त्यांचा चेहरा व वाणी मात्र आपल्या ओळखीची असते, परंतु त्यांचें मन व सद्गुण यांचें आपणास बिलकुल ज्ञान नसतें.

जितक्या खबरदारीनें आपण मित्र संपादन करितों, तितक्याच कांटाकाळजीनें जोडिलेली मैत्री रक्षण केली पाहिजे. " एक दुसऱ्याचे पाठीमागें त्याजविषयीं काय बोलतो, हें जर सर्वांस कळेल, तर जगांत चार मित्रहि आढळण्याची मारामार पडेल." ही कदाचित् व्याजोक्ति असेल, तथापि ह्या चौघांपैकीं आपण एक असावें हें मनांत बाळगा. तुम्हीं एकदां कोणास मित्र म्हणविला म्हणजे त्यास जतन करून ठेवा. त्याची नेहमीं गांठ घेत जा. कारण, ज्या मार्गानें कोणी कधीं जात येत नाहीं, त्यांत गवत व कांटेकुटे माजून त्याचा मागमूसहि नाहींसा होतो. तद्वत् मैत्री नेहमीं आपल्या मित्रांस भेटून कायम ठेविली नाहीं, तर ती नष्ट होते. आज एथे तर उद्यां तेथे, असें चंचल प्रेम निष्फळ होय.

मित्र झाला म्हणून, त्यास असंतोष होईल असें वर्तन ठेवण्याचा आपणास अधिकार पोंचत नाहीं. कित्येकांस आपल्या मित्रांची योग्यता ते नाहींसे होत पावेतों कळत नाहीं. अशा मित्रांचा त्यांचे मागें बहुमान केला तरी तो निरुपयोगी होय. " मेलेल्या मनुष्याचे सन्मानासाठीं मोठी मौल्यवान् समाधि बांधिली तरी पुष्कळ पैका धोंड्यामातींत घातल्याचेंच फक्त श्रेय येतें. "

" जो कोणी आपल्या निर्जीव पडलेल्या मित्राच्या चितेजवळ उभा राहून आपणास सदैव अंतरलेल्या मि-

१ पास्कल् २ अनूक्स्या गोरास ३ रस्किन्

त्राच्या सहवासाचा विचार करील, व आपण आतां कितीहि प्रेमाकुल होऊन आक्रोश केला तरी आपल्या मित्राची एकदां बंद झालेली नाडी पुन्हां उडूं लागणार नाहीं अथवा घटकाभर दिलेल्या दुःखाचें पारणें त्या शवांतून गेलेल्या जीवात्म्यासमक्ष यत्किंचित् सुद्धां आतां फेडितां येणार नाहीं, असें ज्यास वाटेल, तो फिरून आपल्या मित्राच्या जिव्हाळ्यावर घाव घालून जोडिलेल्या ज्या पापाचें प्रायश्चित्त त्याच्या अस्थींसमोरच फक्त फेडितां येतें, असें पाप मुद्दलींच करणार नाहीं."

मृत्यूनें मैत्रीचा शेवट होतो असें नाहीं. "आपले मित्र जरी दूर असले, तरी जवळच असल्याप्रमाणें आहेत. ते विपन्न असले तरी संपन्न, अशक्त असले तरी सशक्त व मृत असले तरी जिवंतच आहेत." हें म्हणणें कित्येकांस कोडेंच आहे असें वाटेल, परंतु ज्यानें वरील उद्गार काढिला आहे त्यानेंच तें उलगडिलें आहे. तो म्हणतो कीं, "सिपिओ जरी मेला आहे, तरी तो मला जिवंतच आहे व नेहमीं तो तसाच राहील. कारण त्याचे सद्गुण मला फार आवडतात व त्याची थोरवी अद्यापपर्यंत नष्ट झाली नाहीं. माझ्या नशिबानें व सद्दैनें मला जें कांहीं महत्त्व मिळालें आहे तें सिपिओच्या मैत्रीच्या पासंगास सुद्धां येणार नाहीं."

जर आपण आपले मित्र, त्यांच्या संपत्तीकडे न पहातां योग्यतेकडे पाहून निवडले, व मित्रजोड ह्या अलभ्य देणगीचा उपभोग घेण्यास आपण पात्र असलों, तर त्यांचा आपल्यास नेहमीं समागम घडेल; ते दूर असले तरी ज-

१ सिसरो

वळच असल्यासारखे होतील व ते इहलोक सोडून गेल्या-
नंतरहि, त्यांची आपल्यास सुखकर आठवण राहील.

( श्लोक )

"काल: सुप्तेषु जागर्ति, कालोहि दुरतिक्रम:
काल: सर्वेषु भूतेषु चरत्यविधृत: सम: "

**—महाभारत**

**भावार्थ:**—सर्व प्राणी जरी निजले, तरी काल जागृत तो; त्याचें उल्लंघन कोणाच्यानेंहि करवत नाहीं; काल सर्व भूतांचे ठायीं समरूपानें राहातो.

# प्रकरण ६

## वेळेचें मोल

सर्व सुखसाधनांचें महत्त्व वेळेवर अवलंबून आहे. मित्र, ग्रंथ, आरोग्य, प्रवास अथवा गृह इत्यादिकांचा उपभोग घेण्यास आपणास वेळच नसला तर त्यांचा काय उपयोग? वेळ म्हणजे पैसा, असें लोक म्हणतात, परंतु तो आपला प्राणच म्हटला असतां चालेल. असें असूनहि जे लोक प्राणाचें रक्षण होण्याकरितां जिवापाड अट्टहास करितात, त्यांस वेळ वृथा वेंचिल्याचें कांहींच वाटत नाहीं.

अमृतराय म्हणतात, कीं—

" गेलि आजचि घडी न ये उद्यां. "

" जो अत्यंत ज्ञानी आहे, त्यास फुकट वेळ गेल्याचें फारच दुःख होतें " असें डॅन्टीनें म्हटलें आहे. म्हणून काबाडकष्टांत आपला काळ जावा अशी मनुष्यानें इच्छा करूं नये. आपण आपला वेळ निष्कलंक व सर्वमान्य उपभोगांत, आरोग्यदायक खेळांत अथवा इष्टमित्र व कुटुंबाचीं माणसें यांच्या सहवासांत घालविला, तर त्याचा चांगलाच व्यय झाला. निरनिराळे खेळ खेळल्यानें शरीर निकोप राहून आपले अवयव बोजड न होतां कह्यांत राहतात, हा कांहीं लहानसान फायदा नाहीं. शिवाय उत्तम व्यायाम केला तर कित्येक मोहांस दाद न देण्याचें सामर्थ्य आपल्या अंगीं येतें.

आह्मांस हवें तें काम करण्यास वेळ फावत नाहीं,

अशी तक्रार करण्यांत कांहीं अर्थ आहे असें वाटत नाही खरोखर पाहतां, आपण एखादी गोष्ट करण्याचें मनांत आणिलें तर आपणास वेळ निर्माण करितां येतो. कारण उद्योग करण्याची इच्छा असल्यास वेळाची उणीव कधी पडावयाची नाहीं. विश्रांतीच्या वेळांत आपण कांहीं काळ आळसांत घालवितों, म्हणून विश्रांतीचें महत्त्व मानावयाचें नाहीं; परंतु ती घेतल्यानें आपलें आवडतें काम करण्यास आपणास जास्ती उमेद येते, म्हणून तिची योग्यता मानिली आहे.

" निरनिराळ्या माणसांबरोबर निरनिराळ्या पावलांनीं वेळ धांवत जात आहे. तो सात्त्विक चालीनें कोणाबरोबर चालतो, दुडके चालीवर कोणाबरोबर जातो, भरधांव कोणाबरोबर पळतो आणि कोणाजवळ तो स्तब्ध उभा राहतो, हें आपणांस सांगतां येतें. "[१] कारण काळाची गणना घडींवर नसून, त्याच्या सदुपयोगावर असते.

( श्लोक )

" स्तविति नच विशालें वर्तुलें हीं म्हणूनी;
परि असति सुयंत्रे रेखिलीं जीं प्रमाणी.
तशिच जनि न कीर्ती, दीर्घजीवित्व पावे.
लघु तरि बहुकार्यें व्यापिलें तें, स्तवावें. "

—वालर

" ह्या जगांत आळश्यासारखा दुसरा उधळ्या नाहीं. आतांच उपयोग केला असतां जी घटका अमोल ठरते व एकदां गेली म्हणजे कोणत्याहि युक्तीनें कालत्रयीं परत आणितां येत नाहीं; ती घटका तो व्यर्थ झुगारून देतो."[२] आळस हा मनुष्याचा खरोखर शत्रु आहे.

१ शेक्सपिअर २ जेरिमी टेलर

" आलस्यं हि मनुष्याणां शरीरस्थो महान् रिपुः "

—भर्तृहरि

**भावार्थः**—आळस हा मनुष्याच्या शरीरांत राहणारा त्याच एक मोठा शत्रु होय.

( ओंवी )

" आळस उदार नागवणा, आळस प्रयत्न बुडवणा,
आळसें करंटपणाच्या खुणा प्रकट होती. "

—रामदास

आयुष्याची गणना वर्षांवरून ज्ञानी करीत नाहींत. आयुष्य जरी अल्प असलें, तरी त्या तितक्या अवसरांत बहुत पराक्रम, विचार व परोपकार करून, तें यत्किंचित् देखील सुनें जाऊं दिलें नाहीं, तर तें दीर्घ आयुष्यच समजावें.

( श्लोक )

" न तेन वृद्धो भवति येनास्य पलितं शिरः
यो वै युवाप्यधीयानस्तं देवाः स्थविरं विदुः "

—मनु

**भावार्थः**—नुसते केंस पांढरे झाल्यानें मनुष्यास वृद्धत्व येत नाहीं. जो ज्ञानी आहे तो अल्पवयस्क असला, तरी त्याला देवादिकहि वृद्ध मानितात.

" आपल्या ह्या विविध व सुंदर आयुष्याचे दिवस आपल्या बोटांवर मोजण्यासारखे थोडे आहेत. या थोड्या अवधींत, आहार, निद्रा वगैरे तामस बुभुक्षा तृप्त करून, जे परोपकार, ज्ञान, स्फूर्ति वगैरे विषय केवळ आपल्या सूक्ष्म व सत्त्ववृत्तीसच आकळितां येतात, त्यांचे तृप्तीस वेळ फावावा कसा ? या लोकयात्रेतील नानाविध व्यापार आपल्या हातून एका मागून एक असे जलद पार पडून आ-

पल्या उन्नत व सत्य विचारांचे जे विषय, तसेच जे शुद्ध व उत्तम आचारविचार आपल्या जन्माचें खरें मर्म होय, त्यांजवर आपली सदैव दृष्टि कशी राहील ? खरोखर पहातां, निर्मळ रत्नासारखें स्वतः सतेज राहून, दुसऱ्यास प्रकाशमय करून सोडणारा व आनंदमय असा आयुष्यक्रम जर साधला, तरच जन्माचें सार्थक होय. ह्या जगताची जी एकसारखी राहाटी चालली आहे तीस नुसतें अनुसरून पशुपक्षी अथवा अज्ञान लोक यांसारखें 'गतानुगतिको लोको' या न्यायानें आयुष्य घालविणें हें जन्माचें चीज नव्हे. आपल्या देखत सर्व कांहीं लयास जात आहे, त्यांतच आपल्यास एकादी स्फूर्ति होऊन मनुष्यमात्राचे ज्ञानांत आपल्या हातून नवीन भर पडली व तिच्या साहाय्यानें आहार, व्यवहार व निद्रा या कंटाळवाण्या बंधनांनीं जखडलेलें मनुष्याचें मन मोकळें होऊन एक क्षणभर जरी उन्नतावस्था पावलें, तरी या जन्माचें खरें सार्थक झालें."

चेस्टरफील्ड यानें आपल्या मुलास जो उपदेश केल आहे तो नेहमींच घेण्यासारखा आहे असें नाहीं, तथापि वेळेच्या संबंधानें त्यानें काढिलेले उद्गार फारच श हाणपणाचे आहेत. तो म्हणतो " बाबारे, जितका वे तूं फुका घालविला तितका तूं आपल्या हितास मुकलास जितक्याचा तूं सदुपयोग केलास, तितकें तूं आपलें ध शहाणपणानें मोठ्या व्याजीं लाविलें असें समज. ह अल्प आयुष्याचा एक क्षण देखील निवळ आळसांत वडणें ह्यासारखें दुसरें आश्चर्य नाहीं. तर वेळेचें मे

मनांत आण व जो क्षण येईल तो व्यर्थ जाऊं न देतां त्याचा चांगला उपयोग कर."

( श्लोक )

" यो हि कालो व्यतिकामेत्पुरुषं कालकांक्षिणं,
दुर्लभः स पुनस्तेन कालः कर्मचिकीर्षुणा. "

—महाभारत

**भावार्थः** जो मनुष्य एकादें कार्य करण्याची उत्तम संधि इच्छीत असून ती आली असतां दवडतो, त्याला पुनः तें कार्य करणें आल्यास तशी संधि मिळत नाहीं.

तुर्क लोकांत अशी एक म्हण आहे कीं, सैतान आळशी मनुष्यास आपला अंकित करण्यासाठीं नेहमीं त्यास मोह घालतो. परंतु आळशी जो आहे तो तर उलटा आपण होऊन सैतानास आपलासा करून घेतो. "[1]गळकऱ्यासारखा सैतान आपल्या गळास मनुष्यांच्या आवडीप्रमाणें आमिष लावून त्यांस पकडतो; परंतु आळशी जे आहेत त्यांना धरण्यास त्यास मुळींच प्रयास पडत नाहींत. ते होऊन मोकळ्या गळास आपला गळा देतात. असें एका काव्यांत वर्णन केलें आहे." आळशी मनुष्य आपले मनास झिजवितो, "[2]त्याचें मन अगदीं जात्यासारखें आहे. त्यांत जर धान्य घातलें तर त्यास चिरडून त्याचें पीठ करितें. परंतु धान्य घातलें नाहीं तर तें एकसारखें फिरत राहून आपले आपणास झिजवून घेतें." मनुष्य काळजीनें हइस येतो; उद्योगानें येत नाहीं. "उद्यांचा विचार आज करूं नको" ही सल्ला देणारानें असेंच मानिलें असावें.

१ हिलर्ड २ ल्यूथर

" नास्त्युद्यमसमो बंधुः, कुर्वाणो नावसीदति. "

—भर्तृहरि

**भावार्थः**—उद्योगासारखा आप्त नाहीं; कारण तो करणारा कष्ट पावत नाहीं.

" रानांत फुलें कशीं उगवतात याचा विचार करा. तीं श्रम करीत नाहींत; विणीत नाहींत; परंतु त्यांपैकीं एका फुलाच्या पोषाकासारखा सुंदर पोषाक इंद्राचा सुद्धां नसेल. जें आज आहे परंतु उद्यां जाळण्याच्या उपयोगीं पडतें, अशा रानांतील गवतास जर परमेश्वर असें मनोहर रंगरूप देतो, तर अल्प मतींनो ! तुम्हांस तोच देव वस्त्रप्रावरण देणार नाहीं काय ? "

( श्लोक )

" येन शुक्लीकृता हंसाः शुकाश्च हरिताः कृताः,
मयूराश्चित्रिता येन, स ते वृत्तिं विधास्यति. "

—हितोपदेश

**भावार्थः**—हे मनुष्या, ज्या ईश्वरानें हंसांचा रंग पांढरा, पोपटांचा हिरवा व मोरांचा चित्रविचित्र केला आहे, तो तुझ्याहि पोटाची तजवीज करील.

परंतु बाबांनो ! तुम्हांस उद्योग केला पाहिजे. ह्या रानांतील फुलांस देखील उद्योग केल्याशिवाय हें सौंदर्य येत नाहीं. वनस्पति देखील मोठ्या उद्योगशील आहेत. फुलें आपल्या मुळांत पुढल्या वर्षी उत्पन्न होणाऱ्या फुलांचें जीवन सांठवून ठेवीत असतात. परंतु असा उद्योग करीत असतां त्यांस चिंता ती ठावकी नसते.

" कोळास पंख आहेत. काळाचा निर्माणकर्ता जो परमेश्वर त्याजकडे वेगानें उडत जाऊन त्यास आपल्या

१ मिल्टन्

वर्तनक्रमाची तो वार्ता कळवितो. आपण किती जरी विनवणी केली, तरी गेली घडी परत येत नाहीं अथवा ती आपला वेग कमी करीत नाहीं. फक्त दवडलेली घडी देवाच्या घरच्या वहींत आपल्या नांवें पडते. व्यर्थ काळ घालविल्याचें फळ काय, हें जर आपल्यास चांगलें कळलें तर आपण त्याचा सदुपयोग केल्याशिवाय त्यास रिकामें अथवा आपली आयुष्यक्रमाची दुर्वार्ता घेऊन जाऊं देणार नाहीं. जर आपला काळ आपली सुवार्ता तसेंच सुकृताचें फळ घेऊन परमेश्वराकडे गेला व त्यानें पापपुण्यांचे झडतीच्या वेळेस आपल्या सुकृताची साक्ष दिली, तर आपण केवढे सुखी ! "

वेळ पळतो म्हणून म्हणतात; परंतु तो खरोखरी पळत नाहीं. आपण तो व्यर्थ खर्चितों. वेळच नसलेल्या एक[1] वेळ पुरवेल, परंतु विनाकारण घालविलेल्या वेळासारखी दुसरी हानीच नाहीं. "मीं आजपर्यंत काळ व्यर्थ घालविला, आतां काळ मला घालवीत आहे " ही दुसऱ्या रिचर्डची उक्ति किती विचार करण्यासारखी आहे बरें !

" जो आपला वेळ जपून घालवितो, तो कोणाशीं सहवास करावा अथवा न करावा व काय करावें व काय न करावें, याविषयींहि जपून वागतो. असें तो वागला नाहीं तर वाईट संगतीनें त्याचा काळ व्यर्थ जाऊन त्याची हानि होते, अथवा त्याचे हातून दुष्कर्म घडतें व एकंदरीनें तो जन्मास आला न आला असें होऊन पुन्हां भवभोंवऱ्यांत सांपडतो. "

मनुष्य सत्तर वर्षें जगतो असें मानिलें आहे. यापै-

१ जेरिमी टेलर

की थोडाच वेळ आपल्यास असतो. निद्रेंत, जेवणाखाणांत, पोषाकांत, व व्यायामांत किती वेळ जातो बरें? इतका वजा आल्यावर बाकी तो आपल्या हातीं किती लागणार?

" मी नांवाला पन्नास वर्षे जगलों आहें. यापैकीं फक्त दुसऱ्याकरितां मीं किती काळ वेंचिला हें लक्षांत आणिलें, म्हणजे मी तरणाच आहें असें मला वाटतें " हें लॅम्बचें म्हणणें मनांत आणिलें म्हणजे दुसऱ्याकरितां वेंचिलला काळ एकंदर आयुर्मर्यादेंतून वजा करितां येत नाहीं. ज्याच्या योगानें आपल्यास व दुसऱ्यासहि कांहीं फलप्राप्ति झाली नाहीं, तोच तसा वजा झाला पाहिजे. परंतु दुर्दैवानें, वजा होणारा काळ थोडा असतो असें नाहीं.

" [1]कित्येक घटका आपल्या हातून हिसकल्या जातात, कित्येक चोरीस जातात; व कित्येक आपोआप निसटून पळतात. " परंतु त्या एकदां गेल्या म्हणजे कोणत्याहि उपायानें फिरून परत येत नाहींत.

स्वित्सर्लंदांत एक ज्ञानी पुरुष रहात होता. त्याचें उत्पन्न सारें वर्षाचें हजार रुपये असून, त्यांपैकीं कांहीं तो एक लहानसा अजबखाना तयार करण्याकडे खर्च करीत असे. त्यास एका गृहस्थानें विचारलें कीं, तुम्ही एकादी नोकरी कां पत्करीत नाहीं? त्यानें उत्तर दिलें कीं, मला जो वेळ मिळतो तो मला सोन्यारुप्यापेक्षांहि अधिक मौल्यवान् वाटतो, म्हणून मी आपलें एक पळ देखील द्रव्यसंपादनांत घालविणार नाहीं.

वेळ ही देवाची एक मोठी देणगी असून, प्रत्येक दिवस ही एक लहानशी हयातच आहे. लंदनसारख्या श-

[1] सेनेका

शहरांत राहिल्यापासून काय काय मनोरंजनाचीं साधनें मनुष्यास उपलब्ध असतात याचा घटकाभर विचार करा. तेथें सर्व जगांतील व सर्व भाषांतील ग्रंथसंपत्तीचा उपभोग घेण्यास सांपडतो. राष्ट्रीय चित्रालयांत गतपिढींतील व 'रॉयल अॅकॅडेमी' व अशाच दुसऱ्या चित्रालयांत या पिढींतील मोठमोठ्या जगद्विख्यात चित्रकारांनीं काढिलेलीं सुंदर चित्रें पहाण्यास सांपडतात. तेथील अजबखाना इतका मोठा आहे कीं, तो सर्व पहाण्यास आजपर्यंत एकास तरी वेळ मिळाला असेल कीं नाहीं याची भ्रांतिच आहे. या अजबखान्यांत सर्व कांहीं दृष्टीस पडतें. पूर्वीं पृथ्वीवर असून आतां जे निर्वंश झाले आहेत असे व हल्लीं जिवंत आढळतात असे राक्षसप्राय प्राणी, भूगर्भांत सांपडलेले विचित्र देह, सुंदर पक्षी, शिंपा, शंख व खनिज पदार्थ, अमोल रत्नें, वरून पडलेल्या उल्कांचीं शकलें, प्राचीनकाळच्या अजब चिजा, मनुष्यमात्राच्या निरनिराळ्या जाति दर्शविणारे विचित्र नमुने, तशींच नाणीं, कांचेचीं व चिनी भांडीं, एल्जिन एथें सांपडणारे संगमरवरी पाषाण, मझोलियमचे व डायनाचे देवालयाचे शेष राहिलेले भाग, मिसर व आसिरिआ देशांतील स्मारकें, इंग्लंदांतील लोकांच्या अतिप्राचीन पूर्वजांचीं ओबडधोबड हत्यारें, कस्तुरिकामृग व मॅमॉथ प्राणी, ग्रीक व रोमन लोकांच्या कौशल्याचे मनोहर नमुने, अशा आश्चर्यकारक वस्तूंचा त्या अजबखान्यांत संग्रह करून ठेविला आहे.

हालअपेष्टा व कष्ट कदाचित् कोणास टाळितां येणार नाहींत; परंतु मनुष्यानें उदासवृत्तीनें राहण्याचें कारण नाहीं. असें असून, बरेच लोक खिन्न असतात. हा त्यां-

चा स्वतःचा दोष असून ते ह्या जन्माचा निषेध करितात व मरणानंतर तरी आपणास सुखप्राप्ति होईल अशी आशा करीत बसतात.

" अरे ! तूं असा खिन्न कां होतोस ? हें फूल इतकें मनोहर कशानें झालें, ह्यास[redacted]के गर्द रंग कशानें चढले, गुलाबास सुवास कसा आला व सर्पाचे दांतांत विष कसें सांठलें हें तुला समजत नाहीं अगर पाखर्‍याच्या आनंदमय वागडण्याचें अनुकरण करितां येत नाहीं, तर मग असा उदास कां बसतोस ? जोंपर्यंत पृथ्वी. आप, तेज, वायु हे सर्व तुला गूढ आहेत व जी वस्तु तूं हातानें चांचपतोस तिचे धर्म तुला कळत नाहींत. व जोंपर्यंत मजबरोबर मनापासून बोल, मजला समजून घे, मला तुझी अंकित कर आणि माझा आशीर्वाद घे, असें म्हणून सृष्टि तुला आदरानें बोलावीत आहे, तोंपर्यंत असा उदास व आळशी कां राहतोस ? धिक्कार असो तुला ! कांहीं शीक, कांहीं कर, कांहीं समजून घे व तुझ्या खिन्नतेचें मजजवळ नांव सुद्धां काढूं नको !



१ सर फेल्प्स

(श्लोक)

" देशे देशे किमपि कुतुकादद्भुतं लोकमानाः,

* * * * सद्म भूयोऽप्यवाप्य,

संयुज्यन्ते सुचिरविरहोत्कण्ठिताभिः सतीभिः

सौख्यं धन्याः किमपि दधते सर्वसंपत्समृद्धाः "

—सुभाषित

**भावार्थः**—जे देशोदेशीं जाऊन अद्भुत चमत्कार पहातात. * * * * व परत आपल्या घरीं येऊन वियोगामुळें उत्कंठित झालेल्या भार्यापुत्रादिकांस भेटतात. ते धन्य पुरुष अभ्युदयाचे योगानें सुख पावतात.

# प्रकरण ७

## प्रवाससुख

या काळांत प्रवास जसा सोपा झाला आहे, तसा पूर्वी नव्हता. पूर्वी प्रवास खरोखर कष्टमय होता म्हणूनच ' किं सुखमप्रवासगमनं ' असा भर्तृहरीनें त्याचा निषेध केला असावा असें दिसतें. आतां तें सर्व कांहीं बदलून गेलें आहे.

प्रवास करणें झाल्यास, थ्येल्स, प्लेटो व पिथ्यागोरास या पुरुषांप्रमाणें पायांनीं करावा, असें कित्येक म्हणतात. हल्लीं लोखंडी रस्त्यानें प्रवास करणें, म्हणजे धांवत सुटणें होय. अशा प्रवासांत आपणास कांहीं दिसत नाहीं. परंतु हा दोष लोखंडी रस्त्यांचा नाहीं. जे देश पहाणें आपल्या पूर्वजांस पूर्वी अत्यंत दुरापास्त होतें, तेच आपणांस हल्लीं अल्प श्रमानें व जलद पहातां येतात, हा कांहीं लहानसान फायदा नाहीं. ह्या देशांतील सुंदर रानेंवनें, शांत पर्वत, आनंदजनक नद्या, सरोवरें, मैदानें, टेंकड्या, गड, देवालयें व इतर इतिहासप्रसिद्ध स्थलें, तशींच इतर देशांतील रम्यस्थलें, देखावे, आल्प्स्सारखे पर्वत व भूमध्य समुद्रासारखे समुद्र, युरोपांतील शहरें व त्यांत संग्रह करून ठेवलेल्या सुंदर वस्तु हीं सर्व थोड्या अवकाशांत आपणांस पहातां येतात हा केवढा फायदा !

म्हणून, ज्यास सवड व ऐपत आहे, त्यानें प्रवास केल्याविना राहूं नये. आपण जो देश पाहिला तो आपलाच होऊन बसतो. परंतु " प्रवासापासून सुख व्हावें अशी

१ सेनेका

ज्याची इच्छा असेल त्यानें प्रथम आपली वृत्ति प्रसन्न ठेविली पाहिजे."

एक अशी जुनी म्हण आहे कीं, 'मूर्ख जे आहेत ते भटकत फिरतात; परंतु शहाणे खरा प्रवास करितात.' "परकीय देशचे वकिलांची मुलाखत घेण्याकरितां भरविलेले राजांचे दरबार, जेथे मनसुबी चालली आहे अशा न्यायसभा, तशाच धर्मसभा, देवळें व मठ, त्यांत असणाऱ्या समाधि व छत्र्या, शहरांच्या व नगरांच्या तटबंद्या व किल्ले, तशींच बंदरें व नांगरवाडे, जुनाट व मोडकळीस आलेल्या इमारती, पुस्तकालयें, विद्यालयें, व्याख्यानस्थळें व सभा, आरमारें व इतर व्यापाराचीं जहाजें, घरें व मोठमोठ्या शहरांजवळील राजबाग व आरामस्थलें, शस्त्रगृहें, दारूखाने, उदमी लोकांचे फड, व्यापाराचे बाजार व वखारी, अश्वशाला, जेथे शस्त्रक्रीडा व सेनाशिक्षण चाललें आहे अशीं स्थानें, जेथे वरिष्ठ प्रतीचे लोक जातात अशीं नाटकगृहें, रत्नें व खिलाती ठेविलेले जामदारखाने, अजबखाने, सारांश सर्व दर्शनीय वस्तु प्रवाश्यानें पहाव्या."[1]

परंतु हें इतकें पहाण्यास वेळ लागतो व कधी कधीं ह्या गोष्टी पहाण्याचे हेतूनें आपण प्रवासहि करीत नाहीं. एकाच ठिकाणीं आपण पुष्कळ दिवस प्रवास केला, तर वरील शिफारसीप्रमाणें वर्तणें उत्तम होय. परंतु प्रवासाचा हेतु एकच नाहीं. महिन्यांचे महिने कामधंदा करून जी आपणास सुटी मिळते, त्यांत विश्रांति व आरोग्य प्राप्त होण्याकरितां तसाच थारेपालट व व्यायाम होण्याक-

[1] बेकन

रितांहि आपण प्रवास करितों. अशा प्रसंगीं देखील, ज्यास डोळे म्हणून आहेत, तो ज्ञान व आरोग्य हीं दोन्ही एकेच वेळीं संपादन करितो. आपण निरनिराळ्या स्थळांचीं हुबेहुब व खरीं वर्णनें, तसेंच नकाशे व चित्रें जरी पाहिलीं असलीं, तरी तीं स्थळें प्रत्यक्ष पाहिल्यानें जें पूर्वी आपल्या दृष्टीस पडलें नाहीं तें दिसून येतें. ही गोष्ट पर्वत, बर्फाचे रानमाळ, राजवाडे व देवालयें अशा वस्तूंस मात्र लागू पडते असें नाहीं, तर अगदीं साध्या वस्तूंसहि पडते. उदाहरणार्थ, पिरामिडचीं चित्रें आपण पाहिलीं आहेत. त्यांचा आकार अगदीं साधा आहे. वर्णन करणें झाल्यास त्यांचे सर्व गुण आपणांस सांगतां येतील. चित्रांवरून मनांत आलेल्या कल्पनेबाहेर ते मोठे असतील अगर त्यांचें रंगरूप व ठेवण निराळी असेल असें होणार नाहीं. तथापि ते प्रत्यक्ष आपण पाहिले म्हणजे पूर्वींची त्यांची कल्पना त्यांच्या खऱ्या स्वरूपाची निवळ छाया आहे असें भासू लागतें. त्यांच्या प्रत्यक्षदर्शनानें निर्जीव प्राण्यांत जीव घातल्याप्रमाणें आपल्या त्यांजविषयींच्या पूर्वींच्या कल्पना जणु काय सजीव होतात.

जुन्या करारांत फार प्राचीन कुटुंबव्यवस्थेचें जें वर्णन केलें आहे, त्याचें चित्राहून विशेष हुबेहुब असें स्वरूप आशियाखंडांतील देशांत एक आठवडाभर प्रवास केला तर लक्षांत येतें. ही गोष्ट इतिहासास लागू आहे. जे अथेन्स आणि रोम या नगरांत जाऊन राहतात, त्यांस ग्रीक व रोमन यांचे इतिहास फार चित्तवेधक वाटतात, व त्यांत जर त्यांस इतिहासाचें चांगलें ज्ञान असलें, तर तीं स्थळें तर अत्यंत रमणीय व मनोहर भासतात.

तथापि आपल्या डोळ्यांस जें दिसेल त्याहून अधिक उत्तम वर्णनें व चित्रें आपणांस कांहीं दाखवीत नाहींत असें नाहीं. चित्रें आणि वर्णनें पाहून व वाचून स्थलांचें किंवा वस्तूंचें जसें साद्यंत स्वरूप कित्येकांचे मनांत भरतें, तसें प्रत्यक्षदर्शनानें भरत असेल कीं नाहीं याची शंकाच आहे. चित्रावरून एकाद्या वस्तूची कल्पना कदाचित् ठळक येत नसेल; कदाचित् तिचें रूप, ठेवण व तपशील हीं हुबेहुब मनांत येत नसतील; परंतु एवढें खरें कीं, ज्यांस प्रवास करितां येत नाहीं त्यांचें वर्णनें व चित्रें यांजपासून चांगलें मनोरंजन होतें, व ज्यांनीं पूर्वीं प्रवास केला आहे त्यांस तर अशा चित्रावलोकनानें स्वतः पाहिलेल्या सुंदर देखाव्यांची व प्रवासाची आठवण होऊन अमर्याद आनंद होतो.

ज्या सुंदर पृथ्वीवर आपण राहतों, तिची बहुतेकांस फारच थोडी माहिती असते, हें एक आश्चर्य आहे. एक प्रवासी[1] असें सांगतो कीं, " मी राकी पर्वतावर प्रवास करीत असतां एक वृद्ध पाद्री तेथें पाहिला. त्यास तेथें पाहिल्यानें जें मला नवल वाटलें, तें माझ्यानें झांकवेना. त्या पाद्रीनें अशी माझी आश्चर्ययुक्त मुद्रा पाहून माझ्याशीं बोलण्यास सुरुवात केली. तो म्हणाला कीं, मला एथें पाहून तुम्हांस आश्चर्य वाटलें हें मीं तेव्हांच ताडिलें. खरें पुसाल तर मी थोड्या महिन्यांपूर्वीं अत्यंत हैराण होऊन पडलों होतों. मला माझ्या वैद्यानें हातचें सोडिलें. एके दिवशीं मला झोंप आल्यासारखें होऊन वाटलें कीं, माझी आतां घटका खास भरली. इतक्यांत एक दूत

१ नार्मन् लॉकेर

मजपुढें येऊन उभा राहिला व त्यानें मला पुसलें कीं, ज्या सुंदर जगास आतांच त्वां सोडिलें, त्याजविषयीं तुला काय वाटतें ? हें त्या दूताचें भाषण ऐकून मला वाटलें कीं, ज्या पृथ्वीवर राहून आजपर्यंत परलोकांविषयीं उपदेश करीत आलों त्या पृथ्वीची तर मला कांहींच माहिती नाहीं. मग मीं लागलींच निश्चय केला कीं देवानें मला जर वांचविलें तर मी प्रवास करून तिची कांहीं माहिती करून घेईन. त्या निश्चयान्वयें मी हल्लीं एथे आलों आहे."

ह्या पाद्रीचें अनुकरण करण्यासारखे आपणांपैकीं थोडेच लोक स्वतंत्र असतील. परंतु राकी पर्वतापर्यंत आपणांस जरी प्रवास करितां येणार नाहीं, तरी आसपास जे देश आहेत ते पहाण्यास आपणांपैकीं पुष्कळांस सवड सांपडेल.

नुसत्या वर्णनानें कोणत्याहि वस्तूचें अगर स्थळांचें रूप साद्यंत कळणार नाहीं, तथापि वर्णनें वाचल्यानें होणारा फायदा कांहीं अल्प नाहीं. ही गोष्ट जगद्विख्यात गृहस्थांनीं जीं शब्दचित्रें काढिलीं आहेत तीं वाचकांस दाखवून व्यक्त करूं. टिंडालनें खालीं केलेलें वर्णन वाचणें व आल्प्स् पर्वतांत एक तासभर घालविणें ह्या दोन्ही गोष्टी सारख्याच नाहींत काय ?

" मीं हा अद्भुत देखावा पाहून नंतर ब्लॅंग, काम्बिन व अशाच दुसऱ्या हजारों लहानमोठ्या शिखरांकडे नजर फेंकिली. हीं शिखरें एकत्र जमून जणुकाय नुकत्याच उदयास आलेल्या बालसूर्याचा जयजयकार करीत आहेत असें त्यावेळीं मला भासलें. नंतर मीं आपण होऊन स्वतःस पूर्वी पुष्कळ वेळां केलेला प्रश्न फिरून केला कीं ही एवढी विशाल कारागिरी कोणीं केली अ-

सावी ? पृथ्वीच्या ओबडधोबड टेंकाडांतून अशीं हीं चित्रविचित्र व प्रचंड शिखरें कोणीं कांतून कोरून काढिलीं असावीं ? या प्रश्नाचा खुलासा लागलांच झाला. सदा तरुण, सदा बलवान् आणि अशीं हजारों विश्वें बनविण्यास समर्थ असा हा कारागीर त्याच वेळेस पूर्वेकडून मार्ग क्रमीत वर येत होता. ज्या जलौघांनीं ह्या दऱ्या खोदून तयार केल्या, त्यांचें पाणीं ह्यानेंच आसमंतात नेलें; ह्यानेंच पर्वतशिखरीं बर्फाचे रानमाळ स्थापिले व ते गुरुत्वाकर्षणशक्तिरूप नांगरानें ओढून हीं खोरीं बनविलीं; व हाच कारागीर युगांचीं युगें अशीच कामगिरी करून हे विशाल पर्वत सपाट करील व त्यांस समुद्रांत वाहून नेईल, त्यांचे ठिकाणीं भावी खंडांचें बीज रोंवील, व हजारों वर्षांनीं पुढें येणाऱ्या पिढीस त्या ठिकाणीं वावरी माती दृष्टीस पडून जे खडक हल्लीं जंगफ्रा पर्वताचें ओझें वाहत आहेत त्यांजवर धान्याचीं शेतें डोलतांना दिसतील."

नद्यांचा चित्तवेधक इतिहास अद्यापि कोणीं लिहिला नाहीं. सर्व नद्या पूर्वीं ज्या पात्रीं वाहत होत्या, त्यांतून त्या हल्लीं वाहत नाहींत. ऱ्होन नदीसारखा जबर प्रवासी दुसरा नाहीं. ह्या नदीच्या उगमाजवळील व व्हाले प्रांतांतील प्रवाह पूर्वीं डान्यूब नदीस मिळून, काळ्या समुद्रांत पडत असे, असें मानण्यास कारण आहे. पुढें तोच ऱ्हाइन व टेम्स या नद्यांस मिळून, व स्कॉटलंद व नॉर्वे या दोन देशांस फार प्राचीन काळीं जोडणाऱ्या अशा दूरच्या प्रदेशांतून वहात जाऊन आर्टिक समुद्रास मिळत असे व अलीकडे थोड्या वर्षांत तो भूमध्य समुद्रास मिळाला आहे.

वरील अनुमान खरें असो किंवा खोटें असो, एवढें खरें कीं जर्मनींतील ऱ्हाइन व स्वित्सर्लंदांतील ऱ्हाइन यांत कांहीं साम्य राहिलें नाहीं. शॉफहसेन एथें जो मोठा धरणीकंप झाला, त्यानें ऱ्होन नदीचें स्वरूप अगदीं पालटून टाकिलें आहे. "[1]जेथे ह्या नदीचें पाणी, कड्यावरून उडी घेण्याचे पूर्वीं अतिशय शीघ्र गतीनें वाहत जातें तेथे उत्तर किनाऱ्यावर घटकाभर उभे राहा. एथे पाणी वळून त्याची एक सुंदर कमान होते; तिला कोठे भंग दिसत नाहीं; नंतर तेंच पाणी उडी घेण्याचे पूर्वीं कमानदार खडकास, २० फूट जाड अशा स्फटिकघुमटासारख्या घुमटानें आच्छादित करितें. हा घुमट इतक्या जलद वाहणाऱ्या पाण्याचा झालेला असतो कीं त्यास गति आहे कीं नाहीं हें कळत नाहीं. फक्त जेव्हां आकाशांतील उल्कांसारखा एकादा फेणाचा बुडबुडा वरून वाहत येऊन तीरासारखा त्यावरून धांवतो, त्या वेळेस ती गति लक्षांत येते. मध्येंच ह्या धबधब्यांतून फों करून एकादा तुषारफवारा बाणासारखा वर उडून आपणांस आपल्या सोज्ज्वलतेजानें चकित करून टाकितो; नंतर तो हवेंत नाहींसा होऊन भोंवतालचा प्रदेश प्रकाशमय करितो. इकडे खालीं चुरामुरा होऊन फेंसाळलेलें अत्यंत चंचल व जणु काय महा यातनांनीं तळमळत असलेलें पाणी, फेंसामुळें, पांढऱ्या ढगांतून दिसणाऱ्या आकाशाहूनहि अधिक निर्मळ दिसतें. पुढें धबधब्याचे हेलकाव्यानें स्रवणाऱ्या व टिबकणाऱ्या लोटांचे आकार दाण्यांनीं भरपूर भरलेल्या कणसांच्या मुडीसारखे बनून

१ रस्किन्

ते खालीं वर आंदोळत जातात व जेथे धबधब्याची घोर गर्जना कांहीं मंद होते तेथे शेवाळलेल्या खडकांवर शांत होतात. "

सौंसाट्यानें अगर मंदगतीनें वाहणाऱ्या नद्यांच्या अशा ऐश्वर्याचें जरी आपणास कौतुक वाटतें, तरी लहान ओहोळ व निर्झर यांच्या तारुण्यमदांत सैरवैरा वाहण्यानें, स्फटिकासारख्या निर्मलतेनें, व आनंदजनक मंजुळ शब्दानेंहि चित्त कमी वेधतें असें नाहीं. " स्वित्सर्लंद देशाच्या वरच्या प्रदेशांतील दऱ्या व खोरीं अखंड ओहोळांनीं फारच रमणीय झालीं आहेत. हे ओहोळ जणु काय केवळ उड्या घेण्याच्या हौसेनेंच अत्यंत अवघड स्थळांतून वाहत येऊन, मार्गांत जसा वायु वाहील त्याप्रमाणें दोहों बाजूंस मुठींच्या मुठी स्फटिकमणी उधळल्यासारखें जलबिंदु उधळितात. ते फारच शोभेनें वाहतात, परंतु त्यांत कारंज्याचा नियमित व कृत्रिम घाट अगर डौल कोठेहि दृष्टीस पडत नाहीं. नंतर ते ओहोळ गवतांत गुपचुप गुप्त होऊन, त्यांचें निर्मल व खोल पाणी त्यांतून पिशाचवत् गुप्तपणें मार्ग काढीत जातें. नंतर ह्या टेंकड्यांतून जाण्यास जणुकाय दिवस फार थोडा राहिला याची आठवण होऊन हे ओहोळ वचकल्यासारखे व घाईनें एकाएकीं खळ्ळ करून प्रकट होतात व हसत खेळत परंतु त्वरेनें पुढें चालूं लागतात. "

ह्याखालीं दिलेलें वर्णन वाचून भूमध्यसमुद्राच्या रम्य किनाऱ्याची शोभा व उत्तर आणि दक्षिण प्रदेशांतील वनश्रीमधील अंतर वाचकांचे मनांत येईल.

१ रस्किन्

" उत्तरेकडील भूप्रदेशांत पहावें तों जिकडे तिकडे दुतर्फा घनदाट झाडींतून मार्ग असून, त्यांतून गेलें असतां ज्यांत स्वस्थपणें गाई व बैल चरताहेत अशीं निवांत वाडगीं अथवा गायरानें आढळतात. ह्या घनदाट वृक्षगुंफा इतक्या शांत असतात कीं मनुष्यास एथे झोंप लागून त्याचें मन स्वप्नसृष्टींत गढून जातें अगर तो विचारांत मग्न होतो. परंतु दक्षिण प्रदेशांत आलिव्ह झाडांच्या शाखांच्या व पालवीच्या जाळ्यांतून झळकणारा समुद्रविस्तार व चकचकीत व निळें आकाश हीं दिसतात. वनप्रदेशाचे रंग तर विविध व झळझळीत असतात, परंतु त्यांतहि समुद्राच्या लाटांवर क्रीडा करणाऱ्या व डोळे दिपविणाऱ्या सूर्यबिंबाच्या तेजाची कमालच होते. क्षितिजाजवळील प्रदेशहि प्रकाशित असतात. एथे कोठेहि सृष्टिसौंदर्य लोपलेलें राहात नाहीं व कोणीकडे पाहिलें तरी मन उदास होत नाहीं. एथे सृष्टि आनंदानें नाचत बागडत आहे असें दिसतें. समुद्राच्या लाटा, सूर्यकिरण व छाया हीं देखील आनंदानें क्रीडा करीत आहेत असें भासतें. उत्तरप्रदेशांतील सवघड टेंकड्या व स्थिर असणारे ढग व एकंदर प्रदेशाचें उतरतें चढतें स्वरूप, यांस तेथील वृक्षांची गोंडस व गर्द पालवी फारच साजते; परंतु दक्षिणेंतील अफाट समुद्र, पर्वत आणि दऱ्या यांचे आकार, तेथील आलिव्ह झाडांची बाणासारखी तीक्ष्ण पालवी व सरळ शाखा यांच्या योगानें विशेष रेखिल्यासारखे दिसतात. एथे स्त्रीपुरुषेंहि त्यांचें आदिदैवत जो सूर्य त्याचे प्रकाशानें मोठीं तेजस्वी असतात. त्यांची यु-

१ सिमॉंड्स

द्धदेवता त्यांचें संरक्षण करिते व कामदेवता त्यांस सौंदर्य देते. ह्या अशा वनशोभेंत फक्त आलिव्ह झाडेंच असतात असें नाहीं. सोरेन्टो शहराजवळ दोन प्रचंड देवदार वृक्ष आहेत. त्यांखालीं उभें राहिलें तर तेथून केप्रो बेट दिसतें व व्हेसुविअसच्या पायथ्यास वेष्टणारी नेपल्सूची सर्व खाडीहि नजरेस पडते. आलिव्ह, नारिंग व गुलाब यांचीं दाट बनें सर्व किनाऱ्यावर पसरलेलीं असून तेथून समुद्रांतील शुभ्र इनेरिम नांवाचें द्वीप दृष्टीस पडतें. जंगली टेंकड्यांवर भव्य, सुवासिक, निरनिराळ्या रंगांच्या फलांनीं लवलेल्या व ज्यांच्या दंवानें थबथबलेल्या फांद्या डोक्यावर पसरलेल्या आहेत, अशा अनेक जातींच्या वृक्षांच्या राया आहेत. समुद्रकिनाऱ्याजवळ निरनिराळ्या वेली वृक्षांवर चढून त्या त्यांस आपल्या लांब व कोमल बाहूंनीं आलिंगन देत आहेत. कोठे कोठे वृक्षछायेंतील कोपऱ्यांतून द्राक्षघोंसांनीं लवलेले द्राक्षवेलींचे तुरे लोंबताहेत व त्याच वेलींच्या पल्लवमाला वृक्षांच्या फांद्याफांद्यांनीं लोंबत राहून त्यांजवर तरुण कपोतपक्षी बसून झोंके घेत आहेत. अशा या वनशोभेंत निरनिराळे व मनोहर ध्वनिहि कानीं पडतात. मेंढ्यांचें बें, मधुमाक्षिकांचा गुंजारव, बुलबुलांचें गाणें, कपोतांचें कण्हणें, प्रवाहांची झुळझूळ, बेडकांचें केंकटणें आणि देवदारांतून वारा वाहूं लागला म्हणजे कुजबूज केल्यासारखा होणारा शब्द असे निरनिराळे ध्वनि ऐकूं येतात. ह्या भूप्रदेशांत समुद्र आणि बनें कधीं एकसंगतीस नाहींत असें दिसतच नाहीं. जेथे ज़ावें तेथे समुद्र दृष्टीस पडतोच. जों जों पर्वतावर उंच चढावें तों

तों समुद्राचें अद्भुत सौंदर्य उदयास येतें. तोहि आपल्या बरोबर चढून वर येत आहे व आकाशापर्यंत विस्तारले- ला आहे असा दिसतो. कित्येक ठिकाणीं त्याचे पाण्यास आलिंगन रायांची चौकट होऊन त्याचा एक आरसाच बनतो. कोठे थोडासा रस्ता वळला कीं खालीं समुद्राचा शांत व निळा विस्तार दिसावयास लागतो. कोठे उंच प- र्वतावर चढून एकाद्या वनांत उभें राहिलें तर, दोहों बा- जूंस समुद्र, मध्यें पर्वताचा मुळका आणि त्याचे पाय- थ्याशीं ठिकठिकाणीं वसलेलीं खेडींपाडीं व खुद्द समुद्रांत सुंदर बेटें व शुभ्र शिडें, अशी शोभा दृष्टीस पडते."

उष्णकटिबंधांतील सूर्योदयाची शोभा अशीच मनोहर आहे. "[1]एथे उन्हाळ्यांत सकाळचे पांच वाजेपर्यंत पूर्ण अंधार असतो. परंतु ह्याच सुमारास रात्रीची शांतता मो- डून पक्ष्यांची किलबिल कानीं पडते व पूर्वक्षितिजावर अ- रुणोदयाचीं चिन्हें दिसूं लागतात. थोड्या वेळानंतर पा- कोळींचें खिन्न ओरडणें, बेडकांचें निरनिराळें डेरकणें, जंगली सारिकांची किलवाणी शीळ व ठिकठिकाणच्या इतर पशुपक्ष्यांचे शब्द ऐकूं येतात. साडेपांच वाजतां, सूर्याचा मंदप्रकाश दृष्टीस पडावयास लागतो; हळूहळू तो वाढूं लागून पावणेसहाचे सुमारास चांगला प्रकाश पडतो. पुढें पाव तास अशीच स्थिति असते. नंतर एकाएकीं क्षि- तिजावर सूर्याची प्रभा दिसावयास लागून पालवीवर दहिं- वराचे बिंदु रत्नांसारखे चमकूं लागतात व सोन्यासारखा प्रकाश रानांत शिरून सृष्टीस जागें करितो आणि सर्वांस आपापल्या उद्योगधंद्यांस लावितो. पक्षी किलबिल करून

१ वालेस्

इकडे तिकडे बागडतात; रावे बोलतात; माकडें खेंकसतात; मधमाशा फुलांतून गुंजारव करितात; आणि झळझळीत पतंग मंदगतीनें इकडे तिकडे फिरतात अगर पंख पसरून ऊन्ह घेत खुशाल बसतात. ह्या प्रदेशांत सूर्योदयानंतरच्या पहिल्या घटकेचें सौंदर्य कांहीं अलौकिक असतें. सर्व सृष्टि रात्रीच्या थंडाव्यानें टवटवीत झालेली दिसते; नवीं पानें व फुलांच्या कळ्या आपल्या डोळ्यांदेखत उमलूं लागतात; आणि झाडांचे कोंब आदल्या दिवसाहून बरींच अंगुळें अधिक वाढल्याचें आढळून येतें. एथील हवाहि अत्यंत मनोहर असते. सकाळची गुलाबी थंडी जाऊन शरीरास हितकर अशी हवेंत ऊब येते. आणि सूर्याचे तेजानें ह्या प्रदेशांतील वृक्षपालवी प्रकाशित होऊन, चित्रकारांनीं आपल्या कलमानें व कवींनीं आपल्या वाणीनें पृथ्वीसौंदर्याची कमाल उडवून केलेल्या वर्णनाचें चित्र एथे डोळ्यांपुढें उभें राहतें."

मिसर देशांतील थीब्स शहरीं तिसरा अमिनोफिस याचा विशाल पुतळा आहे; त्याचेंहि वर्णन असेंच चांगलें आहे. "[1] सूर्य अस्तास जात होता. आफ्रिकेंतील पर्वतांची रांग सूर्यास्तप्रकाशानें तांबडी भडक झाली असून खालचीं रानें हिरवींगार दिसत होतीं आणि संध्याकाळचे छायेनें पर्वतांच्या मोठमोठ्या अनादि भेगा लोपून गेल्या होत्या. मीं मागें वळून पुतळ्याकडे पाहिलें, तों ते पर्वतापुढें उभे असून त्याचेच अवयव आहेत व ते मनुष्यकृती नसून इतर सृष्टीप्रमाणेंच निर्माण झाले असावे, असें मला वाटावयास लागलें."

१ डीन स्टॅन्ली

ह्यासारखीं सुंदर वर्णनें आणखी देण्याचा मोह होतो खरा, परंतु दिलीं इतकीं पुरे आहेत. अशीं वर्णनें वाचून प्रवासांत घालविलेल्या सुखकारक दिवसांची आठवण होते. कारण प्रवासापासून झालेलें हित आजन्म टिकतें आणि आपण घरीं बसलों असतां वारंवार "व्हेनिस, जिनोआ अथवा मान्टिरोसा यांसारख्या सुंदर स्थळांचें मनोहर स्वरूप आपल्या डोळ्यांपुढें उभें राहून प्रवासांत शहाणपणानें घालविलेल्या काळाप्रमाणें मनास समाधान होतें."

प्रवासाची आपल्यास हौस असली व त्यापासून मनास सुख होत असलें, म्हणजे तेणेंकरून आपण गृहसुखास अंतरतों असें नाहीं. गृहसुखाचा पूर्ण उपभोग व्हावयास मधून मधून प्रवास घडलाच पाहिजे. प्रवास हे श्रम असून गृहसुख ही विश्रांति होय, व ह्या दोन्ही गोष्टी एकमेकांस साह्यकारी होत. प्रवासाचीं जीं सुखें म्हणून गणिलीं आहेत त्यांतच प्रवासाहून घरीं परत येतांना जो एकप्रकारचा आनंद होत असतो त्याची गणना आहे.

१ फेल्प्स्

आपल्या घरासारखें दुसरें स्थळ जगतांत कोठेंहि नाहीं. "

# प्रकरण

## गृहसुख

उद्योगधंदा मेहनतीनें व व्यवस्थितपणानें पार पाडल्यावर जी कांहीं दिवस आपणास सुटी मिळते, तींत प्रवास करण्यास निघणें, किंवा अशा प्रवाससुखाचा उपभोग घेऊन व नवीन कल्पनांनीं मन प्रसन्न व संस्कृत करून आपल्या घरच्या माणसांत, मित्रांत व ग्रंथांत येऊन पडणें, ह्यांपैकीं कोणती गोष्ट विशेष आनंदकारक आहे, हें ठरविणें मोठें कठिण आहे.

" एकाद्या वयस्क प्रवाश्यानें साहस करून केलेला अद्भुत परंतु विश्वसनीय प्रवास अथवा जलपर्यटन याचें ज्यांत वर्णन आहे असा एकादा ग्रंथ घेऊन आपल्या लहानशा घरांत वाचीत बसणें, यासारखें खरें सुख कोठेंहि सांपडणार नाहीं. "[1]

मेक्सिको, पेरू वगैरे देशांत प्रवास करणें अथवा पॅसिफिक बेटांतून जलपर्यटन करणें फारच रमणीय आहे; तथापि प्रेस्काटचे इतिहास व कप्तान कुक यांचें जलपर्यटनवृत्त अशा प्रकारचीं प्राचीन ग्रंथकारांनीं केलेल्या प्रवासाचीं वर्णनें हीं फारच मनोहर असतात. अशा ग्रंथांतून जुन्या समाजव्यवस्थेचें रूप चांगलें दाखविलें आहे. आपल्या दररोजच्या प्रवासाची मजल जरी ओटीपासून खोलीपर्यंत व खोलीपासून माजघरापर्यंतच असली तरी प्रवासग्रंथवाचनानें दररोजचा हाच प्रवास सुखकर

१ लीहन्ट

होईल. गृहसुखसाधनें जरी मर्यादित अशीं वाटलीं, तरी तीं अनंत आहेत. "आपण आपल्या खुर्चीवर बसून घर सोडिल्याशिवाय प्रवास करणें, निरनिराळीं स्थळें पहाणें, दूरदूरच्या मित्रांची गांठ घेणें, मनश्चक्षूनें निरनिराळे देखावे डोळ्यांपुढें आणून कल्पनेनें व आठवणीनें ते हुबेहुब वठविणें, हें बुद्धिसामर्थ्य आपण जर नेहमीं वाढवीत गेलों तर मग आपणांस काय पाहिजे!"[1] आपलें घर न सोडतां, पाहिजे तितका थोरपालट आपणांस करितां येईल; कारण, जसजसे ऋतु बदलतात तसतसें आपलें घरहि बदलल्यासारखें होतें. वस्तुतः घर एकच. परंतु आपल्या खोलींतून पाहिलें असतां निरनिराळ्या ऋतूंत निरनिराळी शोभा दृष्टीस पडते. वसंतऋतूंत वृक्षांस फुटलेली कोंवळी पालवी, पावसाळ्यांत जिकडे तिकडे पाणी व टवटवीत झाडें आणि हिंवाळ्यांत जोमांत आलेलीं हिरवीगार शेतें, स्वच्छ पाण्यानें भरलेल्या नद्या व सरोवरें अशी विविध वनश्री नजरेस येते. एकाच घरांत राहिलों तरी प्रत्येक दिवशीं देखील सृष्टिसौंदर्याचीं अनेक मनोहर रूपें आपल्या नजरेस पडतात. आकाशाची शोभा पाहून थोड्यास लोकांस आनंद होतो हें फार आश्चर्य आहे. सूर्योदयाचे वेळेस आकाशाचें सौंदर्य कसें असतें तें पहा. "प्रथम आकाशांत थोडी प्रभा पडून त्यांत सोन्यासारख्या पिवळ्या व निळ्या रंगाची झांक दिसते; नंतर डोळे दिपवून टाकणाऱ्या प्रकाशानें क्षितिजाची कडा उज्ज्वल होते. सूर्याचा अर्धगोल दिसतो न दिसतो तों एकदम पूर्णबिंब उदयास येतें. त्याचें तेज इतकें प्रखर असतें, कीं[2]

१ मॅकेन्झी २ प्रे

तो कांहीं वेळ स्पष्टहि दिसत नाहीं. असा देखावा पाहून मनास वाटतें कीं असें सौंदर्य कोणीं कधींच पाहिलें नसेल."

ज्यास डोळे म्हणून आहेत त्यास सकाळच्या व संध्याकाळच्या आकाशाचें ऐश्वर्य पाहून आनंदच होत गेला आहे. रस्किननें आकाशवैभवाचें वर्णन करितांना जें बुद्धिचातुर्य खर्चिलें आहे. तें वाचकांस अप्रतिम असें वाटल्याविना रहणार नाहीं. "खमध्यापासून क्षितिजापर्यंत सर्व आकाश. वितळून रस झालेल्या रंगांचा व अग्नीचा एक समुद्रच झाला आहे असें म्हटलें तरी चालेल. क्षितिजाजवळ काळ्या ढगाचा प्रत्येक कांठ सोन्याची लगड बनला आहे. स्वच्छ गुलाली. जांभळा. शेंदरी व ज्यांस भाषेंत नांवें नाहींत व ज्यांच्या स्वरूपाची आपल्या मनांत प्रत्यक्ष पाहिल्याशिवाय मुळींच कल्पना येत नाहीं अशा नानाप्रकारच्या रंगांनीं ढगांच्या लाटा सुशोभित झाल्या आहेत. आकाशाचा वरचा प्रदेश कोठें गर्द, कोठें निर्मल. कोठें फिकट निळा असा बनला आहे. व कोठें पारदर्शक धुक्यानें भरून सोन्यासारख्या स्वच्छ पिवळ्या व तांबड्या रंगांत त्याचा शेवट झाला आहे." असें आकाशाचें रंगरूप व ऐश्वर्य सर्व दिवस बदलत असतें. तरी "प्रायः बहुतेक लोक तें जाणत नाहींत हें मोठें आश्चर्य होय! आकाश हा एक परमेश्वरानें निर्माण केलेल्या सृष्टीचा भाग असून त्यांत मनुष्याचें मनोरंजन होण्यासाठीं व त्यास बोध व शिक्षण मिळण्यासाठीं जी त्यानें करामत केली आहे, तशी सृष्टीचे इतर सर्व भागांत केलेली नाहीं; असें असून त्याजकडे तर आपण

१ रस्किन्

अत्यंत दुर्लक्ष करितों. ईश्वरानें निर्माण केलेल्या कृतीं-पैकीं बहुतेकांची रचना, मनोरंजनाहून विशेष प्रधान असे दुसरे हेतु साधण्यासाठीं त्यानें केली आहे. परंतु आकाशाची गोष्ट तशी नाहीं. प्रत्येक तीन दिवसांनीं एकादा मोठा काळा व दिव्य ढग निळ्या आकाशांत येऊन जमीन भिजली व पुन्हा आकाश स्वच्छ झालें व सकाळीं व संध्याकाळीं दहिंवर करितां थोडी धुक्याची छाया पडली. म्हणजे त्याच्या अस्तित्वाचे सर्व हेतु साधल्यासारखे होतात. परंतु असें, निळें ढग, व धुकें नेहमीं न येतां, आपण जिवंत आहों तोंपर्यंत प्रतिदिवशीं व क्षणोक्षणीं एकामागून एक अशीं अनंत रूपांत. चित्रें व शोभा आकाशांत दृष्टीस पडतात. त्यावरून तें मुख्यत्वें आपल्या उपभोगासाठीं व आपल्या मनोरंजनासाठींच निर्माण केलें आहे असें म्हणल्यास चालेल."[1]

सर्वांस आतां म्हणजे आकाशाचें हें ऐश्वर्य नष्ट झालें असें नाहीं. "आकाशाचे चांदण्याखालीं पृथ्वीवर विश्रांति घेणें व आकाशाचें वैभव पहाणें. यासारखी दुसरी आनंददायक गोष्ट कोणती आहे?" "संध्याकाळ झाली कीं आतां कांहीं पहाण्यासारखें उरलें नाहीं असें समजून घराच्या खिडक्या बंद करण्याची चाल प्रशस्त दिसत नाहीं. "ज्यांत अनंत सुवर्णमणी बसविलेले आहेत असा आकाशविस्तार अथवा पृथ्वीवर चंद्रिका अंथरीत शांतरीतीनें मार्ग क्रमणारा चंद्र पहाणें यासारखा दुसरा आनंदच नाहीं. आकाशांतील तारा आपणांस कांहीं तरी बोध करीत असतात. अशा तारांनीं गच भरलेलें खगोलाचें

१ सेनेका  २ इमरसन्

अर्थ नेहमीं आपल्या दृष्टीस पडतें. तें जर आपण लक्षपूर्वक पाहिलें, तर त्यापासून आपणांस बोध व माहात्म्य झाल्याशिवाय रहाणार नाहीं." "तारांच्या साहाय्यानें आपण ह्या पृथ्वीवरील सागरांतून मार्ग काढितों म्हणून केवळ नव्हे, तर आपल्या शुद्धमनाच्या अंधारमय समुद्रांतूनहि त्या आपणांस वाट दाखवितात म्हणून त्यांचें मोठें महत्त्व मानिलें पाहिजे."

( श्लोक )

" स्वर्गी ही रजनी ! मृगांक नसतां कोठें दुसरा दिवा;
कोठें मार्ग, पुढें जरा न सुचतो ! कोणि निळे पथवां;
पाहें हा वरि गोल हा चमकता आकाशपंथीं दिवे;
त्याच्या ह्या चमकत्या प्रकाशें दिसतें तें मार्ग नेमके. "

— मोटे

सृष्टींत तारांचें असें महत्त्व व वैभव असल्यावर, कित्येक लोक चंद्रसूर्यांस देवता मानून त्यांची आराधना करितात यांत नवल नाहीं.

खरोखर पाहतां गृहसुख हें घराबाहेर नसून घरांत असतें. जो गृहस्थ ओटीवर अगर भाजवरांत बसून आपल्या माणसांबरोबर इकडच्या तिकडच्या गप्पा मारितो, त्याच्या समाधानास सीमा नसून, तें दुसऱ्यास स्वप्नीं देखील मिळत नाहीं.

तशांत, घरीं आपणाभोंवतीं सर्व मायेचीं माणसें दृष्टीस पडतात हें सुख का लहान आहे ?

( ओंव्या )

" गृहसुखाची गोडी, वर्णावी तितुकी थोडी,
जेथ निर्मळमनें आवडी बद्ध झाली.

१ हेल्प्स्

शुद्धप्रमाचें ते निधान. तेथे अन्योन्य वसे अभिमान,
ऐशा गृहीं सुखधन. अनंत सांठलें. ”

—केवल

घरांत सुखामाणसांच्या संगतीनें सुख तर होतेंच, परंतु तेथे आपण एकटे जरी असलों तरी गतकालची आठवण होऊनहि होतें. विशेषेंकरून लहानपणीं केलेली क्रीडा व पाहिलेली स्थळें हीं मनांत येऊन फारच समाधान होतें.

( श्लोक )

ज्या ज्या स्थानीं मुदितवदनें दाविली बाललीला,
तीं तीं येतां फिरुनि मनि ह्या येइ मोदा उमाळा;
जागा जाया निबिडविपिनें देखिलीं बाल्यकालीं,
मातें भासे प्रिय अजुनि तीं, वाटती सौख्यशाली. ”

—वुडवर्थ

प्राचीन काळीं गरजी माणसांची. फार तर काय पण ग्रीक लोकांची देखील गृहस्थिति मोठी नांवाजण्यासारखी होती असें नाहीं. त्याच ग्रीक लोकांच्या गृहस्थितीशीं हल्लींची व विशेषेंकरून कावलेनें वर्णन केलेली गृहव्यवस्था ताडून पाहिली तर केवढें अंतर दृष्टीस पडतें ! कावले असें म्हणतो कीं, ज्या गृहाभोंवतीं सुंदर बाग व आंत ग्रंथसंग्रह आहे, त्या गृहाची थोरवी अवर्णनीय होय. आणि अशा गृहांत जर पतिव्रता स्त्री असली तर त्या गृहसुखास पारावारच नाहीं.

( श्लोक )

“ सती चतुर गेहिनी वसत ज्या गृहीं सद्गुणी,
अखंड सुखसोहळा, नय, विवेक, तेथे गणी;
सुहास्यवदनीं तिच्या गमति रम्य पुष्पें नवीं,
मनीं विविधपुस्तकांस्थित सुबोध ती सांठवी. ”

—कावले

स्त्रीरत्न अशा प्रशंसेस पात्र असतांहि, " स्त्री ही एक न टाळितां येणारें अरिष्ट, स्वाभाविक मोह, इच्छि-ण्याजोगी विपत्ति, प्राणघातक भुरळ, व वरून प्रिय पण अंतर्यामीं अनिष्ट अशी चीज होय " असें सेन्ट क्रि-सोस्टम् हा ग्रंथकार म्हणतो. ज्याचें आपल्या मातेवर, पत्नीवर अथवा कन्येवर अत्यंत प्रेम आहे, तो अशा स्त्री-निंदकांचे उद्गार वाचून चकित झाल्याविना राहणार नाहीं. अलीकडे युरोपांतील सुधारलेल्या देशांत स्त्रीपुरुषांच्या परस्परसंबंधांत जशी सुधारणा झाली आहे, तशी दुस-ऱ्या कोणत्याहि संबंधांत आली नाहीं. रानटी अवस्थेंत बायकांस काय यातना भोगाव्या लागत असत याची क-ल्पना देखील भयंकर आहे. ग्रीक लोक एवढे बुद्धिमान्, ज्ञानी व ऐश्वर्यसंपन्न असत, ज्या स्त्रिया आपल्या घरास नंदनवन बनवून सोडितात त्यांस ते दासी किंवा भोग्य-वस्तु असेंच प्रायः मानीत असत.

आपला एक स्मृतिकार असें म्हणतो कीं " स्त्रियां-स फुलानें सुद्धां ताडन करूं नये. " यावरून स्त्रियांवि-षयीं आपलीहि पूर्वी फार पूज्यबुद्धि होती असें दिसतें. परंतु हल्लीं तशी आपली त्यांविषयीं बुद्धि आहे काय ? कित्येक रानटी लोकांस कुटुंब व गृहसुख यांची कल्पना देखील नाहीं. उत्तर अमेरिकेंतील अल्गान्क्विन् लोकां-च्या भाषेंत प्रेम या वृत्तीस शब्द सुद्धां नाहीं.

ज्यांचे ठिकाणीं परस्परांविषयीं प्रेम नाहीं अशा दोन स्त्रीपुरुषांचा विवाह जरी झाला, तरी त्यांस एकाद्या जं-गली जोडप्या इतकें सुद्धां सुख होत नाहीं, आणि शे-वटीं त्यांस विपत्तिच भोगावी लागते. एका काव्यांत अ-

शी एक कथा आहे कीं, एका कारागिरानें सोन्यारुप्यांची नवरी तयार करून आपल्या राजास नजर केली. तिचें बहुमोल पाहून राजानें तिजबरोबर लग्नहि लाविलें. परंतु ज्या ज्या वेळेस तो तिला आलिंगन देई, त्या त्या वेळेस ती त्यास थंडगार लागून त्याचे अंगांत हुडहुडी भरे. अशीच प्रेमरहित लग्न झालेल्या स्त्रीपुरुषांची अवस्था होय. मग त्यांच्या गृहसुखाचें नांवच घ्यावयास नको.

असला प्रेमभाव जरी एकीकडे ठेविला, तरी गैरसमजुतीमुळें तसेंच पूर्वापरसंबंध पाहिला म्हणजे जे शब्द मनास मुळींच बोंचणारे नसतात ते रागाच्या भरांत अविचारानें उच्चारल्यामुळें, आपणांत हरहमेश व्यर्थ कलह होऊन आपल्या सुखाचा ऱ्हास होतो. म्हणून ज्या क्षमाशांतीच्या सहाय्यानें आपण "सर्व कांहीं गिळितों व सोशितों" तीस अनुसरून चालल्यास आपली संसारयात्रा फिरून आपल्या सुखांत भर पडेल. गृह म्हणजे लहानसान स्थान नाहीं. या भवसागरांतील तुफानांचे तडाख्यांतून आपलें संरक्षण करणारें तें एक बंदरच होय. परंतु तुमची गृहसुखाची अपेक्षा करीत बसलों तर तें सुखावह होत नाहीं. आपण होऊन आपलें घर आनंदानें भरून काढिलें पाहिजे.

हा संसार कष्टमय असून बाह्यजग जर स्नेहरहित व भयाण असेल, तर घरांत बसून ज्या माणसांवर आपण प्रेम करितों त्यांचीं हसरीं मुखें पाहून व त्यांच्या संगतीचा लाभ घेऊन, आपणांस सुखाची पैदास करितां येत नाहीं काय ?

# प्रकरण १

## शास्त्रपठन*

ज्यांनीं कधीं शास्त्रपठन केलें नाहीं, त्यांस शास्त्रज्ञानानें आपली लोकयात्रा किती सुलभ व मनोरंजक होते याची कल्पना सुद्धां करितां येणार नाहीं. शास्त्राभ्यास मोठा कठिण, रूक्ष व निरस आहे असें जे मानितात ते चुकी करितात. बहुतेक शास्त्रें सुबोध तशीं चित्तवेधकहि आहेत. प्राचीन काळीं शास्त्रसंपन्न पुरुषास सिद्धपुरुष समजत. " अशा चातुर्यसंपन्न गृहस्थास ज्ञानचक्षु प्राप्त होऊन त्रिकालज्ञान होतें; इतरांस मात्र सर्वत्र अंधार भासतो. " शास्त्राचा असा अधिकार असून, तें फारच रम्य आहे. त्याची परिभाषा, वर्णनें वगैरे रूक्ष भासतात खरीं; परंतु ज्याप्रमाणें कोश हें भाषेचें प्रधान अंग नाहीं, तद्वत् तींहि शास्त्राचीं मुख्य अंगें नाहींत.

भर्तृहरीनें गंगेच्या उत्पत्तीविषयीं म्हटल्याप्रमाणें:—

( श्लोक )

" शिरः शार्वं स्वर्गात्पतति शिरसस्तत् क्षितिधरं
महीध्रादुत्तुङ्गादवनिमवनेश्चापि जलधिं "

**भावार्थ:**—

जेथ प्रकटोन उतरुनि शंकराच्या
ही येतसे प्रथम भूपथा जनांच्या.

—**गंगावर्णना**

किंवा सर्व नद्यांचीं पात्रें इंद्रानें आपल्या वज्रानें खोदून त्यांस नागमोडी मार्गानें सागरांत नेऊन सोडिलें आहे, अशा पुरातन काळापासून आपल्या मनांत बिंबलेल्या सुं-

* एथे शास्त्र शब्दानें पदार्थविज्ञानशास्त्र समजावें.

महल. छायेंत दुपारची विश्रांति. मेंढ्यांचे कळपांचा व गुरांच्या खिल्लारांचा आनंद. मेंढक्यांची उपजीविका आणि त्यांची संतोषवृत्ति. जें सूर्यबिंब एरव्हीं काळ्या मातीवर अथवा खरखरीत भुरक्यावर पडलें असतें त्याची हिरवळीवर पाचूसारखी हिरवी चमक व जांभळ्या छाया. ओढ्याचे कांठची गायरानें. टेंगण्या टेकड्यांच्या हिरव्या शुंडा व दरी. जेथून निळ्या समुद्राच्या लहरी वर आलेल्या आहेत असें दिसतें अशा हरळीनें आच्छादित वरंघळी. प्रातःकाळच्या दंवानें दवरवांत आलेलीं अगर संध्याकाळच्या कोंवळ्या उन्हानें उबदार आलेलीं मैदानें, अशी विविध शोभा वनस्पतींचें नांव घेतल्याबरोबर मनांत उभी राहते."

एका शास्त्राची आवड असली. म्हणजे दुसऱ्या शास्त्रांकडे आपलें मन वळल्याशिवाय राहातच नाहीं. कारण सर्व शास्त्रें एकसारखींच मनोहर आहेत. ज्योतिषाचें वैभव केवढें आहे तें पहा. ज्योतिषी आपल्या उंच वेधशाळेंत फार रात्रीपर्यंत बसतो व अंधारांत दूरदृष्टि पोंचवून एखादा धूमकेतु शोधून काढितो. नंतर त्याच्या कक्षेच्या गणितावरून हजार वर्षांनीं तो धूमकेतु पुन्हां हल्लीं असलेल्या ठिकाणीं परत येईल असें तो ठरवितो. परंतु त्यांत यत्किंचित् सुद्धां चुकी म्हणून होत नाहीं.

( श्लोक )

" हा तारा ठरल्या घटीस फिरुनी येई इथें निश्चयें;
शास्त्रानें ठरवी पळेंकरुनिहीं, चुक्की अशी त्या न ये;
त्याची वाट अखंडकाळ बघती शास्त्रज्ञ तारांगणीं;
गेले सर्व तरीहि शास्त्र बसलें दृष्टी नभीं देउनी."

—पृडहम

ज्या काळीं पारध करून मनुष्यें आपला निर्वाह करीत होतीं, त्या काळापासून त्यांच्या अंगीं खिळलेली शिकारीची हौस दिवसानुदिवस समूळ नष्ट होऊन त्या ऐवजीं जीवशास्त्राचा लोक अभ्यास करूं लागतील असा रंग दिसत आहे. ज्या पशूंची लोक शिकार करीत असत, ते पृथ्वीवर दुर्मिळ होत चालले आहेत. इतिहासकालाच्या पूर्वीचे काळीं राहणार लोक प्रचंड म्यामथ, गेंडा व सांबर यांची व प्राचीन ब्रिटन लोक वनगाई, हरिण व लांडगे यांची पारध करीत असत. हल्लीं इंग्रज लोक तितर, तित्तिर, कोल्हा आणि ससा यांची शिकार करितात. परंतु इंग्लंडांत हेहि आतां दुर्मिळ होत चालले आहेत व कांहीं दिवसांनीं श्रीमंत लोकांचे शिकारीकरितां हे पशुपक्षी रक्षण करून ठेवावे लागतील. ही पारधीची आपल्या अंगीं असलेली उपजत हौस यापुढें पक्षी, कीटक व दुसरे अनंत कृमि यांचा अभ्यास करून बहुतांश पुरवावी लागेल.

जीवशास्त्रहि सर्व शास्त्रांसारखें रम्य आहे. हें शास्त्र जाणणार कित्येक लोक साप, पाली वगैरे बाटल्यांत घातल्या म्हणजे ह्या शास्त्राची मजल आटोपली असें समजून त्यापलीकडे दृष्टि पोंचवीत नाहींत. परंतु खरा शास्त्रज्ञ नुसते नमुने गोळा करून स्वस्थ बसत नाहीं; तो जीवशास्त्राच्या खऱ्या रहस्याकडे लक्ष देऊन त्यांत प्रकट होणारी परमेश्वरलीला व कर्तृत्व पाहून अगदीं दंग होतो. पाण्यांत राहणाऱ्या 'रोटिफरा' नामक निरवयव, वाटोळ्या व अत्यंत सूक्ष्म प्राण्यांवर एक ग्रंथ आहे. त्यांत ह्या प्रा-

ण्यांचें वर्णन दिलें आहे तें वाचून परमेश्वरलीला किती अगाध आहे हें लक्षांत येईल.

" क्लिफ्टन् जवळ यरहान नदीच्या सामरसेटशायर-कडील तीरावर एक लहानसें खोरें आहे व त्याच्या तळीं एक पाण्याचें डबकें आहे. ह्या खोऱ्याच्या तिन्ही बाजूंच्या वरंधळीवर बीच व देवदारु यांचे मळे आहेत व एक बाजू मोकळी असून तेथें नैर्ऋत्य दिशेकडील मंद वारें वाहत असतें व तिसऱ्या प्रहरीं ऊन्हहि पडतें. ह्या खोऱ्याच्या वरच्या बाजूस एक झरा आहे. त्याचें पाणी बारीक धारेनें वाळुंजीच्या झाडांतून वाहत जाऊन डबक्यास मिळतें. ह्या खोऱ्याचे तोंडीं प्रवाहास एक मजबूद बंधारा घालून फाजील झालेलें पाणी वाहून जाण्याकरितां एका कोंपऱ्यांत मार्ग ठेविला आहे. त्यांतून एका लहान धबधब्यावरून पाणी खालीं पडून खालच्या मळ्यांत नाहींसें होतें.

वरच्या बाजूस असलेल्या झोंपड्यांवरून व मळ्यांतून डबक्याकडे आपण गेलों म्हणजे कोणास न दिसतां आपण बंधाऱ्याच्या ह्या कोंपऱ्यांवर येतां, व तेथून एकाहि प्राण्यास न भेवडावतां सर्व डबक्याचें पात्र एकदम आपल्या दृष्टीस पडतें. दूर पाणकोंबडा आपलीं लहान चिलींपिलीं वाळुंजीच्या झाडाखालीं नेतांना, व डबक्यांत बीच झाडाच्या आडव्या पडलेल्या जुन्या खोडावर व्होल नांवाचा प्राणी आपला उजवा कान खाजवीत असतांना दृष्टीस पडतो. आपल्या पायाशीं बीच फळाचे फोट टपकर पाण्यांत पडल्यावरून वर पाहिलें तर, कोठे तरी

१ हडसन् व गोसी

त्या वृक्षाचे पालवींत खारींचा फलाहार चाललेला नजरेस येतो. इकडे चिचुंद्री आपली चाहूल ऐकून, तीरीं असलेल्या बिळाचा मार्ग धरिते व अशा गुप्त रीतीनें पळून जाते कीं पाण्याच्या लहरीवरून मात्र ती कोठून जात आहे हें कळतें. पाणकोंबडी तर आपणांस पाहून केव्हांच नाहींशी झाली आहे व खारीनें वरून खालीं फळें टाकण्याचें सोडून दिलें आहे. हें लहान सरोवर खरोखरीच ' शांत डबकें ' या नांवास शोभतें. कारण आतां तर येथे प्राण्यांची हालचाल अगदींच नाहींशी झाली आहे.

परंतु आपणांस आहे हें ज्ञान व दृष्टि जशीच्या तशीच कायम राखून, अणुरेणु कृमींसारखें सूक्ष्म बनतां आलें व आपण पाण्यांत बुडी मारिली, तर एका मोठ्या नवलसृष्टींत आपण येऊन पडूं. या अपूर्व ठिकाणीं, जे प्राणी आपल्या केसांचे साह्यानें पाण्यांत तरतात, ज्यांचे डोळे मोतीं असून माणकांसारखे चमकतात व ज्यांचे हातपाय दुर्बिणीसारखे एकदां त्यांचे शरीरांत लोपलेले व एकदां लांबपर्यंत पसरलेले दिसतात, असे विचित्र प्राणी आपल्या नजरेस येतील. येथे कित्येक, पायांच्या बोटांतून निघालेले नाजूक तंतु नळी रोवून नांगरलेल्या जहाजासारखे स्थिर बसलेले, कित्येक काचकवच घातल्यासारखे झळकणारे, कित्येक कांट्यांनीं आच्छादिलेले व कित्येक गोंड्यांनीं व सफाईदार वक्रेपांसारख्या अवयवांनीं शृंगारलेले प्राणी, तसेंच एकाद्या देठास घट्ट बसलेले कानव्होल्व्हूलस नांवाचे जीव, आपल्या शिकारीस पसरलेल्या मुखांत अदृश्य शक्तीनें अखंड आकर्षण क-

रीत व आंकड्यासारख्या दाढेनें चिरडून खोल उदरांत गट्ट करीत असतांना दृष्टीस पडतील.

जवळ त्याच देठावर प्याल्यासारखें काय दिसतें तें पहा. त्याच्या उघडलेल्या चार पाकळ्यांभोंवतीं एक चक्र फिरत असून. जिवंत व मृत वस्तूंची सूक्ष्म माला त्याच्या नळीं असणाऱ्या पोकळींत जात आहे. ह्या प्राण्यांचें त्या पोकळींत गेल्यावर काय होतें हें दिसत नाहीं. कारण त्या फुलाच्या देठाभोंवतीं एकावर एक व्यवस्थेशीर रचिलेल्या मण्यांची नळी आहे; एकादा प्राणी त्यावर आदळल्याबरोबर तें फूल डोळ्याचें पातें लवलें न लवलें तोंच त्या नळींत नाहींसें होतें.

या डबक्यांत याहूनहि खोल बुडी मारिली, तर तळाशीं चिकीच्या लवक्यासारखे हळूहळू भ्रमण करणारे प्राणी दृष्टीस पडतात. ते प्राणी आपले आकाररहित अवयव पाहिजे तिकडे पसरितात. व त्यांस एकादें भक्ष्य सांपडलें तर त्याच्या भोंवतीं आपणांस गुरफटून घेऊन त्यास चट्ट करितात. कारण ते पायांशिवाय सरपटतात, हातांशिवाय धरितात, तोंडाशिवाय खातात आणि पक्वाशयाशिवाय खाल्लेलें पचवितात."

शास्त्रज्ञानानें असा चमत्कार मनुष्याचे दृष्टीस पडतो; तेव्हां तें त्याचे हातीं एक आनंदभांडारच सांपडलें आहे असें म्हटलें असतां चालेल. परंतु कृमिकीटक किंवा गवत यांस जो फायदा त्यापलीकडे आपणांस सृष्टीपासून कांहीं लाभ नाहीं असें पुष्कळ लोक मानितात. जशीं मुलें धोंडे मारण्याकरितां पक्ष्यांकडे लक्ष देतात, अगर जसें खिशांतलें घड्याळ पाहून हें खाण्यास कसें

आहे म्हणून एका एस्किमोनें[1] विचारिलें, अगर आपल्यास त्याच्या थडग्याचें पूजनार्चन करितां यावें म्हणून एका भाविक अफ्रिडीनें महंमदाचे एका वंशजास ठार केलें, अशासारख्या भावानें लोक सृष्टीकडे पाहतात. परंतु पदार्थविज्ञानशास्त्रांवर प्रेम ठेविल्यास मनुष्यमात्राच्या मनावर हळूहळू उत्तम संस्कार होऊन त्यांचे पूज्यवृत्तींत, स्थावरजंगमादिकांविषयीं पूज्यभाव ह्यांचीहि गणना होत जाईल. शास्त्रें आपणांस देवदर्शनाकरितां एका पवित्र देवालयांत चला म्हणून आदरानें सदैव हांका मारीत आहेत.

( ओव्या )

" अगाध आश्चर्याचें मूळ, ऐसें हें त्रिभुवनराऊळ,
चंद्रसूर्य दीप विशाल, पाजळले एथें.
वारे लहरा गर्जती, आकाशस्वरें घुमती;
हेंच कीर्तन, स्तवन, स्तुति, मेघध्वनि गजर हा. "

—**स्मिथ**

साधारण लोकांस जो चिखल व कचरा भासतो, त्यांतच सुंदरगोष्टींचें मूळबीज आहे असें शास्त्रज्ञास आढळून येतें. रस्त्यांत जो चिखल आपण पायांखालीं तुडवितों, तो माती. वाळू. धरोसा व पाणी यांचें मिश्रण असतें. ही वाळू निराळी केली व तिच्या परमाणूंची त्यांच्या धर्माप्रमाणें रचना झाली, तर तिचा स्फटिक बनतो. माती निराळी करा म्हणजे ती पांढरी माती होऊन तिचीं सुंदर भांडीं होतात व याहून अधिक शुद्ध केली तर तिचा नीळ बनतो. धरोसा घेऊन तो योग्य उपायांनीं शोधिला तर त्याचा हिरा होतो व पाणी स्वच्छ होऊन त्याचा द-

१ ग्रीनलंदांत राहणारा लोक

हिंवरबिंदु अथवा तेंच गोठून त्याचा सुंदर ताऱ्यासारखा आकार बनतो. एकाद्या उथळ डबक्यांत पहा; वाटलें तर तुम्हांस तळाशीं आकाशाचें प्रतिबिंब, नाहीं तर तेथेंच चिखल व रेंदा दिसेल.

ज्या ठिकाणीं खरोखरी कोणताहि चमत्कार नाहीं त्या ठिकाणीं तशा चमत्काराचा संभव आहे असें जरी चुकीनें कल्पिलें, तरी अशा चुकीपासून मनुष्याचा कांहीं तोटा होत नाहीं. एका गृहस्थाचा एक डोळा अगदीं नाहींसा झाला होता त्या ऐवजीं तो एक कृत्रिम काचचक्षु लावीत असे. हा कृत्रिम डोळा खोटा आहे असें न समजल्यामुळें, त्या डोळ्यांत जी चमक दिसे तीवरून काचचक्षु वापरणाऱ्या गृहस्थास त्याचा मित्र मोठा दयाळू मानीत असे. अशी जरी कोणाची चुकी झाली, तरी त्यांत कांहीं वावगें होत नाहीं.

शास्त्रपठनानें आपणांस उत्तम करमणूक होते. एवढ्याच दृष्टीनें त्याची प्रशंसा केली तर चुकी होईल. आपल्या हातून आयुष्याचा शहाणपणानें सदुपयोग होण्यासारखें शास्त्रपठनानें जें शिक्षण आपणांस मिळतें तें अमोल आहे हेंहि मनांत बाळगिलें पाहिजे. जी शोधकबुद्धि आजन्मपर्यंत मनुष्यांत प्रायः लोपलेली राहते तीस शास्त्राध्ययनानें उत्तेजन येऊन ती वृद्धिंगत होते. सर्वसाधारण सिद्धांत जलद व मुद्देसूद स्थापण्याची त्याची शक्ति वाढते, व आपले विचार व्यवस्थित व सरणीनें प्रतिपादन करण्याची मानसिक संवय दृढ होत जाते. तसेंच तरुण विद्यार्थ्यांस कार्यकारणांच्या अनुक्रमाचा शोध करण्याचा अभ्यास होतो, जी विचारसरणी अनायासें सम-

जेल व जिनें त्यांचें मन रंजेल तिचा त्यांस परिचय होतो, व विचार करण्याचे श्रमांपासून पराङ्मुख होणें, व नेहमीं सर्व ठिकाणीं, सर्व गोष्टींत उदासीन असणें, हे जे अर्धवट सुधारलेल्या लोकांच्या मनाचे दोष, ते शास्त्रज्ञानानें नष्ट होतात.

आपण जर पदार्थविज्ञानशास्त्राच्या वैभवाचें मनन केलें व अत्यंत पुरातन काळांत अथवा या आकाशाच्या अफाट व अनंत विस्तारांत आपण आपल्यास कल्पनेनें नेऊन सोडिलें, तर या संसारांतील दुःख व बाधा हीं आपणांस अगदींच क्षुद्र वाटतील. आकाशाकडे पहा: "[1]हे ग्रह परमेश्वरानें कसे सुंदर निर्माण केले आहेत! ह्या तारा ह्या पृथ्वीवरील समुद्रांतून आपणांस मार्ग दाखवितात इतकेंच नाहीं, तर आपल्या क्षुब्ध झालेल्या मनरूपी अंधारमय सागरांतूनहि मार्ग दाखवितात, म्हणून त्यांची फारच महती गाइली पाहिजे." आपणा सर्वांस "त्यांपासून बोध घेण्यासारखा आहे. मनुष्यानें लक्षपूर्वक पाहिलें तर त्यास बोध व साह्य करण्यास अर्धा खगोल नेहमीं तत्पर आहे."

एका व्याख्यानांत हक्स्लेनें असें म्हटलें कीं, "आपल्या जन्माचें सर्व फळ व आपलें प्रारब्ध बुद्धिबळांचा डाव जिंकणें अथवा हरणें यावर अवलंबून आहे अशी जर घटकाभर कल्पना केली, तर बुद्धिबळांचीं नांवें व तीं चालतात कशीं हें तरी निदान समजून घेणें हें तुमचें प्रथम कर्तव्य आहे, असें तुम्हांस वाटणार नाहीं काय? आईबापांनीं अगर सरकारानें या डावांत प्यादें कोणतें व घोडें कोणतें हें न शिकवितां जर तुम्हांस लहानाचें

[1] फेल्प्स

योग होऊं दिलें, तर त्यांचा तुम्ही तिरस्कार करणार नाहीं काय? बुद्धिबळांचे खेळाहूनहि जो अत्यंत कठिण अशा एका खेळाच्या नियमांच्या ज्ञानावर आपणा सर्वांचें व आपणांशीं ज्यांचा थोडाबहुत संबंध आहे त्यांचें जीवित, नशीब व सुख अवलंबून आहे ही गोष्ट प्रथमदर्शनींच स्पष्ट होय. हा दुर्घट खेळ असंख्य युगांचीं युगें मनुष्यमात्र खेळत आलें आहे. ह्या डावांत प्रत्येक पुरुष व प्रत्येक स्त्री एक खेळणारी आहे. जग हें बुद्धिबळांचा[1] पट, सृष्टिचमत्कार हीं बुद्धिबळें, व सृष्टिनियम हे खेळाचे कानू होत. ह्या डावांत दुसरा खेळणारा नेहमीं अदृश्य असतो; परंतु तो प्रामाणिक, न्यायी व शांत आहे हें आपणास ठाऊक आहे. तो कधीं आपल्या चुकीकडे दुर्लक्ष करीत नाहीं अथवा आपणांस चांगला डाव देतां आला नाहीं तर यत्किंचित् आपली क्षमा करीत नाहीं. आपण हा डाव चांगला खेळलों तर उदार हातानें त्याचें तो उत्तम फल देतो; न खेळलों तर दया न करितां शांतपणानें आपणावर प्यादेमात करितो. "

पदार्थविज्ञानशास्त्रानें धर्मांत सुधारणा होऊन त्यास चांगल्या रूपास आणिलें नाहीं असें नाहीं. त्याच्या योगानें निदान अंशतः तरी धर्मभोळेपणा,–चेटक, भूत, मंत्र इत्यादिकांवरील श्रद्धा, व ज्यामुळें जगाची प्राचीन काळापासून गांजणूक होत आली आहे तो धर्मच्छल, हीं नाहींशीं झालीं आहेत. तेव्हां "शास्त्रज्ञ व धर्मोपदेशक यांचीं योग्यता एकसारखीच आहे."

सर्व राष्ट्रभर शास्त्रीय शिक्षणाचा फैलाव होणें अत्यं-

1 क्यानन् फ्रीमान्टल्

त इष्ट आहे. शास्त्रज्ञानाचे आपल्यावर केवढे उपकार होतात हें आपण विसरून जातों. कारण त्याचीं आश्चर्य करण्यासारखीं व आपणांस प्राप्त झालेलीं अनेक फळें आपल्या दररोजच्या सहवासांतलीं होऊन, त्यांच्या अल्प किंमतीमुळें तर त्यांची उत्पत्ति व महत्त्व हीं आपण विसरून गेलों आहों. " आपल्या खोलींतील दिवा एक काडी ओढून आपण लावतों " परंतु त्या काडीचे महत्त्वाचा आपण कधीं विचार करितों काय ?

एकाद्या शास्त्राचें शिक्षण एकदम सुरू करूं नये. "[1] सर्व मोठमोठ्या शास्त्रांचीं मूलतत्त्वें व तीं व्यक्त करून दाखविण्याकरितां स्थूल उदाहरणें, तशींच त्यांचीं निवडक अशीं कांहीं अंगें. यांचें प्रथम ज्ञान होणें हा एकाद्या विशेष शास्त्राच्या पूर्ण अभ्यासाचा मूळ पाया असला पाहिजे. " "[2] कोणताहि सृष्टचमत्कार घ्या; त्याचें साद्यंत ज्ञान होण्यास बहुत शास्त्रांचा किंबहुना सर्व शास्त्रांचा परिचय असला पाहिजे ही गोष्ट शास्त्राभ्यास करणारांच्या मनांवर जितकी ठसविली तितकी थोडीच. " ह्या सृष्टींतील अतिमहत्त्वाच्या गोष्टी, ध्यानीं मनीं नाहीं अशा ठिकाणीं लोपलेल्या असतात. मोठमोठ्या कारखान्यांतील अवशेष राहिलेल्या केरकचऱ्यांत कित्येक मूल्यवान् पदार्थ आढळून आलेले आहेत. जें सर्वांनीं फेंकून दिलें त्यांतूनच कल्पनाचातुर्यानें ' ग्लावर साल्ट ' हा क्षार उत्पन्न केला आहे.

ह्या हिंदुस्थान देशाच्या भावी सुखाची व उत्कर्षाची सर्व भिस्त शास्त्रज्ञानावर आहे असें म्हटलें असतां अगदीं

१ बेन २ सर जॉन हर्शल

यथार्थ होईल. एथील खानेसुमारीं जवळजवळ ३० कोटी असून, हल्लींच्या मनूच्या मानानें ती संख्या दिवसानुदिवस अशीच वाढत जाण्याचा फार संभव दिसत आहे. हल्लीं आपल्या सर्वांचा निर्वाह कसाबसा जमिनीवर होत आहे, तरी तोच एथून शंभर वर्षांनीं पुढें होईल असें वाटत नाहीं. गेल्या १० वर्षांत ह्या देशाची प्रजा अजमासें ४॥ कोटी वाढली. हेंच प्रजावृद्धीचें प्रमाण धरिलें, तर शंभर वर्षांत खानेसुमारीची संख्या इतकी वाढेल कीं ती पोसण्यास देशांतील लागवड जमिनीस अत्यंत डोईजड होईल. मग एवढ्या प्रचंड प्रजेचा तरणोपाय व्हावा कसा ! जर प्रजेची वाढ काहीं कृत्रिम उपायांनीं कमी करितां आली तर त्यापासून अनीति व दुःख माजेल. जर ती तशीच वाढत गेली तर मनुष्यांचे हाल कुत्रा देखील खाणार नाहीं. ह्या सर्व भावी संकटप्रतिबंधाचा एकच मार्ग दिसतो. कलाकौशल्य व पदार्थविज्ञानशास्त्र यांच्या ज्ञानाचा देशांत फैलाव होऊन विविध धंद्यांस त्यांचें साहाय्य करून घेतलें तरच दिसत असलेलें अरिष्ट टळण्याचा संभव आहे. परंतु शास्त्रज्ञान ही जरी माता कल्पिली, तरी तिची सेवा केल्याशिवाय ती आपणांस साह्य होणार नाहीं. इंग्लंदासारख्या श्रीमान् आणि ज्ञानसंपन्न देशांत, हेंच अरिष्ट टाळण्याकरितां शास्त्रज्ञानाचा फैलाव कसा होईल म्हणून जर लोक विवंचनेंत आहेत तर आपल्या देशासारख्या अज्ञान, विपन्न व सर्वथैव पंगू देशांत शास्त्रज्ञानाची थोरवी केवढी असावयास पाहिजे बरें !

जे कोणी सृष्टीचें पूर्ण शोधन करतील, त्यांस आश्चर्यकारक व मनुष्यमात्रास फलद्रूप असे अनेक शोध ला-

गतील. इंग्लंडासारख्या देशांत शंभर वर्षांनीं शास्त्रज्ञानाचा इतका फैलाव होईल कीं हल्लीं मोठमोठ्या शास्त्रज्ञांस जें ज्ञान आहे त्याहूनहि विशेष एखाद्या नांगर हांकणारास असे शकेल. सुमारें दोनशें वर्षांपूर्वीं एका ग्रंथकारानें असें म्हटलें आहे कीं, " ज्या वस्तूचा पूर्ण उपयोग मनुष्यास कळला आहे, अशी एकहि वस्तु जगांत नाहीं." हें म्हणणें हल्लींच्या स्थितीसहि लागू आहे. परंतु हें अज्ञान यापुढें असेंच राहील असें दिसत नाहीं. सर जॉन हर्शल असें म्हणतो कीं " जे पदार्थ हल्लीं आपल्यास उपलब्ध आहेत, व जसजसें सृष्टपदार्थशास्त्र उदयास येईल तसतसे जे यापुढें उपलब्ध झालेच पाहिजेत, त्यांचा अनेक कामांत उपयोग कसा होईल हें जर मनुष्यास समजावयाचें अद्यापि राहिलें आहे, तर मनुष्यमात्राचे सुखसाधनांत या पदार्थांची उत्तरोत्तर भर पडत जाऊन त्यांची स्थिति चांगली होत जाईल; इतकेंच नाहीं, तर सृष्टचमत्कारांचें रहस्य ताडण्याचें व त्यांचे मुख्य नियम जाणण्याचें आपणांस विशेष सामर्थ्य येईल, अशी पूर्ण आशा बाळगल्यास कांहीं गैर नाहीं."

शास्त्रज्ञानानें फक्त आपल्या इंद्रियसुखाचींच साधनें वाढतील असें नाहीं; व्यक्तींचें, तसेंच एकंदर राष्ट्राचें वर्तन व आचारविचार हेहि उन्नतावस्था पावतील. टेनिसनची उक्ति राष्ट्रास तशीच व्यक्तीसहि लागू पडते.

( श्लोक )

" जे स्वाभिमानिं रत, निग्रहि ज्ञानवंत,
ते पावती अधिपतित्व जगीं अनंत;

१ बायल्

निर्धास्त धर्मनियमें जन वर्तवीती,
तेंसे स्वयें गुणनियमें ग्रह वर्ततीती. ”

“ दोनें दिवस चांगले आले म्हणून कधीं कधीं आपण पोकळ अभिमानानें नादून जेव्हां बेताल होऊन जातों. त्या वेळेस शास्त्रज्ञानानें ताळ्यावर येऊन आपणांस स्थिर आनंद चाखण्यास सांपडतो; ज्या वेळेस निराशेनें मन हिरमुसलेलें होतें. त्या वेळेस त्याच ज्ञानाच्या गोड शब्दांनीं त्याचें समाधान होतें; ह्या संसारांतील झगड्यांत जेव्हां तुम्हांवर एकादा प्रसंग येऊन तुमचे मित्र तुम्हांस सोडून जातात व सर्व लोक तुम्हांस पाहून तुमची कींव न करितां पुढें चालते होतात, त्या वेळेस लिलिअस आणि सिपिओ यांची मैत्री, सिसरो आणि डेमॉस्थेनीस व बर्क यांचा स्वदेशाभिमान, व जो सर्वांवर प्रेम करितो व आपला कोणीं अपराध केला असतां जो क्षमा करण्यास सांगतो, त्या परमेश्वराचा उपदेश, यांचें मनन करा, म्हणजे तुम्हीं खास दुःखांतून मुक्त व्हाल. ”

आपण पदार्थविज्ञानशास्त्राचे किती ऋणी आहों हें आर्च डिकन् फॅरर यानें लिव्हरपूल एथे एका व्याख्यानांत फार सुंदर रीतीनें दाखविलें आहे. तो म्हणतो:— “ तुमच्या या प्रचंड व्यापारी शहरांत पदार्थविज्ञान व यंत्रशास्त्रांचे जणुकाय जिकडे तिकडे विजयध्वजच फडकत आहेत. तुमच्या ह्या नदींतून चालणाऱ्या जहाजांचे मागें जी पाण्यांत फेंसाची शुभ्र सांखळी पडते तोच एथील व्यापाऱ्यांच्या राजमंदिरासारख्या घराचा उत्तम मार्ग गणला तरी चालेल. शास्त्रज्ञानानें जो पराक्रम केला

१ केन्सी आर्डम्स्

आहे तो सौंदर्ययुक्त व आश्चर्ययुक्त आहे; इतकेंच नाहीं, तर तो परोपकार व सामर्थ्य यांनीं ओतप्रोत भरलेला आहे असें एथें तुमच्या अनुभवास येतच आहे. हा अफाट आकाश शिवाय असंख्य जगांनीं गच्च भरलेला आहे, ह्या कालाचे पोटीं अनंत प्राणी होऊन गेले आहेत, व आजपर्यंत डोळ्यांस न दिसणारे असे नाजूक, सतेज व सुंदर असे असंख्य सूक्ष्म जीव जगांत भरले आहेत. इतकेंच चमत्कार शास्त्रांनीं आपल्या नजरेस आणिले आहेत असें नाहीं; तर तीं सुंदर मनुष्यमात्राची स्वतः सेवा करीत आहेत. हाहि चमत्कार आपल्या अनुभवास येत आहे. राजेरजवाड्यांची सत्ता अगर त्यांच्या दरबारची शोभा वाढविण्याकरितां नव्हे, तर मनुष्याच्या सुखाची वृद्धि व्हावी, मनुष्याचे श्रम हलके व्हावे व त्याचें दुःख नष्ट व्हावें म्हणून त्यांनीं व त्यांच्या भक्तांनीं परिश्रम केले आहेत. पूर्वीं जेथे रखरखीत भट्टीच्या तोंडाशीं, आपले डोळे अर्धवट अंधळे करून घेऊन उघड्या अंगानें मनुष्यास कष्ट करावे लागत, त्या ठिकाणीं हल्लीं आपण अदृश्य हवेचें सहाय्य घेत आहों. आपल्या ममतेच्या माणसांचीं हुबेहुब चित्रें वठविण्याचे कामीं सूर्यबिंबाची योजना होत आहे. शास्त्रज्ञानानें गरीब बिचाऱ्या कोळसे खोदणारास खाणींत निर्धास्तपणें काम कसें करावें हें शिकविलें आहे. दुखणाइतास झोपेंत गुंग करून, त्यास यातना न होतां, त्याच्या डोळ्यासारख्या नाजूक अवयवाचा एकादा भाग शस्त्रानें कसा दूर करावा ही विद्या चतुर वैद्यांस शास्त्रानेंच सांगितली आहे. शेंकडो वर्षे गरिबांस कष्टवून रचिलेल्या पिरामिडसारख्या इमारती तुम्हांस न दाखवि-

तां. समुद्रांतील दीपस्तंभ. वाफेनें चालणाऱ्या नौका. लोखंडी रस्ते व तारायंत्रें हीं शास्त्रें दाखवितात. शास्त्रानें अंधास डोळे व बहिऱ्यास कान दिले आहेत. मनुष्याची आयुर्मर्यादा वाढविली आहे. त्याचीं संकटें कमी केलीं आहेत. वेडेपणास आळा घातला आहे व रोगास चिरडून टाकिलें आहे. म्हणून ज्यानें विचारास शिक्षण मिळतें. कल्पनेस उत्तेजन येतें. मनास चांगलें स्वरूप येऊन योग्य वळण मिळतें व तें संस्कृत होऊन समाधान पावतें अशा विषयानें अज्ञान तुमच्या मुलांपैकीं एकास देखील असूं देऊं नका."

# प्रकरण १०

## शिक्षण

संसारसुखांत शिक्षणाचाहि समावेश केला, हें कदाचित् कोणास चमत्कारिकसें वाटेल; कारण, मुलांस तर तें प्रायः अप्रिय असतें व शाळा सुटल्याबरोबर तेंहि बहुतकरून सुटतें. परंतु शिक्षण फलद्रूप होणें असेल तर तें मुलांस योग्य असें असून त्यांस मनोहर असावें व तें आजन्म चालूहि ठेविलें पाहिजे.

ज्ञानसंपादनक्रिया ही एक दैवाची देणगीच आहे. ज्ञानसंपादनाचा मार्ग हा राजमार्गासारखा सुलभ नाहीं असें म्हणतात. परंतु खरें म्हटलें म्हणजे ज्ञान संपादण्याचे सर्व मार्ग राजमार्गच आहेत.

"[1] आपले डोळे आकाशाचें सौंदर्य पहातात व कान मंजुळ गीत अथवा सुवार्ता ऐकतात. परंतु त्यापासून होणाऱ्या इंद्रियसुखाचा अगर मानसिक आनंदाचा आस्वाद घेणारा खरा भोक्ता आपलें मन होय; व तें मन जितकें उन्नत असेल तितकी त्या आनंदास्वादाची गोडीहि जास्ती. आकाशांतील रत्नें, त्याचा नीलवर्ण, ह्या जगताची व्यवस्था व रहाटी पाहून ज्या मुलांचे मनावर कांहींच संस्कार झाला नाहीं व त्यांनीं हे चमत्कार पाहिले काय व न पाहिले काय असें झालें, तर त्यांच्या आनं-

१ जेरिमी टेलर

दाम मूर्खाच्या आनंदानें अथवा गाढवाच्या चर्वणेंच साध्य योग्य." म्हणून ज्या शिक्षणानें मन रसिक होतें तेंच खरें शिक्षण होय.

मनुष्याची स्मृति बहुत माहितीनें लादणें हा शिक्षणाचा खरा हेतु नाहीं. त्याचें मन संस्कृत करणें हाच खरा हेतु होय.

"ग्रंथ भाषांतर केलें पाठांतर, जोंवरि अंतर शुद्ध नाहीं."

—तुकाराम

बेकननेंहि म्हटलें आहे कीं. "बहुत विषयांचें ज्ञान संपादन करण्यांत पुष्कळ वेळ वेंचणें हा एकप्रकारचा आळस होय. त्या ज्ञानाचा कोटिक्रमांत उपयोग करणें दांभिकपणा होय. व त्यांच्या नियमानें आपला अभिप्राय ठरविणें ही पंडिताची आळ्यता होय. अशा ज्ञानानें मनुष्यधर्मास पूर्णत्व आलें पाहिजे आणि तें ज्ञानहि अनुभवानें पूर्ण बनलें पाहिजे."

"हल्लीं ज्या समाजावस्थेंत आपण नांदतों, तिच्यांतील व्यक्ति व आपण एकच आहों असें समजून, त्यांच्या सुखदुःखांचे पूर्ण वांटेकरी व्हावें अशी मनुष्याची वृत्ति होत नाहीं; म्हणून मनुष्यांचे परस्परांविषयीं वर्तनांत विरोधहि दृष्टीस पडतो." परंतु शिक्षणानें, आपण व आपले बांधव हे एकच आहों, या भावाचें बीजारोपण होण्यास बरेंच साहाय्य होईल; व हाच मतलब धरून आपण व्यासंग केला नाहीं तर पुष्कळ ज्ञान संपादन करूनहि मनाचें समाधान होणार नाहीं.

( श्लोक )

" देहासि कष्ट दिधले, बहु भागवीले,
विद्या समस्त पढलो, वश शास्त्र केले;
वाटे मना न निवलो, जरि सिद्धि राजी,
होतो तसाचि उरलो, मतिमंद आजी. "

गेटी

" विद्या हा विश्रांतीकरितां मंचक, निवांत एकटें फिरण्याकरितां मठ, उंच उभे राहून दुसऱ्यास तुच्छ मानण्याकरितां बुरूज, दुसऱ्यापाशीं युद्ध करण्याकरितां किल्ला, अथवा उदीमधंद्यानें व किफायतीनें दुकान नसावें. जेणेंकरून आपल्या जीविताची उन्नति होईल व परमेश्वराचें वैभव जगतांत गाजेल अशा साधनांचें विद्या हें भांडार असावें. " " तुम्ही टोलजंग वाडे उभारिले म्हणजे देशाचें हित केलें असें समजूं नका. तुमच्या हातून देशबांधवांची मनें उत्कर्ष पावली तरच देशाची तुम्हीं मोठी सेवा केली. कारण, हलक्या दासांनीं मोठ्या राजवाड्यांत राहण्यापेक्षां, मोठ्या मनाचे लोक झोंपड्यांत असलेले बरे. "

वर सांगितलेले हेतु सफल होण्यासारखी हल्लीची शिक्षणपद्धति आहे की नाहीं. हल्लींच्या पद्धतीनें विद्यार्थ्यांचे ठिकाणीं ज्ञानाविषयीं प्रेम उत्पन्न होतें किंवा नाहीं, व जे विषय विद्यालयांतून शिकविले जातात त्यांचें खरें मोल विद्यार्थ्यास समजतें का ते विषय शाळा सोडल्याबरोबर ते विसरून जातात, हें ठरविणें फार अगत्याचें आहे.

कोणत्याहि एकाच विषयाचे व्यासंगांत विशेषेकरून लहानपणीं मन गुंतविणें चांगलें नाहीं. शिक्षणाची खरी

१ बेकन २ एपिक्टिटस

पद्धति काय असावी हें सृष्टिनियमांवरून समजण्यासारखें आहे. आपल्या स्वतःच्या आवडीस धरून चालल्यास प्रायः आपणास योग्य शिक्षणपद्धति आढळून येईल; म्हणून ज्या विषयाकडे लहान मुलांचीं मनें लागत नाहींत, ते विषय त्यांस शिकविल्यानें फायदा होणार नाहीं. कारण " ज्यो त्यासंगानें मन आनंदी राहील, त्यांतच यशप्राप्तीचा संभव आहे. "

हिंदुस्थानांत हल्लीं चालू असलेला शिक्षणक्रम इंग्लंडांतील शिक्षणक्रमाच्याच धर्तीवर आहे. त्या देशांतील लोकांस्थिति मनांत आणून तो ठरविला नसल्यामुळें, त्यापासून जसा सर्व लोकांस फायदा व्हावा तसा होत नाहीं. खुद्द इंग्लंडांत, तेथील शिक्षणपद्धतीविषयीं मतभेद आहे. कित्येक असें म्हणतात कीं, हल्लीं आहे ती शिक्षणपद्धति उत्तम असून, फक्त अशा शिक्षणाच्या शाळा वाढविल्या म्हणजे झालें. परंतु कित्येक म्हणतात हें म्हणणें यथार्थ नाहीं; कारण, इंग्लंडांत विद्येचा इतका प्रसार झाला असतांहि, सरासरीच्या मानानें पहातां अथेन्स शहरांतील साधारण लोक जितके सुशिक्षित असत तितके तेथील लोक नाहींत. हिंदुस्थानांतील लोकांविषयीं तर बोलावयासच नको. हा दोष अंशतः तरी शिक्षणपद्धतीचा होय.

इंग्लंडांत व एथेंहि, पदार्थविज्ञानशास्त्र व कलाकौशल्यें यांच्या शिक्षणानें लोकोत्कर्षास फार साहाय्य होतें हें सर्वांस जरी मान्य झालें आहे, तरी शाळांतून व मोठमोठ्या विद्यालयांतून त्याजकडे दुर्लक्षच होतें व त्याचे एवजीं ज्या विषयांच्या ज्ञानाचा व्यवहारांत प्रायः उपयो-

ग होत नाहीं त्यांचें महत्त्व गणिलें जातें. खुद्द इंग्लंदांत ह्यासंबंधानें लोकांची फार दिवसांपासून बरीच कुरकूर आहे. " आमच्या मुलांचे मागें विनाकारण व्याकरणनियमांची घोकपट्टी लाविली आहे ! त्यास बहुत भाषा अवगत आहेत. त्यास जर शब्दोत्पत्ति आणि व्याकरण यांच्या नियमांप्रमाणें त्यांतील महत्त्वाच्या विषयांचें खरें ज्ञान न आलें तर त्यांची, व त्यास स्वभाषा चांगली येत असेल अशा साधारण व्यापाऱ्यांची अथवा सुखवस्तु गृहस्थांची विद्वत्ता सारखीच ! " असा मिल्टननें तेथील शिक्षणपद्धतीविषयीं आपला अभिप्राय दिला आहे. एथे, तसेंच इंग्लंडांत " विश्वविद्यालयांतील परीक्षेकरितां शाळांतून विद्यार्थी तयार होतात; परंतु जगांतील व्यवहाराकरितां होत नाहींत. " हल्लींच्या शिक्षणपद्धतीनें मनास शिक्षण मिळत नाहीं; चौकसबुद्धि वाढत नाहीं; व विद्यार्थ्यांस एकाद्या विषयाकडे वळविलेल्या वेळाप्रमाणें माहिती मिळत नाहीं.

शाळांतून व मोठमोठ्या विद्यालयांतून भाषा, काव्य, नाटकें व गणित यांजवर जोड उठविली जाते. हे विषय महत्त्वाचे नाहींत असें म्हणणें नाहीं. परंतु त्यांतच सृष्टपदार्थविज्ञानाची गणना झाली पाहिजे. शाळांतून पुस्तकी ज्ञानापुढें विद्यार्थ्यांची मजल जात नाहीं. त्यांच्या स्मृतीस मात्र भार होतो. परंतु त्यांचीं मनें संस्कृत होत नाहींत. प्राथमिकशिक्षणाच्या शाळांत अक्षर व शुद्धलेखन यांच्या भानगडीनें विद्यार्थी कंटाळून जातात; तारखा व लढायांच्या स्थळांच्या लांबलचक यादी यांनीं त्यांचे मनास ओझें

1 लॉक

होतें. परंतु त्यांच्या मनांत त्यांची स्पष्ट कल्पना येत नाहीं. व अशा माहितीचा तद्धर्माच्या व्यवहाराशींहि कांहीं संबंध नसतो. कालेजांमधल्या विद्यार्थ्यांत हाच प्रकार सुरू आहे. लहान मुलांस शिक्षणक्रमांत याहून उलटा प्रकार सुरू असला पाहिजे. त्यांचीं मनें नुसत्या माहितीनें भरून न काढितां, त्यांच्या मनास मानवेल असें शिक्षण देऊन त्यांची आनंदीपणाची आवड वाढविली पाहिजे. अमका विषय मूल शिकलेंच पाहिजे, असा आग्रह धरणें वाईट आहे. ज्या पद्धतीनें शिकण्याची त्याला हौस येईल, तीच पद्धति योजिली पाहिजे. मुलगा थोडें किंवा फार शिकला याजवर विशेष लक्ष देतां कामा नये. ज्या विषयांची त्याला आवड नाहीं त्याचें त्यास शाळेंत पुष्कळ शिक्षण दिलें, तरी तो सोडल्याबरोबर तें तो सर्व विसरेल. परंतु ज्याची त्याला आवड आहे, असा विषय तो थोडा जरी शिकला, तरी आपण होऊन त्याची सर्व माहिती करून घेईल. मुलें स्वभावतः मोठीं चौकस असतात. ही त्यांची चौकस बुद्धि वाढविली पाहिजे. त्यांच्या उपजत आवडीस धरून चाललें तर तीं आपण होऊन शिकतात. कित्येक वेळां शिक्षणाचा मार्ग असा कांहीं कंटाळवाणा व त्रासदायक असतो कीं त्यानें ज्ञानेच्छा अगदींच नष्ट होऊन जाते, आणि विद्येच्या उत्तेजनासाठीं योजिलेली स्थळें तिच्या प्रतिकारास कारणभूत होतात. सारांश मुलांची शोधकबुद्धि वृद्धिंगत होऊन त्यांस विचार करण्याची संवय लाविली पाहिजे; म्हणजे, फावला वेळ आनंदांत घालविण्याचा आणि व्यवहारांत सुविचारानें व सज्जनतेनें वर्तन करण्याचा योग्य मार्ग त्यांस आढळून येईल.

आपणास जें ज्ञान हल्लीं आहे तें आपल्या अज्ञाना-च्या मानानें कांहींच नाहीं व ज्ञानमार्गाचा अद्यापि यत्किंचित् सुद्धां आपणास ठाव लागला नाहीं. असें जर विद्यार्थ्याच्या मनावर ठसविलें, तरच ज्ञानमार्गाचा पहाणि-ण्याची हौस तरी होईल. कारण, "सृष्टिचमत्कार पाहून आश्चर्य होतें व त्यापासून ज्ञानाची वृद्धि होते."

शाळा सुटली की शिक्षणाचा व्यासंग सुटू नये. विद्याल-यांत जें शिक्षण मिळतें, तें पुढेंहि तसेंच चालू ठेवावें. आपण कोणत्याहि उद्योगधंद्यांत पडलों, तरी आपल्या म-नाच्या कलाप्रमाणें एकाद्या विशेष विषयाचा व्यासंग करा-वा. असा विषय कला असो किंवा शास्त्र असो, ज्योतिष असो किंवा रसायनशास्त्र असो; जर तो भक्तीनें आप-लासा केला, तर आपल्या आनंदास कारण होतो. ह्या संसारांत सर्व सुखच आहे असें म्हटलें तरी चालेल. प-रंतु कधीं कधीं आपणांस दुःख, काळजी व यातना होऊं ण्याची वेळ येण्याचाहि संभव आहे. अशी वेळ आली तर, ज्यांत आपलें मन गढून जातें अशा विषयाकडे तें लावून आपल्या विपत्तीचें थोडें तरी विस्मरण पडलें, तरी तो कांहीं सामान्य फायदा नाहीं.

"विद्येनें संस्कृत आलेल्या मनास ज्ञानौघाशीं तोंड लावून यथेच्छ पान करितां येतें, व आपल्या बुद्धिबला-चा चांगला उपयोग करून घेतां येतो. त्याला सभोंवता-लच्या वस्तूंनीं, सृष्टपदार्थांनीं, कलाकौशल्यानें केलेल्या पराक्रमांनीं, कवींच्या लाघवानें, इतिहासकथांनीं, मनुष्य-मात्राच्या भूत व वर्तमान आचारविचारांनीं व त्यांच्या भा-

१ अरिस्टॉटल  २ मिल

वी अवस्थेच्या अनुमानांनीं अमर्याद आनंद होतो. आपल्या चौकस बुद्धीच्या तृषी पलीकडे जर या आनंददायक विषयांचे ठिकाणीं आपलें मन लुब्ध झालें नाहीं. तर ह्या विषयांच्या ज्ञानाचा आपणास शतांश सुद्धां प्राप्त न होतां त्यांजविषयीं आपण उदासीन राहण्याचा संभव आहे."

देशांत जितकें कलाकौशल्य फैलावेल, पुस्तकें स्वस्त होतील, व सोपत पुस्तकालयें वाढतील, तितकी लोकांचीं मनें संस्कृत होऊन नीति सुधारतील. अशी आशा बाळगिल्यास कांहीं कोणी गैर केलें असें म्हणतां येणार नाहीं. अशा विद्यादानानें लोकांचें अज्ञानजन्य दारिद्र्य व दुःख ही नष्ट होऊन त्यांचें जीवित सुखावह होईल. लोकांचे ठिकाणीं जर ज्ञानाविषयीं प्रेम उत्पन्न करितां आलें, तर त्याच्या मागें ज्ञान ठेविलेंच आहे. म्हणून मुलांस असें शिक्षण मिळावें. कीं रानावनांतून चाललें असतां त्यांस आनंद व्हावा; सृष्टपदार्थशास्त्रानें एखादा शोध लाविला तर त्यानें त्यांस मोठें कौतुक वाटावें; व आपल्या देशाच्या इतिहासाचा व काव्याचा त्यांनीं अभिमान वाहावा व त्यांत त्यांचीं मनें दंग व्हावीं. सारांश आपल्या शाळा निवळ नांवाच्या नसाव्या. त्यांच्या योगानें शिक्षणाचा हा महान् हेतु सफल व्हावयाचा असेल तर शाळा हीं रूक्ष शिक्षणाचीं स्थळें नसावीं व त्यांत जें शिक्षण मिळेल त्यानें मुलांचे मनास योग्य वळण व शिक्षा लागून, ज्या बुद्धिसारख्या देणगीनें लहानापासून थोरापर्यंत व राजापासून रंकापर्यंत सर्वांस आनंद व सुख होईल व झालेंच पाहिजे, त्या बुद्धीची थोरवी वाटावी व तिचा योग्य उपभोग घेतां यावा.

चांगल्या शिक्षणपद्धतीनें. आपलें ज्ञान किती आहे व आपणास अद्यापि किती शिकावयाचें आहे हें तरी निदान समजेल. जे लोक हा जन्म कंटाळवाणा आहे असें म्हणतात. त्यांस अशा शिक्षणपद्धतीनें. आपल्या स्वतःच्याच दोषामुळें जन्म उदास वाटतो असें आढळून येईल व ज्ञान हें सुख व मनुष्याचे ठिकाणीं एकप्रकारचें सामर्थ्य आहे. असें त्यांचे अनुभवास येईल. अशा चांगल्या शिक्षणानें " शांत व स्थिर अशा विद्याव्यासंगाचे वेळीं सत्यदेवतेचें सुंदर मुख आपल्या नजरेस पडेल " व " एकदांका ह्या देवतेचा आपणांस पाठिंबा मिळाला. तर आपल्या आनंदास मर्यादा राहणार नाहीं. असें झालें म्हणजेच. परमेश्वराने आपणांस जन्मास घालून शरीरसंपत्ति, बल व वेळ हीं आपल्या स्वाधीन केलीं आहेत त्यांची थोरवी किती आहे हें पूर्ण जरी नाहीं तरी अंशतः तरी समजून आपण त्याचे फार ऋणी आहों ही गोष्ट मनांत ठसेल."

१ मिल्टन्　　२ बेकन

( श्लोक )

देह त्यागितां कीर्ति मागें उरावी,
मना सज्जना, हेंचि क्रीया धरावी;
मना चंदनाचेपरी त्वां झिजावें,
परी अंतरीं सज्जना नीववावें. ''

—रामदास

# प्रकरण ११

## महत्त्वाकांक्षा

जगांत आजपर्यंत बहुत मोठे लोक होऊन गेले, त्यांपैकीं बहुतेकांचा पहिला दोष म्हणजे महत्त्वाकांक्षा होय. ही वृत्ति चांगली नाहीं असें म्हणण्याचा आमचा हेतु नाहीं; जर सुमार्गानें तिची पूर्तता केली, तर तीच आपले अंगीं सद्गुण उत्पन्न होण्यास चांगलें साहाय्य करिते. सिसरोनें सत्ताविषयीं असें म्हटलें आहे कीं, "वैभव व सद्गुण संपादन करण्याची इच्छा मनुष्यानें नेहमीं बाळगावी; इतकेंच नाहीं, तर तेंच जन्माचें खरें सार्थक असें मानावें व तें संपादन करीत असतां जरी शरीरास यातना झाल्या, देशत्याग करावा लागला, अथवा मृत्यु आला, तरी ह्या विपत्तीस निर्माल्यवत् गणावें. हें प्रमेय ग्रंथावलोकनानें व शहाण्या लोकांच्या बोधानें लहानपणींच माझ्या मनांत ठसलें नसतें, तर मी इतके वाद व नीच लोकांशीं दररोज बहुत झगडे सोसून आपला जीव धोक्यांत पाडून घेतला नसता." सर्व ग्रंथांत हेंच तात्पर्य सांगितलें आहे आणि शहाणेहि असाच उपदेश करितात.

एक कवि[1] म्हणतो कीं, "एकादें काम हातीं घेतलें, तर त्यांत पुष्कळ लोक फसतात. एकाद्यासच यश येतें." परंतु हें म्हणणें खरें असेल असें वाटत नाहीं. ज्यांचे अंगीं योग्यता आहे त्या सर्वांस, हवी तेवढी जरी नाहीं तरी कांहीं यशप्राप्ति होतेच. युद्धांत, वादांत अगर व्य-

१ टेनिसन्

वहारांत प्रामाणिकपणानें व प्रांजलपणें वागून व आपली आहे तेवढी पराकाष्ठा करूनहि अपयश आलें, तरी तें नीच उपायानें मिळविलेल्या यशापेक्षां अधिक प्रशंसनीय होय. परंतु अशा प्रसंगीं आपण आपलें धैर्य मात्र खचूं देऊं नये. मनांत धरिला हेतु जरी साधला नाहीं, तरी नेहमीं तो साधण्याची हाव बाळगिली असतां अवगुण होत नाहीं. "मोठ्या कामांत आलेल्या अपयशाची थोरवी हलक्या कामांत मिळविलेल्या यशास येत नाहीं." "जर मनुष्य दक्ष असेल व लक्षपूर्वक वागेल तर त्याचें नशीब खास उघडेल. कारण दैव हें जरी स्वतः अंध असलें, तरी तें सर्वांस दृश्य आहे." जें करण्याची आपण इच्छा करितों तें पूर्णपणें मनांत ओळखून, तें साधून घेण्याचा आला प्रसंग फुकट दवडिला नाहीं, तर आपणांस यश येण्याचा चांगला संभव असतो.

वेळेचा सदुपयोग हा एक यश मिळविण्याचा मार्ग आहे. नेपोलियन म्हणतो कीं "मीं, मांटिबेलोच्या लढाईंत, आठशें स्वार घेऊन शत्रूंवर हल्ला करण्यास, केलरमन् यास हुकूम केला. तो हल्ला होतांच आमच्या आठशें स्वारांनीं शत्रूंच्या सर्व रिसाल्यासमक्ष त्यांच्या सहा हजार पायदळाची वाताहत उडविली. कारण शत्रूंचा रिसाला रणभूमीपासून पाव कोश दूर होता व त्यास तेथे येण्यास पाव घटका लागली असती. या ज्या आणीबाणीच्या पाव घटका असतात त्यांवरच युद्धांत जय येणें अगर पराभव पावणें हें अवलंबून असतें." हीच गोष्ट भवयुद्धासहि लागू आहे. अशा युद्धप्रसंगी आपणहि अंग

१ मॉरिस् २ बेकन

चोरून वर्तन करूं नये व प्राणावर येऊन बेतली तरी त्यास सादर असावें. कारण —

" उदारस्य तृणं वित्तं, शूरस्य मरणं तृणम् "

—भर्तृहरि

शिवाय आपलें मन अशा प्रसंगावधानांत गढून गेल्यावर, त्यांत मिळणाऱ्या टक्क्याटोणप्यांचें व जखमांचें दुःख आपण विसरून जातों.

एकादें काम करण्यापूर्वी, त्यांत काय मिळवावयाचें आहे ह्याचा पूर्ण विचार करावा, त्यास लागणाऱ्या श्रमाचें व खर्चाचें लक्षपूर्वक मनन करून मग त्यास हात घालावा. आणि एकदांका तें करण्याचा निश्चय ठरला म्हणजे मग कधींहि मागें फिरूं नये; कसेंहि संकट आलें व कसेंहि कष्ट करावे लागले तरी त्याचें दुःख मानूं नये.

( श्लोक )

" प्रारभ्यते न खलु विघ्नभयेन नीचैः
प्रारभ्य विघ्नविहता विरमन्ति मध्याः;
विघ्नैः पुनःपुनरपि प्रतिहन्यमानाः
प्रारभ्य,तूत्तमजना न परित्यजन्ति. "

—भर्तृहरि

**भावार्थः**—नीच पुरुष विघ्नांच्या भयानें एकाद्या उद्योगास आरंभ करीत नाहींत. मध्यम पुरुष आरंभ करून विघ्नांमुळें तो टाकितात; परंतु उत्तम जे आहेत ते वारंवार विघ्न आलीं तरी आरंभ करून तो टाकीत नाहींत.

वैभवाची इच्छा सर्वच करितात, परंतु खऱ्या वैभवाचें स्वरूप काय ?

" एकादी माशी धरिली कीं कोळ्यास अभिमान वा-

१ मार्कस आरिलिअस

टतो. कोणास ससा धरिल्यानें. कोणास जाळ्यांत मासा पकडल्यानें. कोणास गनडुकर व कोणास आम्बल धरिल्यानें आणि कोणास आपल्या शत्रूस जिंकल्यानें अभिमान वाटतो." हा सर्व पराक्रम एका दृष्टीनें जरी मिथ्या वैभव होय. तरी त्यावरून एवढी गोष्ट सिद्ध होते की. जर हेतु स्तुत्य असेल. तर प्रत्येक मनुष्यास हातीं धरिलेल्या कामांत यश येण्याचा संभव आहे.

बहुतेक लोकांत ज्या प्रकारची महत्त्वाकांक्षा नेहमीं दृष्टीस पडते, तिचें खरें स्वरूप शिकंदर बादशहाचे कृतीवरून चांगलें लक्षांत येईल. आपणास विस्तीर्ण राज्य मिळावें अगर तें मिळाल्यास त्याजवर राजाधिकार चालवावा अशी त्याची इच्छा नसे. परंतु पुष्कळ देश काबीज करावे हाच काय तो त्यास छंद होता. ज्या वेळेस त्याचा बाप फिलिप यानें एकादें शहर घेतलें अगर युद्धांत जय मिळविला अशी वार्ता त्याचे कानीं येई. त्यावेळेस तो म्हणत असे की. माझा बाप एकापुढें एक देश जिंकीत चालला आहे. परंतु मला एकादा अलौकिक पराक्रम करण्यास कांहीच शिल्लक ठेवीत नाही! आपणास एक जगत् सुद्धां काबीज करितां येत नाही असें वाटून तो जेव्हां आकाशांतील अनंत जगतांकडे पाही, तेव्हां निराशेनें दुःखी होत असे. असेंहि कित्येक म्हणतात. अशी महत्त्वाकांक्षा कधींहि पुरली जात नाहीं. दुसऱ्याचे सुखाकडे काय परंतु दुःखाकडेहि दुर्लक्ष करून स्वमहत्त्व वाढविणें अशी शिकंदरासारख्याची जी सर्वथैव त्याज्य महत्त्वाकांक्षा तिचा ज्ञानी पुरुषांनी अत्यंत निषेध केला आहे.

"आपलें नशीब कसें उदयास येईल व आपलें वैभव कसें वाढेल या विवंचनेंत एकसारखें राहिलें, तर सर्व वेळ त्यांत जाऊन जन्माचें खरें सार्थक होत नाहीं." शिवाय "आपलें एकट्याचें नशीब उदयास आलें म्हणजे जन्म सफळ झाला असें नाहीं." व "मनुष्य जन्मास येतो तो आत्मोन्नतीकरितां येतो, पराक्रम करण्याकरितां येत नाहीं."

मिथ्याकीर्तीस मनुष्यानें भुलूं नये. लोकांत आपली आठवण राहिली, म्हणजे आपण खरे कीर्तिवान् झालों असा सिद्धांत नाहीं. कीर्ति व अपकीर्ति अशा दोन गोष्टी जगतांत आहेत. आणि दुर्दैवानें जितके कीर्तिवंत होऊन गेले तितकेच दुष्कीर्ति करून गेले आहेत. व पुष्कळ लोक तर दोन्ही संपादन करून नाहींसे झाले आहेत.

दुर्योधन अथवा दुःशासन, नेरो अथवा कमोडस, जॉन अथवा तिसरा रिचर्ड, यांच्यासारखी जगतांत कीर्ति होण्यापेक्षां, आपलें नांव कोणासहि माहीत नसलेलें पुरवलें, असें कोण इच्छिणार नाहीं ! इतिहासांत दुर्लौकिकानें प्रसिद्ध असण्यापेक्षां, सत्कृत्यांत जन्म घालून अप्रसिद्ध असणें फार चांगलें ! आनंदीबाईसारखें राज्यकारस्थानांत ढवळाढवळ करून दुष्कीर्तिरूपानें इतिहासप्रसिद्ध असणें, यापेक्षां सद्भिक्षुकांच्या सुशील पतिव्रता व धार्मिक स्त्रियांसारखा सुखसमाधानांत अप्रसिद्ध रीतीनें जन्म घालविणें चांगलें नव्हे काय !

केव्हां केव्हां यशापेक्षां अपयशामुळें राजे व योद्धे प्रसिद्धीस येतात. थर्मापली खिंडींत लिआनिडास यानें प्र-

१ बेकन २ गेटी

सीज़र याचे सैन्यास अडवून स्वदेशाकरितां शेवटीं रणांत देहहि ठेविला. तेव्हां खरा योद्धा लिओनिडास होय; झ-सीज़र नव्हे. अलेक्झांडर व नेपोलिअन हे प्रासादिक पुरुष खरे. परंतु खरे योद्धे नाहींत. एकाच्या अफाट राज्याची तो मेल्याबरोबर वाताहत झाली. दुसऱ्याचे सर्व विजय त्याच्या तोफांचे धुराप्रमाणें थोड्या अवकाशांत लयास पावले. व स्वदेशास त्यानें पूर्वीपेक्षां अधिक दुर्बल, विपन्न व संकुचित करून सोडिलें.

ज्यांनी सत्कृत्यें केलीं अथवा परोपकारार्थ देह झिजविले, तेच खऱ्या कीर्तिस पात्र आहेत. लिओनिडास व रेग्युलस हे इतिहासाचे केवळ वैभव होत.

राजकार्यधुरंधर पुरुष व योद्धे यांची जिवंतपणीं मोठी कीर्ति असते. त्यांचें नांव सर्वांचे तोंडीं असतें. त्यांनीं केलें काय, ते गेले कोठे, याची सर्व लोक चर्चा करितात. परंतु त्यांचीं नांवें फार दिवस जगांत राहत नाहींत. खरी अजरामर कीर्ति साधुसंत, ज्ञानी व कवि यांची असते. शेक्स्पिअर, प्लेटो, व्यास, वाल्मिक यांचीं साद्यंत चरित्रें नाहींत, तरी त्यांच्या कृतींवरून त्यांची आपणांस चांगली ओळख होते.

( अभंग )

" जगाच्या कल्याणा संतांच्या विभूती, देह कष्टविती उपकारें;
भूतांची दया हें भांडवल संतां, आपुल्यां ममता नाहीं देहीं;
तुका म्हणे सुख पराचिया सुखें, अमृत हें मुखें स्रवतसे. "

म्हणून राजकारस्थानी पुरुषांचीं स्मारकें असावीं, कारण त्यांची कीर्ति लवकर लयास जाते; परंतु कवींच्या

स्मारकांची कांहीं जरूरी नाहीं. त्यांच्या ग्रंथांनी त्यांची कीर्ति अमर राहते.

जगास खरे जिंकणारे ज्ञानी पुरुष होत; योद्धे नाहींत. जिंगिसखान, अकबर, अथवा शिवाजी यांनी खरोखर जग आपल्या अंकित केलेलें नाहीं. रामदास आणि तुकाराम, गौतमबुद्ध आणि प्लेटो हे जगाचे खरे स्वामी आहेत. ज्या राजांनी आपल्या पूर्वजांवर राज्य केलें, त्यांचें नांव देखील उरलें नाहीं. ज्या कांहींची कीर्ति आहे, ती प्रासादिक कवींमुळें किंवा सत्पुरुषांचे सहवासामुळें झाली आहे. कालिदासामुळें भोजाचें व व्यासामुळें धर्माचें नांव अद्यापि गाजत आहे. असे सत्पुरुष त्यांच्या समानकालीन पिढीत नुसते जिवंत असतात असें नाहीं; सर्व काळीं व सर्व युगीं ते चिरंजीव आहेत. म्हणूनच त्यांचें साद्यंत चरित्र लिहितां येत नाहीं. राजदरबारचे लहान लहान सरदार व मंत्री यांचीं नांवें तर मुदलींच राहत नाहींत. बेकन हा न्यायाधीश असून ज्ञानी पुरुषांतहि त्याची गणना होती. परंतु तो फक्त ज्ञानी म्हणूनच जगतास मशहूर आहे.

(श्लोक)

" भुजतरुवनच्छायां येषां निषेव्य महौजसां
जलधिरशना मेदिन्यासीदसावकुतोभया,
स्मृतिमपि न ते यान्ति क्ष्मापा विना यदनुग्रहं,
प्रकृतिमहते कुर्मस्तस्मै नमः कविकर्मणे. "

—सुभाषित

भावार्थः—ज्यांच्या बाहुरूपी वृक्षाच्या छायेचा आश्रय करून ही संपूर्ण पृथ्वी एके काळीं निर्भय राहिली होती असेहि शूर राजे या भूमंडळावर होऊन गेले असतां, त्यांची नुसती आठवणसुद्धां

जिच्या अनुग्रहावांचून होत नाहीं, अशा त्या निसर्गमान्य कर्त्याच्या कृतीला नमस्कार असो.

मोठमोठे राजकारस्थानी व योद्धे पराक्रमानें व सद्गुणांनीं कीर्ति पावतात. परंतु ती केवळ कवि व इतिहासकार यांच्या लेखणीनें अजरामर होते. भीष्मार्जुनांपूर्वी असंख्य योद्धे झाले असतील. परंतु व्यासासारख्यांच्या प्रासादिक वाणीनें त्यांचें गौरव केलें नसल्यामुळें, ते व त्यांचा पराक्रम यांचा मागमूस सुद्धां राहिला नाहीं.

कोणत्या कुळांत कोठें कुलदीपक उत्पन्न होईल याचा नेम नाहीं. कारण पुष्कळ मोठे पुरुष हलक्या कुळांत जन्म पावले आहेत. कित्येक प्रसंगीं अप्रसिद्ध ठिकाणीं व कुळांत जन्म झाल्यास तेंच कीर्तीस कारण होतें. होमर कोठें जन्मला याचा पत्ता नाहीं म्हणून ७ शहरें, आम्हीं या आद्यकवीचीं जन्मस्थानें आहों असें म्हणत आहेत. पदार्थविज्ञानशास्त्रनिपुण लोकच नुसते घेतले, तर पहा काय मौज दृष्टीस पडते! र हा लोहाराचा, वॉट नौकाकाराचा, फ्रँक्लिन मेणबत्त्या करणाराचा, डाल्टन कोष्ट्याचा, लापलेस शेतकऱ्याचा, फॅरेड घिसाड्याचा, व लामार्क एका हलक्या कारकुनाचा मुलगा होता. स्टिफन्सन् खाणींतून कोळसे काढीत असे; व्हिटस्टोन तंतुवाद्यें करीत असे; तसेंच, गॅलिलिओ, केप्लर, कुव्हिअर, व हर्शेल हीं सर्व गरीब आईबापांचीं मुलें होतीं.

मनुष्यमात्राचें अत्यंत हित करणाऱ्या कित्येक पुरुषांचीं नांवें शेष राहिलीं नाहींत, हें पाहून वाईट वाटतें. अग्नि उत्पन्न कसा करावा हें शोधून काढिलें तो कोण व कोठें आहे! ज्यानें आपली लिपी शोधून काढून जगा-

वर उपकार केले. त्या हेमाडपंताचें नांव मात्र उरलें आहे.

इंग्रज लोक आपल्या देशबांधवांचा जो अभिमान बाळगितात, तो यथार्थ आहे असें सर्वांस कबूल करणें भाग आहे. कारण त्यांचे देशांत बहुत ज्ञानी पुरुषांचा जन्म होऊन त्यांजवर त्यांनीं फार उपकार केले आहेत. बेकन, हॉब्स, लॉक, बर्कले, ह्यूम आणि हॅमिल्टन् यांनीं त्यांचे मनास उन्नत केलें आहे. न्यूटननें गुरुत्वाकर्षण नियम शोधून काढिला. ॲडम स्मिथनें अर्थशास्त्र निर्माण केलें. यंगनें प्रकाशाची गति व हर्शलनें युरेनस ग्रह शोधून काढिला. वॉर्सेस्टर, दि हेलियन आणि वॉट यांनीं वाफेचें यंत्र तयार केलें. व्हिट्स्टननें तारायंत्र काढिलें. जेनरनें देवीचा रोग नाहींसा केला. सिंपसन्नें क्लोरोफॉर्मचा वैद्यकांत उपयोग करून दाखविला, आणि डार्विननें अर्वाचीन प्राणिशास्त्र उदयास आणिलें.

ह्या व अशा महान् पुरुषांनीं मनुष्यमात्राचे आचारविचारांस वळण लाविलें आहे. जिवंत असतांना ह्यांची जरी फारशी प्रसिद्धि नव्हती, तरी शेवटीं ते एक प्रकारचे सत्ताधीश बनून, आजमित्तीस अमर झाले आहेत.

( श्लोक )

" एक कर्षति राजानं, राजानं एकमेव च.

धनेन निधनं चैव निधनं धनेन तथा. "

—वृद्धचाणाक्य

( अभंग )

" देव एका भाग्य देतो, एका भिकेसी लावितो,

न कळे भगवंताचें करणें, येक लक्षणें. "

—रामदास

( अभंग )

" जोडोनिया धन उत्तमव्यवहारें. उदासविचारें वेच करी

उत्तमचि गति तो एक पावेल, उत्तम भोगील जीवखाणी.

—तुकाराम

# प्रकरण १२

## संपत्ति

धनाशा ही एक प्रकारची महत्त्वाकांक्षाच होय. ज्यांनीं कला, काव्य, अथवा शास्त्र हीं कधींच पाहिलीं नाहींत, असे बहुत लोक आहेत; परंतु ज्यानें उदरनिर्वाहाकरितां द्रव्यसंपादन करण्याची खटपट केली नाहीं असा मनुष्य विरळा. केव्हां आपली प्राप्ति जर थोडीबहुत वाढत गेली, तर त्यापासून आपला उपयोग होतो इतकेंच नाहीं, तर व्यवहारांत आपण कांहीं तरी यश संपादिलें असें वाटून समाधानहि होतें.

श्रीमंती इष्ट आहे किंवा नाहीं, याची बऱ्याच लोकांस शंका येते; आणि मतांतर पडतात. जे सर्वश्रीमंत आहेत ते निश्चयानें अधिक सुखी आहेत, असेंच केवळ म्हणतां येणार नाहीं; कारण, दारिद्र्यावस्थेंत जसे मनुष्यास कष्ट करावे लागतात तसेच संपन्नावस्थेंतहि करावे लागत असून, जीवास नेहमीं काळजी लागते ती निराळी. तथापि आपणास थोडेंसें उत्पन्न असून तें जर काटकसरीनें वाढत गेलें, तर सुख होतें हें निर्विवाद आहे. पण आपण आपल्या धनाचे धनी असलें पाहिजे. धनच जर आपले धनी होऊन बसलें, तर कृपणासारखी आपली अवस्था होते.

दोन पैसे बाळगून राहिल्यानें नेहमींच आपलें बरें होतें असें नाहीं. आपल्याजवळ धन असलें कीं अधिक धनाची आशा उत्पन्न होते. [1] "गरीबास श्रीमंत होण्याची इच्छा असते, व जसजशी मनुष्यास श्रीमंती येते तस-

[1] इमरसन

तसा त्यास अधिक धनवान् होण्याचा छंद लागतो. जशी मद्यप्राशनानें तहान वृद्धिंगत होते, तसेंच धन मिळाल्यास तेंच वाढविण्याचें पुष्कळांस व्यसन जडतें." पैशाचा खरा उपयोग काय हें न समजून, केवळ आपल्याजवळ त्याची रास असावी, एवढ्याच दृष्टीनें तो संपादन करीत गेलें तर हें व्यसन फारच दृढ होतें.

धन मिळविणें कांहींसें सोपें म्हणतां येईल. परंतु तें रक्षण करणें अथवा त्याचा योग्य रीतीनें उपभोग घेणें हें फार कठिण होय. तें जतन करण्याचें काम मोठ्या जिकिरीचें असून त्यापासून मनास क्लेशहि होतात. तें कोणी हरण करील की काय अशी मनास टोंचणी लागून जन्मपर्यंत दिवस दुःखांत जातात. एपिशिअस नांवाच्या गृहस्थानें वडिलार्जित धन पुष्कळ उधळलें तरी, त्याजजवळ अडीच लक्ष मोहोरा शिल्लक राहिल्या होत्या. न जाणों त्या [illegible] जाऊन आ[illegible] भुकेनें मरण्याची पाळी येईल, अशा भीतीनें त्यानें आत्महत्या करून घेतली असा सेनेकानें एक गोष्ट सांगितली आहे. तेव्हां, संपत्ति ही लोकांशी वसून निर्धास्तपणें उपभोग घेण्याचें साधन नाहीं.

( श्लोक )

" जनयन्त्यर्जने दुःखं, तापयन्ति विपत्तिषु
मोहयन्ति समृद्धौ च कथमर्थाः सुखावहाः ? "

—सुभाषित

**भावार्थ**:—धन हें संपादन करितांना फार कष्ट देतें, नष्ट झालें तर ताप देतें, पुष्कळ समृद्धि आली तर मोह उत्पन्न करितें; तेव्हां तें सुखावह आहे असें म्हणतात तें काय अर्थानें म्हणतात हें समजत नाहीं.

शिवाय संपत्तीची योग्यता अंशतः तिचा योग्य व्यय

कसा करावा हें जाणण्यावर. व अंशतः ती संपादन करण्याचे मार्गावर ठरतें. एपिक्टिटस म्हणतो. "माझे मित्र मला म्हणतात कीं तुम्ही धन मिळवा. म्हणजे आम्हांसहि त्याचा उपभोग घेतां येईल. परंतु मित्रांनो! मला संपत्ति ही मिळवितां यावी. व मीं मिताचारी. निगर्वी. सत्यवचनी व उदारहि रहावें. असा धन मिळविण्याचा एखादा मार्ग मला दाखवा. म्हणजे मी धन मिळवीन. पण तुम्हांस निर्माल्यवत् पैशाची प्राप्ति व्हावी. म्हणून मीं आपलेसे केलेले सद्गुण घालवावे असें जर तुम्ही म्हणत असाल. तर तुम्ही किती वेडे आहां बरें! तुम्हांस पैसा पाहिजे का निःसीम व निगर्वी स्नेही पाहिजे? ज्यानें ह्या सर्व गोष्टींचें मनन केलें आहे. त्यास आनंदानें रहाण्यास. कोणताहि प्रतिबंध सहन करण्यास. जी गोष्ट न टळणारी आहे तिची शांतपणें वाट पाहण्यास. व जी घडून आली आहे ती सोसण्यास कोणाची आडकाठी आहे? गरिबीत राहून आनंदानें कसें असावें हें मी तुम्हांस दाखवितों. म्हणजे दारिद्र्याची तुम्हांस भीति वाटणार नाहीं."

क्रीसस ह्यास आपल्या संपत्तीचा मोठा अभिमान असे. त्यास सोलन ह्या जगद्विख्यात ज्ञान्या पुरुषानें बोध केला कीं. "बाबारे! ह्या संपत्तीचा तूं अभिमान बाळगूं नको. कारण. ज्याच्या जवळ तुझ्या तरवारीहून अधिक पाणीदार तरवार असेल तो ह्या तुझ्या संपत्तीचा केव्हांच मालक होऊन बसेल." तात्पर्य. लक्ष्मीसारखी चंचल वस्तु नाहीं असें म्हणतात तें कांहीं खोटें नाहीं.

( श्लोक )

" आपद्गतं हससि किं द्रविणांध मूढ,

लक्ष्मीः स्थिरा न भवतीति किमत्र चित्रं ?
एतान् पश्यसि घटान् जलयंत्रचक्रे,
रिक्ता भवन्ति भरिता, भरिताश्च रिक्ताः "

—सुभाषित

**भावार्थः** हे मूढा धनमदांधा, विपत्ति आली म्हणून एका-एकी तू रडूं नको. कारण, संपत्ति ही शाश्वत नाहीं यांत कांहीं आ-श्चर्य नाहीं. हे रहाटगाडग्याचे घोटे पहा म्हणजे तुला कळेल; भरलेले घोटे रिकामे होतात, व रिकामे झालेले पुन्हां भरून येतात.

मिड्यास यानें देवाजवळून असें मागून घेतलें कीं, मी ज्यास स्पर्श करीन तें सोनें व्हावें. मग काय विचारतां ? तो दारूस व भाकरीस शिवला तों ती सोनें झालीं. त्यानंतर निजावयास गेला तों तोहि सोनें बनला. शेवटीं अत्यंत संपन्न असूनहि त्याचा जीव त्यास नकोसा झाला. आजपर्यंत अपरंपार संपत्तीपासून मिड्याससारखे दुःखी झालेले लोक पुष्कळ होऊन गेले आहेत.

संपत्तीचा सदुपयोग केला तर ती हितकर होते. नाहीं तर तिचा मनुष्यास कांहीं फायदा नाहीं. ज्ञान. बल. सौंदर्य व कौशल्य यांचाहि असाच प्रकार आहे. या सर्वांचा जर आपले हातून दुरुपयोग होणार असला, तर त्यापेक्षां हीं नसलेलीं पुरवलीं. ज्यास आपल्या संपत्तीचा व्यय कसा करावा, हें समजत नाहीं. त्याचें. ती असल्यापासून बरें होत नाहीं. संपत्ति असल्यानें आपणास वेळ मिळ दुसऱ्यास साहाय्य करितां येतें. ग्रंथ व कला यांस उ जन देतां येतें व प्रवाससुखाचीहि जोड करून घेतां ये

आपल्याजवळ धन असावें व तें मिळविण्याची पण खटपट करावी हें कांहीं वावगें नाहीं. कारण,

( अभंग )

" धनवंता घरीं, करी धनाचि चाकरी,
होय बैसल्या व्यापार, नलगे सांडावेंचि घर;
गातीं वतां द्रव्य, अवघीं तो होता गोप्य;
तुका म्हणे मोल, देतां कांहीं नव्हे मोल. "

परंतु धनाचें वाजवीपेक्षां फाजील महत्त्व मानून, तें मिळविण्याकरितां लोक जितकी दगदग करितात, तितकी करण्यासारखी ती आवश्यक गोष्ट नाहीं. आपल्याजवळ दोन पैसे असले म्हणजे इतर व्यवसाय करण्यास वेळ फावतो. म्हणून जर संपत्तीनें महत्त्व मानून अन्य मार्गानें आपणास फावणारा वेळ वेंचून ती मिळविण्यास लागलों, तर आपली चुकी होणार नाहीं काय ? शिवाय, संपत्तीनें मनुष्याचें मन बहुधा दुर्बल होतें; परंतु एवढ्यानेंच ती नकोशी नाहीं; कारण, ती एकंदरीत फायदेशीर गोष्ट म्हणून गणलेली आहे. तिच्या ठिकाणीं कांहींना कांहीं तरी न्यून म्हणून आहेच.

" संपत्तीच्या योगानें मनुष्यास मित्र मिळतात व संपन्न पुरुषाचा मनुष्यमात्रावर मोठा अधिकार चालतो. "

एकानें[1] असें म्हटलें आहे कीं, मला धनाची आवड होती असें नाहीं; तथापि ज्या ज्या वेळीं निर्वाहापुरतेंच तें मिळे, त्या त्या वेळीं मला अडचण झाल्यासारखें होऊन माझी अर्धी बुद्धि मला सोडून जाई. कवि शेली म्हणे कीं मला धनाचा सदुपयोग करितां येतो म्हणून त्याची मी इच्छा करितों; कारण त्याच्या साधनानें मला वेळ मिळून माझे हातून उद्योग होतो, व वेळ मिळाल्यास जे

१ युरिपिडीज

ज्ञानाचा प्रसार करितात अशा सद्गृहस्थांस तो वेळहि देतां येतो.

पेपीजनें आपल्या रोजनिशींत अशी एक नोंद केली आहे कीं, " आज मला मुलामाणसांसह स्वतःचे गाडींत बसून फेरफटका करावयास मिळाला, हे देवाचे मजवर मोठे उपकार आहेत व अशीच संपन्नावस्था कायम रहाण्याबद्दल मी देवाची प्रार्थना केली. " परंतु अशा विचारांत आप्पलपोटेपणाचा भास होतो. पेपीजसारख्या ऐषआराम भोगण्या इतकी संपत्ति प्रायः व्यापाऱ्यांजवळ असते, तथापि ते जर व्यवहारनिर्बंध योग्य पाळतील, खरीं वजनें व मापें वापरतील व आचरण योग्य ठेवून सचोटीनें व्यवहार करतील, तर त्यांस आपल्या धंद्याची लाज वाटण्याचें कारण नाहीं.

धनलोभी जे आहेत, ते केवळ आपल्याजवळ पैशाचा ढीग असावा, एवढ्याच हेतूनें तो संपादन करितात. परंतु हाच हेतु त्या पैशाचा त्यांस उपभोग घेऊं देत नाहीं व ते नेहमीं दरिद्री ते दरिद्रीच राहतात. तेव्हां हे धनलोभी खरोखर दुःखी होत.

आपणांस वाटतें त्यांहूनहि आपण अधिक धनाढ्य आहों. आपण जहागीरदाराचा मत्सर करितों व आपणांस जर मोठा जमीनजुमला असेल तर फार चांगलें होईल असें म्हणतों. " परंतु आपण असे मोठे इनामदार अगर जमीनदार जरी झालों, तरी तीच जमीन आपणांस आपले दास करून टाकील. " कारण, अशी संपत्ति जवळ असल्यास आजन्म यातायात, काळजी व दगदग

१ इमरसन

आपल्यामागें लागलीच म्हणून समजावें. सूक्ष्म विचारानें बघितलें, तर आपण लक्षावधि एकरांचे मालक नाहीं काय? मैदानें, रस्ते, पायवाटा व समुद्रकिनारा, हीं सर्व आपलीं आहेत. समुद्रकिनारा आपला असल्यापासून दोन मोठे फायदे होतात. एक तर त्याजवर मनुष्याची करणी चालत नसल्यामुळें तो जसा परमेश्वरानें निर्माण केला आहे तसाच उपभोगावयास सापडतो; आणि दुसरें असें कीं, मनांत ठसण्यासारखी सृष्टीची शक्ति केवळ त्या ठिकाणींच दृष्टीस पडते. आपणांस उमजेल तर खरोखर आपण मोठे जमीनदार आहों असें वाटल्याविना राहणार नाहीं. आपणांस जमिनीची उणीव आहे, असें नाहीं. फक्त तिचा उपभोग कसा करावा हें ज्ञान मात्र आपणांस आलें पाहिजे.

बरें, इतकी इस्टेट आपल्याजवळ असून तिजपासून आपणांस त्रास होत नाहीं व तिची व्यवस्थाहि आपणांस पहाण्यास नको. जमीनदारास ही दगदग पडेल. परंतु ज्याला डोळे म्हणून आहेत, तो त्या जमिनीचा देखावा पाहून तिचा उपभोग घेईल. जीं वनें आहेत त्या आपल्या बागा आहेत. त्यांजवर आपली मालकी आहे असें नाहीं; परंतु हजारों लोकांस त्यांचा उपभोग घेतां येतो. या दृष्टीनें तीं आपलींच आहेत.

( आर्या )

धनिकाचा बाग असो-सुंदर पुष्पीं फलीं विनम्र तरू
डुलती, पाहुनि त्यानें, चित्त तयाचें सुखास कां न वरू?
उपवन तोहे त्याचें, तरि होतो मोद त्यास काय कमी?
नयनोत्सव घेण्याला, विपुला पृथ्वी, कथांत गायक मी.

उन्नतपर्वत, निर्झर, थोर दरी, शुभ्र उदक पाटांचें,
पाहुनि चित्त रमे बहु, तेंवि उदधींत मथन लाटांचें;
ऐशी लूट सुखाची, घेउनि होई कृतज्ञ फारचि तो;
प्रभुच्या गुणगानातें प्रेमभरानें अहर्निशीं रचितो.

—कुसुमांजली

( श्लोक )

" धर्मार्थकाममोक्षाणां मूलमुक्तं कलेवरं;
तत्र सर्वार्थसंसिद्ध्यै भवेद्यद् निरामयं. "

भावप्रकाश

**भावार्थ:** - शरीर हे धर्म, अर्थ, काम, मोक्ष या चारी पुरुषार्थांत मुख्य साधन आहे हे खरे; परन्तु केव्हां? निरोगी असेल तर. करितां त्याचें यत्नपूर्वक रक्षण करावें, म्हणजे सर्वार्थसिद्धि होईल

# प्रकरण १३

## शरीरसंपत्ति

धनसंपत्ति ही आपल्यास हितावह आहे की नाहीं, याजविषयीं कांहीं मतभेद जरी असला, तरी आरोग्याविषयीं सर्वांचें एकमत आहे. " मनुष्यास प्रथम आरोग्य, नंतर सौंदर्य, नंतर योग्य मार्गानें मिळविलेली संपत्ति, व नंतर मित्रांचे सहवासांत तारुण्यांतील सुखोपभोग असावा." " आरोग्य नसेल तर मनुष्यास जिवाचें ओझें होतें; तेंच आरोग्य असलें म्हणजे त्याचें सर्व आयुष्य आनंदांत व सुखांत जातें." एम्पिडॉक्लीज यानें एक दलदल कोरडी करून, तिजपासून उत्पन्न होणाऱ्या रोगाच्या साथीपासून सेलिनस एथील लोकांस मुक्त केलें, म्हणून ते लोक त्यास ईश्वराप्रमाणें मानीत असत. त्यांनीं त्याच्या सन्मानार्थ एक पदकहि तयार केलें होतें असें सांगतात.

वैद्यांचे आपणांवर केवढे उपकार होतात. हें आपण चांगलें मनांत आणीत नाहीं. आपले वैद्यक दिसण्यांत सोपें असल्यामुळें त्याचें महत्त्व आपणांस समजत नाहीं. आपण आजारी पडलों, तर वैद्यास बोलावितों. तो प्रकृति पाहून औषध देतो. तें आपण घेतों, व वैद्यास त्याचे श्रमाबद्दल द्रव्य देतों. परंतु कित्येक अज्ञान लोकांत रोग व देहयातना ही भूतपिशाचकृति आहे असें मानितात. अशा लोकांत खरा वैद्य नसून, जादूटोणा करणारा देवऋषी असतो. तो रोग्याचे अंगांतून मंत्रसामर्थ्यानें भूत घालविण्याची खटपट करितो.

1 सिमोनायडीज 	२ लाँगफेलो

कित्येक देशांत रोगी औषध न घेतां, अशा देवऋष्यानें पाटीवर लिहून दिलेल्या यंत्रमंत्राचें तीर्थ घेतो. कित्येक प्रसंगीं रोग्याबद्दल वैद्यच औषध घेतो. परंतु ही औषधोपचारपद्धति फार दिवस कायम राहत नाहीं. कारण, ज्याकडे फार रोगी येतात अशा वैद्यास ही पद्धति प्राणसंकटच होय. वैद्यास त्याचे श्रमाबद्दल द्रव्य देण्याचा प्रकारहि कित्येक ठिकाणीं मोठा चमत्कारिक आहे. जोंपर्यंत मनुष्य चांगला आहे, तोंपर्यंत वैद्यास वेतन देण्याची व तो आजारी पडल्या कीं तें बंद करण्याची चाल चिनी लोकांत आहे. प्राचीनकाळीं मिसर देशांत प्रथम कांहीं दिवस रोगी वैद्यास पोशी; नंतर रोगी बरा होईपर्यंत त्यास पोसणें वैद्यास भाग पडत असे. ही पद्धति रोग्याच्या दृष्टीनें योजनेंत बरी दिसते, परंतु तेणेंकरून एकादा अघोरी उपाय करण्याविषयीं वैद्यास मोह पडण्याचा संभव आहे.

वैद्यानें हातून आपलें हित होतें हें जरी निर्विवाद आहे, तरी आरोग्यरक्षण मनुष्य स्वतः जितकें करील, तितकें मोठ्या वैद्याचे हातूनहि होणार नाहीं. सर्वांस आरोग्य जरी अमोल वाटतें, तरी तें संपादन करण्याकरितां थोडेच लोक श्रम घेतात अगर अल्पस्वल्प श्रम सोशितात. कित्येक तर जाणूनबुजून आपली प्रकृति बिघडवून घेऊन अवेळीं मरण अथवा वृद्धावस्था आपणावर ओढवून घेतात.

कित्येकांची जन्मतःच अशी प्रकृति असते कीं, त्यांस निरोगी राहतांच येत नाहीं. पोप कवि जन्मतः इतका रोगी होता कीं, माझी सर्व हयात हा एक फार दिवस टिकणारा रोगच आहे, असें तो म्हणत असे. मा-

ऱ्या देहभोगामुळेंच मी जिवंत राहिलों आहें असेंहि कित्येक म्हणूं शकतील. परंतु अशीं उदाहरणें सुदैवानें फारच थोडीं आहेत. इच्छा असली, तर आपणांपैकीं बहुतेकांस निकोप राहतां येईल. आपण आजारी पडलों तर तो दोष प्रायः आपलाच असतो. जें करूं नये तें आपण करितों. जें करावें तें करीत नाहीं, आणि मग जर आजारी पडलों तर आश्चर्य करीत बसतों. कांहीतरी अद्भुत चमत्कारानें आपण निरोगी असावें अशी इच्छा करून आपल्या हातीं असलेले स्वल्प उपाय आपण करीत नाहीं. आपल्या हातानें पाहिजे त्या वेळीं आपणास आजारी होतां येईल हें आपणांस समजतें, परंतु आरोग्यरक्षण करणें हेंहि आपल्या हातीं आहे, हें आपण उमजत नाहीं. ज्या देहयातना आपण भोगितों, त्यांपैकीं बहुतेक आपल्या क्रियेचें फल असतात.

आमच्या तरुण लोकांच्या मनावर आरोग्याचें महत्त्व चांगलें ठसविलें जातें कीं नाहीं याचा संशयच आहे. ह्या म्हणण्याचा अर्थ, क्षुल्लक दुखण्यांचा मोठा बाऊ करून मन व्यग्र करून घ्यावें, अगर रात्रंदिवस रोगावर लिहिलेलीं पुस्तकें वाचीत असावें अथवा औषधें घेत बसावें असा नाहीं. आपण आजारी आहों, असी आपण जितकी कल्पना करणार नाहीं व अल्पस्वल्प दुखण्याकडे जितकें दुर्लक्ष करूं तितकें आपण निरोगी राहण्याचा संभव आहे.

मनुष्यास चाळिशी आली, कीं तो एक मूर्ख तरी होतो नाहींतर वैद्य तरी बनतो अशी एक म्हण आहे. परंतु दुर्दैवेंकरून चाळिशी उलटली कीं बहुतेक तहसींचे आजारीच बनतात.

आपण दुखणेकरी झालों तरी खिन्न असूं नये. एक

रोग आला तर दुसरे रोग आपणांस होत नाहीत. म्हणून समाधान मानीत जावें. सिडनी स्मिथ याची नेहमीं आनंदवृत्ति असे. त्यानें एकदां आपल्या मित्रास लिहिलें कीं मला संधिवात, दमा आणि दुसरे सात रोग झाले आहेत. बाकी मी बरा आहें. नेहमीच्या दुखणेकऱ्यांपैकीं बऱ्याच लोकांनी सिडनी स्मिथसारखी आनंदवृत्ति ठेवून आपली यातना सोशिली आहे. कर्यापेनल्स हा आपलें मन एकाग्र करून दुःखाकडे इतकें दुर्लक्ष करी की, तो अत्यंत तीव्र यातनांसहि जुमानीत नसे. ज्यास आपलें मन असें एकाग्र करितां येऊन त्यास आळा घालितां येईल, तो या आयुष्यांतील अल्प दुःखांची कधींहि पर्वा करणार नाहीं. अशा पुरुषाचे मनास जरी काळजी असली, किंवा त्याचे शरीरास तीव्र यातना होत असल्या, तरी त्यास आपलें मन शांत ठेवितां येऊन, शरीरभोगास व काळजीस जिंकून टाकितां येईल.

अज्ञानामुळें व हयगयीमुळें आपणास किती दुःख होतें व किती अमोलिक मनुष्यें अल्पायुषी मरण पावतात याचा विचार केला तर दुःख झाल्याशिवाय राहणार नाहीं. थोडीशी काळजी धरली असती, तर पुष्कळ महान् पुरुष अकालीं मरण पावले नसते. परगोलेसी हा २६ वे वर्षी, मोझार्ट ३२ वे वर्षी, पर्सेल ३७ वे वर्षी, व मेंडेलसोन ३८ वे वर्षी मरण पावला. ह्या पुरुषांचे मरणानें जगाचें केवढें नुकसान झालें आहे तें सांगतां येत नाहीं.

ग्रीक लोकांत अशी एक दंतकथा आहे कीं, मेलीगर ह्या पुरुषास, एक लांकडाचा तुकडा जितका काळ टिकेल तितके दिवस मरण यावयाचें नाहीं, असा वर होता.

म्हणून त्याच्या आईनें तो तुकडा फारच जतन केला व मेल्चिगर हा बहुत काळ वांचला. अशाच दक्षतेनें, ज्या शरीरस्वास्थ्यावर आपलें सर्व सुखदुःख अवलंबून आहे त्याची जतन आपण करीत नाहीं. हें आश्चर्य आहे.

साधी राहाणी. नियमित वर्तन. दररोज व्यायाम, स्वच्छता व खाण्यापिण्यांत नेमस्तपणा. इत्यादि उपायांनीं आरोग्यसंरक्षण होतें. मद्यप्राशनाचे काय दारुण परिणाम होतात. हें एथें सांगण्याचें कारण नाहीं. फाजील खाण्यापासून शरीरप्रकृतीस विकार होतो हें लोकांनी चांगलें समजून घेतलें पाहिजे. अग्निमांद्यामुळें बरेच लोक आजारी असतात. परंतु यांपैकीं शेंकडा ९० लोकांचा आजार त्यांचाच दोष असतो. अनियमित खाण्यापासून व व्यायाम न केल्यामुळें हा आजार त्यांस जडलेला असतो. जर तुम्हास दीर्घायु व्हावयाचें असेल तर अल्पाहार सेवन करा. अशा अर्थाची एक म्हणहि आहे. साधें राहून. उत्तम विचारांत काळ घालविल्यास बहुतकांस निरोगी राहतां येईल. साधारण निरोगी मनुष्य मिताहारी असला, म्हणजे मग तो काय खातो आणि न खातो याचा फारसा विचार करण्याचें कारण नाहीं.

ग्लॅडस्टन् यांची अलौकिक शरीरसंपत्ति जगास महशूर होती. ही त्यांस कशी प्राप्त झाली हें त्यांनींच सांगितलें आहे. एक घास घेतला कीं तो पंचवीस वेळां चावल्यावांचून ते गिळीत नसत. हा त्यांचा क्रम त्यांनीं लहानपणापासून कायम ठेविला होता, म्हणूनच ते इतके वृद्ध झाले असतांहि त्यांची प्रकृति एकाद्या नवीन बांढा-

सारखी निकोप असे. " मेजवानीस बोलावणें आल्यास जात जा; परंतु अशा रीतीनें हात राखून जेवा कीं, पानावरून उठला कीं भूक आपली कायम ती कायम."

खाण्यापिण्यांत नेमस्तपणा राखा, हें सांगणें सोपें आहे; परंतु त्याप्रमाणें वागणें फार कठिण होय. आजपर्यंत हजारो लोकांनीं भुकेबाहेर खाऊन रोगाचें साधन करून ठेविलें आहे. मिताहारी जो आहे, त्यास खाण्यापिण्यापासून अखेर जें सुख होतें तसें आचाशास किंवा मद्यप्यास कधीं होत नाहीं. स्वादाडास " सोन्या भाकरीची शानदार चव कशी ती ठाउकी नसते." तेव्हां सुखानंदांचेच दृष्टीनें खाण्यापिण्याकडे पाहिलें तरी वरील नियमच लागू पडतो. चांगले श्रम अथवा रपेट घेतल्यानंतर फलाहार करून जें समाधान होतें, त्याची थोरवी राजवाड्यांतील मेजवानीपासून होणाऱ्या समाधानास सुद्धां येत नाहीं. मला पुष्कळ वेळपर्यंत जेवतां यावें, म्हणून बगळ्यासारखी लांब मान असती तर बरें झालें असतें, असें इपिशिअस म्हणत असे. परंतु असें देवापाशीं कोणीहि मागूं नये. खाण्यापिण्यापासून होणारें सुख हें जरी इतर कित्येक सुखांपेक्षां गौण असलें, तरी त्याजबद्दल आपण देवाचे आभारच मानावे. खाणेंपिणें हें सांजसकाळ पाठीमागें लागलें आहे अथवा त्याचा संबंध जीवात्म्याशीं नसून नाशवंत शरीराशी आहे, म्हणून त्यापासून होणारें सुख मिथ्या आहे असें नाहीं.

उत्तम भूक लागणें, ही एक सर्व शरीर व मन स्वस्थ आहे कीं नाहीं हें पहाण्याची कसोटीच आहे. भूक हातपाय हलविल्याखेरीज लागत नाहीं. श्रमांनीं सर्व गो-

१ हेरिक् २ स्मामर्टन

ष्टी मनुष्यास लाभतात. हा सिद्धांत भुकेसहि लागू पडतो. मित्रांस घेऊन डोंगरावर अथवा समुद्रकिनाऱ्यावर फिरून आल्यानंतर जेवावयास बसणें. हें सुख तुच्छ मानण्यासारखें कोण म्हणेल?

जेवतांना आनंदवृत्ति ठेवणें व थट्टामस्करी करणें. ह्या गोष्टी स्वतः आनंदकारक असून, आरोग्यासहि चांगलें साहाय्य करितात. भूक ही अन्नास चव देणारी आहे असें म्हणतात. परंतु चांगली भूक असून जेवतांना जर कोणी सुंदर गोष्टी सांगितल्या तर त्या पुष्कळांस आवडतील. जशी मिठाशिवाय अन्नास रुचि येत नाहीं. तसेंच विनोदाशिवाय संभाषण अथवा लेख मनोहर वठत नाहींत. गीतेसारख्या सर्वोत्तम बोधपर ग्रंथांत विनोद नसावयाचाच; परंतु कोणत्याहि ग्रंथांत तो मुळींच असूं नये, असें कोणीहि म्हणणार नाहीं. एखादें हास्यरसप्रधान नाटक हातीं घेऊन जेव्हां त्यांतील विनोदपर भाषणें व मौजेचे प्रवेश आपण वाचितों. तेव्हां जगतांत जी उत्तम संगत तिचा आपण उपभोग घेतों, असें म्हणण्यास चिंता नाहीं.

तुला विनोद हा कसा तो कळत नाहीं, असें जर एकाद्यास म्हटलें तर त्यास राग येतो. कारण, आनंदानें रमणें हा मनुष्याचा एक धर्म आहे. पश्वादि जातींतल्या वरच्या कोटींतील प्राण्यांस मनुष्यासारखी चांगली विचारशक्ति जरी नसली. तरी त्यांस कांहीं तरी तशी शक्ति आहे असें सिद्ध होतें; परंतु त्यांची थट्टा केली तर ती समजून त्यांस हसूं येतें, असें दिसत नाहीं.

विनोदाच्या भाषणानें कित्येक प्रसंगीं तर मोठमोठे कलह मिटले आहेत. ज्या दिवशीं आपणास हसें आलें

नाहीं, तो दिवस खरोखर आपण व्यर्थ घालविल्यासारखा होतो." कोणी कोणाची थट्टा केली तर जें आपणास हसूं येतें, तें आपोआप येतें हा विनोदाचा एक मोठा गुण आहे. "असत्यास मी हसावयास लावीन, असें म्हणून त्यास हसविता येत नाहीं. जर कोणी हसत्या तर आपण कां हसतों हें त्यास सांगतां येत नाहीं, व आपण हसावयाचें नाहीं असा विचार केला तर हसें अधिकच कोसळतें." शिवाय एकजण हसावयास लागला म्हणजे दुसराहि हसूं लागतो. जो विनोदी असतो तो एकटाच गमती असतो असें नाहीं; तो दुसऱ्यासहि विनोदी करून सोडितो.

सेणेकरून मनुष्यास हसूं येतें ती गोष्ट त्यास हितकर असते. "मनुष्यानें हसावें हें फार इष्ट आहे. जर मनुष्यास कार्डीनें गुदगुल्या होऊन हसूं आलें, तर ती एका सुखाचेंसें काय परंतु सर्व आरोग्याचें साधनच समजावी."

जे लोक शहरांतून राहतात त्यांनीं दिवसाचा जितका वेळ उघड्या हवेंत घालवेल तितका घालविण्याचा नियमच करावा. शरीर निरोगी राहण्यास ताज्या हवेसारखें दुसरें औषधच नाहीं. इंग्लंडांतील जुनाट घराणीं, खरोखर पहातां खेड्यांतून अगर लहान लहान गांवांतून राहणारीं आहेत म्हणून तीं इतकीं वर्षे टिकलीं आहेत. जे लोक घरीं बसून ग्रंथवाचनांत वेळ घालवितात, परंतु नद्यांच्या कांठानें, रानावनांतून अगर डोंगरांतून फिरत नाहींत, त्यांचे हातून शरीर निकोप राखण्याच्या कर्तव्याची हेळसांड होण्याचा संभव आहे.

हिंदुस्थानांतील लोकांस उघड्या हवेची किंमतच क-

१ शामफर्ट २ हाजलिट ३ ड्रायडन्

ळत नाहीं. इकडील एक प्रवासी इंग्लंदांत गेला व तेथे कांहीं इंग्रज लोक उघड्या हवेंत चेंडूफळी खेळतांना त्यानें पाहिले. परंतु त्यास जेव्हां कळलें कीं ते सर्व खेळणारे गडी श्रीमान् आहेत. तेव्हां त्यानें पुसलें कीं, हा खेळ खेळण्याकरितां हे लोक मोल देऊन गरीब माणसें कां ठेवीत नाहींत ? बहुतेक इंग्रज लोकांस उघड्या हवेची फार आवड असून तशा हवेंत खेळण्याची त्यांस अत्यंत हौस असते. शिवाय त्यांस शिकारीचाहि नाद असतो.

कवि वर्डस्वर्थ यानें प्रत्येक दिवशीं बाहेर फिरण्याचा नियम केला होता. तो म्हणत असे कीं, कसलीहि हवा पडो. मी नित्य न चुकतां फिरावयास जातों. म्हणून मला कधीं वैद्यास बोलाविण्याचा प्रसंग येत नाहीं.

घरांत बसून खिडकींतून पाहिलें तर पाऊस खरोखर पडत असतो त्यापेक्षांहि अधिक जोरानें पडत आहे, असा भास होतो. हिंवाळ्यांत थंडीच्या संबंधानेंहि असेंच वाटतें. परंतु अशा हवेंत एकदां आपण बाहेर पडलों म्हणजे स्वच्छ व ताज्या हवेनें मनास नवी उमेद व हुषारी येते. कारण. झाडांसारखा मनुष्यहि प्रायः हवेवरच राहतो.

ज्या वेळेस आकाश स्वच्छ असतें, जिकडे तिकडे पक्षी गात असतात, व जमिनीवर फुलें उमलतात, त्या वेळेस घोड्यावर बसून फेरफटका करणें, अथवा होडींत बसून नदीवर किंवा समुद्रावर फिरणें, अगर रानांत किंवा समुद्रकिनाऱ्यानें रपेट घेणें, यासारखी शरीरास हितकर दुसरी कोणती गोष्ट आहे ?

ल्हान मुलांस जन्मतः जो खेळण्याचा छंद असतो, तो त्यांच्या शरीरास हितकर असतो. आमच्या

शाळांतून निरनिराळे खेळ मुलांकडून खेळवीत नाहीत. व एकंदर शारीरिक शिक्षणाकडे दुर्लक्ष होतें. हें एक शिक्षणक्रमांत मोठें न्यून आहे. चेंडूफळी अथवा इटीदांडू खेळणें, तसेंच पोहणें अथवा बोटींत बसून हिंडणें, यांपासून मुलांचे मनास फारच आनंद होतो. इतकेंच नाहीं, तर हीं त्यांचे शरीरास उत्तम औषधेंच आहेत.

आपणांस नेहमींच स्वस्थ झोंप येते असें नाहीं. एखाद्या महत्त्वाचे कामाचा आपणांस निकाल लावावयाचा असल्या तर तो आपल्या हातून योग्य रीतीनें कसा लागेल, अशा चिंतनेनें आपल्यास झोंप येत नाहीं. परंतु आपण उघड्या हवेंत चहून फिरलों तर आपणांस उत्तम झोंप लागते. व उत्तम झोंप लागली तरच आपणास हुशारी येऊन, " ह्या वेळेस जिकडे तिकडे सुवास सुटला आहे व मंद वायु वाहत आहे " अशा प्रभातकाळच्या शोभेचा उपभोग घेतां येईल; एरव्हीं येणार नाहीं.

"१ मी म्हणजे हें कलेवर वागविणारा एक जीवात्मा होय " असें एपिक्टटस म्हणत असे. परंतु असा शरीराचा निषेध करणें हा एकप्रकारचा कृतघ्नपणा होय; कारण, हा देह जरी नाशवंत व क्षणभंगुर असला, तरी त्याची थोरवी कमी आहे असें नाहीं. आपणांस डोळे नसते तर जगाच्या सौंदर्याचा व आकाशाच्या वैभवाचा आपणांस उपभोग घेतां आला असता काय? आपणांस कान नसते तर मित्रांची वाणी व संगीत ऐकून आपणांस आनंद होता काय? वाटेल त्या वेळेस व सांगूं तेव्हां काम करण्यास नेहमीं तत्पर असे हे आपले हात आपल्या

मुखाचीं साधनें नाहींत काय ? आपले पाय कांहींएक कुरकुर न करितां दगडाळ मार्गांतून आपणांस चालवीत नाहींत काय ? मग शरीरास इतकें क्षुल्लक कां म्हणून मानावें ?

" आपलें शरीर ही एक हजार तारांची वीणा आहे. परंतु आश्चर्य हें कीं, ती एकदां वाजविली की बहुधा बेसूर होत नाहीं. " ह्या शरीराची रचना इतकी नाजूक, अलौकिक व सूक्ष्म आहे कीं, आपण इतक्या दिवस जगतों, हें एक मोठें नवल आहे. ह्या शरीराचे अनेक भाग, इंद्रियें व अंगें आणि त्यांचे व्यापार दिवसांचे दिवस व वर्षानुवर्षें असे नियमित व अव्याहत रीतीनें चालतात कीं आपणांस शरीर आहे हें समजत देखील नाहीं. ह्या गोष्टी मनांत आणिल्या म्हणजे तर आपल्या आश्चर्यास सीमाच रहात नाहीं.

मनुष्यदेहांत नाना आकारांचीं दोनशेंहून अधिक हाडें आहेत. त्यांस यत्किंचित् इजा आल्यास आपल्या हालचालींस चांगलाच व्यत्यय येतो. त्याच शरीरांत पांचशें स्नायु असून, त्या प्रत्येक स्नायूस पोसणाऱ्या व त्यास चालविणाऱ्या अनंत रक्तवाहिन्या आहेत. आपल्या स्नायूंपैकी एक स्नायु म्हणजे काळीज. हें वर्षांतून ३ कोट वेळां उडतें. तें एकदां बंद पडलें कीं आपला प्रंथच आटोपतो. आपल्या अंगाच्या कातड्याचीहि रचना तशीच आश्चर्य करण्यासारखी आहे. त्यांत घाम येणारे २० लक्ष मांसपिंड आहेत. यांच्यायोगानें शरीराची उष्णता कायम राहते. हे २० लक्ष मांसपिंड व कातड्याचा पृष्ठभाग या दोहोंस जोडणाऱ्या ज्या वाहिन्या आहेत त्यांची एकंदर लांबी पांच कोश आहे.

शिवाय धमन्या, नाड्या, केसासारखे सूक्ष्म स्नायु, यांच्या वांतींचा व ज्या रक्तांत लक्षावधि अणु आहेत त्यांचा विचार करा. तसाच डोळा यासारख्या ज्ञानेंद्रियाची रचना पहा. त्याची ती बाहुली, कांचेसारखें बुबूळ, नेत्रदर्पण व त्यांतून वाहणारें पाणी वगैरेचें मनन करा. नेत्रदर्पण कागदासारखें पातळ असून त्यास १० निरनिराळे पापुद्रे आहेत. त्यांपैकीं शेवटचा पापुद्रा ३ कोट मांसरेषांचा व ३० लक्ष सुळक्यांचा बनविला आहे. परंतु ह्या शरीरांत विशेष आश्चर्य करण्यासारखा मेंदू होय. ह्या मेंदूंत जें पांढरें द्रव्य आहे. त्यांत ६० कोटी कोश असून, प्रत्येक कोशांत दिसण्यांत येणारे असे हजारों कण आहेत. व प्रत्येक कणांत लक्षावधि अणु आहेत.

असें विचित्र व नाजूक असतांहि, योग्य काळजी घेतल्यास, हें शरीर निरोगी राखून व त्याचे व्यापार व्यवस्थित चालू ठेवून, आपणांस दुःख न होतां व आपलें समाधान न मोडतां, त्याचें पुष्कळ वर्षे रक्षण करितां येतें. आणि शेवटीं वृद्धापकाळ आला असतां अशी आशा करण्यास आपणांस सबळ कारण होतें.

( श्लोक )

" जेवीं तंतुवरी स्वहस्ततल तो प्रेमें हळू ठेवुनी,
वीणावादक थोपवी स्फुरतसे जो मंजु वीणाध्वनी;
तैसा, निष्ठुर होउनी न करितां आघात माझ्यावरी,
वात्सल्यें मम नेत्र झांकिल करें वृद्धापकाळीं हरि. "

( श्लोक )

" दर्शने स्पर्शने वापि श्रवणे भाषणेऽपि वा.

यत्र द्रवत्यन्तरंग स स्नेह इति कथ्यते. "

—सुभाषित

**भावार्थः**—ज्याने योगाने दर्शन, स्पर्श, श्रवण किंवा भाषण इत्यादि प्रसंगी अंतःकरण सद्गदित होते, त्यास स्नेह म्हणतात.

# प्रकरण १४

## प्रेम

प्रेम हें आपल्या जन्माचें सार आहे असें म्हटलें असतां चालेल. ज्यावर आपलें प्रेम आहे. असा कोणी तरी असल्याशिवाय. कोणत्याहि गोष्टीचा आपणास पूर्ण उपभोग घेतां येत नाहीं. आपण एकटे जरी असलों तरी पुढें मागें कोणावर तरी प्रीति करूं. असें समजून त्याजकरितां आपलीं सुखसाधनें आपण जपून बाळगून ठेवितों. आपण ल्हान असो मोठे असो. श्रीमान् असो दरिद्री असो. कोणावर तरी प्रीति करीत असतोंच. ल्हानपणीं मातापितरांवर. तरुणपणीं भार्येवर. वृद्धापकाळीं मुलांवर. व सर्वकाळीं भाऊबहिणी व आप्त यांजवर प्रेम करितों. आपल्या मित्रांवर आपण किती प्रेम करितों हें सर्वांस माहीत आहेच. तें प्रेम केव्हां केव्हां तर स्त्रियांवरील प्रेमाहूनहि अधिक दृढ असतें. परंतु मित्रप्रेमाविषयीं पूर्वी एकदां उल्लेख झालाच आहे.

मातापितरांचें जें आपल्या मुलांवर प्रेम असतें त्याशीं परमेश्वराच्या प्रेमाची तुलना केलेली वारंवार दृष्टीस पडते:—

( अभंग )

"बाळ काय जाणे जीवनउपाय, मायबाप वाहे सर्व चिंता;
आयतें भोजन खेळणें अंतरीं, अंकिताचे शिरीं भार नाहीं;
आपुलें शरीर रक्षितां न कळे, सांभाळूनि लळे पाळी माय;
तुका म्हणे माझा विठ्ठल जनिता, आमुची ते सत्ता तयावरी."

अथवा—

बाळ माते निष्ठुर होये, परि ते स्नेह करीत आहे;
तैसा तूं गा पुरुषोत्तमा, घडी न विसंवसी आम्हां;
नेणती भागली, कडे घेतां अंग घाली;
भूक साहे तान्हे, त्याचे राखे समाधान;
त्याच्या दुःखे धाये, आपला जीव देऊं पाहे;
नांव घाली उडी, तुका म्हणे प्राण काढी. ''

ल्यूकत्रा येथील लढाईत विजय पावल्यावर, एप्यामिन्यान्डास म्हणाला की, ही विजयवार्ता ऐकून माझ्या आईबापांस फारच संतोष होईल, म्हणून तर मला अत्यंत आनंद होतो.

आपण कित्येक जनावरांवरहि प्रेम करितों. ज्या स्वर्गांत सर्व सारखेच गणले जातात, तेथे मरणानंतर आपल्याबरोबर आपल्या कुत्र्यासहि जागा मिळेल, असें जे रानटीलोक मानितात त्यांच्या प्रेमवृत्तीचें आपणास कौतुकच वाटलें पाहिजे. आपल्याबरोबर आपल्या कुत्र्याचा स्वर्गांत प्रवेश होत नाही असें पाहून स्वर्गाहि सोडण्यास धर्मराज तयार झाला, ही महाभारतांतील कथा फारच हृदयद्रावक आहे:—

( आर्या )

" धर्म म्हणे, भक्ताचा त्याग असे ब्रह्मवधसम स्पष्ट
तस्मात् स्वसुखार्थ न या, त्यजिन सखा सुख जयापुढें कष्ट.

* * * *

यास्तव केला दार-भ्रात्यांचा तो अकार्य न त्याग,
या भक्ता शुनकातें टाकिन तरि मज घडेल अत्याग.
मित्रद्रोह, स्त्रीवध, शरणागतदान विप्रधनहरण
वा या चतुष्टयासम, भक्तत्याग न घडो, घडो मरण. "

—मोरोपंत

आपल्या सुखासाठीं किंवा मनोरंजनाकरितां, मोठ्या जनावरांस काय परंतु ज्यांस दुखविलें असतां दुःख होतें अशा सूक्ष्म प्राण्यांसहि इजा देणें हें पाप आहे, अशी 'अहिंसा परमो धर्मः' या वाक्यांत सांगितल्याप्रमाणें मनुष्यमात्राची ज्या दिवशीं वृत्ति होईल आणि प्रत्येक मनुष्य–

( ओंव्या )

" तैसे परमाणु पां गुंतले, जाणूनि जीव सानुले,
तेथ कारुण्यामाजि पाउलें, लपवूनि चाले;
ते वाट कृपेची करित, ते दिशाचि स्नेहभरित,
जीवातळीं आंथरित, आपुला जीव. "

ज्ञानेश्वर

असा वागेल, तो दिवस सोन्याचा गणला जाईल.

परंतु ह्या ठिकाणीं स्त्रीपुरुषांतील प्रेमाविषयीं विशेष उल्लेख करावयाचा आहे. " स्त्रीपुरुषांतील प्रेमाचें सौंदर्य, सर्व तंतुवाद्यांच्या गोड स्वराहून अधिक मनोहर आहे. " " प्रेमामुळें स्त्रिया किंवा पुरुष आपल्या प्रिय माणसांकरितां मरण्यास तयार होतात. आलेस्टिज हें सर्व ग्रीस देशांत एक महान् स्त्रीरत्न होऊन गेलें. ही स्त्री आपल्या नवऱ्याकरितां प्राण देण्यास तयार झाली. तिच्या पतीस आईबाप व इतर आप्त होते, तरी तसें करण्यास त्यांपैकीं कोणीहि पुढें सरसावला नाहीं. परंतु ह्या स्त्रीचें प्रेम असें कांहीं बलवत्तर होतें कीं त्यापुढें आईबापांचें आपल्या पुत्रावर असलेलें प्रेम फिकें पडून ते फक्त नांवाचे आप्त असे मात्र दिसून आलें. हें या स्त्रीचें कडकडीत पातिव्रत्य देवांस तसेंच मनुष्यांस इतकें आवडलें

१ ब्राऊन २ प्लेटो

कीं, देवांनीं सुप्रसन्न होऊन तिला पुन्हां पृथ्वीवर जाण्याची परवानगी दिली. अशी परवानगी आजपर्यंत थोड्याच स्त्रियांस मिळाली असेल. देवांनीं, तिचें अलौकिक पतिप्रेम व सद्गुण पाहून असा तिचा बहुमान केला." हिंदुस्थानांतहि, ज्या स्त्रिया सती गेल्या आहेत त्यांस लोक वंद्य मानितात. आतां, ही सती जाण्याची चाल कालमान पहातां चांगली किंवा वाईट, हा विचार निराळा.

"प्रेमानें मनुष्यांचीं मनें निर्मळ होऊन तीं एकत्र जमतात. त्यांची कठोरवृत्ति नाहींशी होऊन तीं एकमेकांवर ममता करितात. शत्रुत्व नष्ट होऊन तीं मित्र होतात. प्रेम हा सज्जनांचा आनंद, शहाण्याचें नवल, व देवांचें कौतुक होय. तें सर्वांस हवेंसें असून साध्य झालें म्हणजे मोलानें आगळें भासतें. प्रेम हें कोमलता, आराम, इच्छा, ममता, मार्दव व सौंदर्य या गुणांचें जनक होय. जेवढें चांगलें तेवढें घेऊन, प्रेम वाईटाचा त्याग करितें. प्रत्येक भाषणांत, कृतींत, इच्छेंत तें आपला मार्गदर्शक होऊन व आपणास सोबत करून, आपलें संरक्षण करितें. तें देवांचें व मनुष्यांचें वैभव असून सर्वांस मार्ग दाखवितें. त्यानें दाखविलेल्या मार्गानें सर्वांनीं जावें हें इष्ट होय."

प्रेमाची उत्पत्ति कशी झाली ह्या प्रश्नाचा उलगडा करण्याकरितां ज्ञात्या पुरुषांनीं पुष्कळ परिश्रम केले आहेत. प्लेटो म्हणतो कीं, "अगदीं प्राचीन काळीं मनुष्याचा आकार वाटोळा होता. त्याची पाठ व दोन कुशी वर्तुळाकृति असून त्यास चार हात, चार पाय, एक डोकें

१ अग्याथान

व दोन तोंडें होतीं. त्याची मान शरीरासारखीच वाटोळी असे. तो उभा चाले व वाटेल तेव्हां पुढें किंवा मागेंहि त्यास चालतां येत असे. किंवा चार हातांवर व चार पायांवर डोंबाऱ्यासारख्या त्यास कोल्हांट्या मारितां येत असत. हीं माणसें मोठीं बलाढ्य असून त्यांची महत्त्वाकांक्षाहि बलवत्तर होती. त्यांनीं एकदां देवांवर हल्ला करण्याचें योजून स्वर्गी चढण्यास आरंभ केला. तेव्हां राक्षसांस जसें नाहींसें केलें, तसा यांचाहि आपल्या वज्रांनीं नाश करावा कीं काय, असा देवांस विचार पडला. परंतु तसें केल्यानें, आपल्या नांवानें होत असलेलीं होमहवनें व पूजा हीं होणार नाहींत. म्हणून तो प्रकार त्यांस प्रशस्त वाटेना. शेवटीं झिअस् या देवानें त्या मनुष्यांचा गर्व हरण करण्याची एक युक्ति लढविली. तो म्हणाला कीं, मी यांस दुभागतों, म्हणजे यांची शक्ति निमें होऊन आपल्या नांवानें होमहवनेंहि दुप्पट होतील व हीं माणसें दोन पायांवर उभीं चालतील. त्यांनीं पुन्हां आपल्याशीं असाच फंदफितूर केला, तर त्यांस आणखी विभागून उडत उडत चालण्यास लावीन. असें म्हणून त्यानें लागलींच मनुष्यांस दुभागिलें. हे दोन भाग एकमेकांच्या सहवासाची इच्छा करितात. एकास जेव्हां दुसरा सांपडतो, तेव्हां ते दोन्ही भाग प्रेमानें व स्नेहानें बद्ध होतात. एक क्षणभरहि हे एकमेकांस दृष्टिआड होऊं देत नाहींत. हे दोन्ही भाग सर्व जन्म एके ठिकाणीं काढितात. ते एकमेकांची काय म्हणून इच्छा करितात हें त्यांस कळत नाहीं. त्यांचा एकमेकांकडे जो अनावर ओढा असतो, त्याच्या कारणाची त्यांस फक्त अस्पष्ट कल्पना असते."

वरील कथा खरी असो अथवा खोटी असो, एवढें खरें कीं, स्त्रीपुरुषांनीं एकमेकांस पाहिलें म्हणजे कधीं कधीं त्यांचें लागलीच एकमेकांवर असें दृढ प्रेम बसतें कीं तें कधीं विटत नाहीं व पुढेंमागें पश्चात्तापासहि कारण होत नाहीं. पाहिल्याबरोबर पुरुषाचें किंवा स्त्रीचें मन बसणें हा एक अविचार आहे असें वाटतें खरें, परंतु तसा सर्वथैव प्रकार नाहीं. आपलें जर एकाद्या स्त्रीवर असें एकाएकीं प्रेम बसलें, तर मागील जन्मीं तिच्यावर असलेलें आपलें प्रेम ह्या जन्मीं उदयास आलें असें समजावें. "ज्या स्त्रीचा व आपला पूर्वजन्मींचा लागाबांधा असेल, अशा स्त्रीस पाहिलें कीं तिजवर आपलें प्रेम बसतें, व पुढेंहि आपण आपलें मन तसेंच तिजवर ठेविलें, तर तें प्रेम कधींहि विटत नाहीं."[1]

कित्येक प्रसंगीं प्रेमाची उत्पत्ति फारच हळूहळू होते व तें संपादन होण्यास आपल्या प्रिय माणसांशीं बहुत दिवस एकनिष्ठेनें वागावें लागतें.

आजपर्यंत एकमेकांवर प्रेम जडून नंतर स्त्रीपुरुषांचीं बहुत लग्नें झालीं आहेत, परंतु त्यांपैकीं बहुतेक जोडप्यांस अंतीं पश्चात्तापच झाला आहे असें मान्टेन् म्हणत असे. डॉक्टर जॉनूसन्हि म्हणे कीं, स्त्रीपुरुषांचीं लग्नें एकादा सरकारी अधिकारी जुळवील तर बहुतेकांस सुख होईल. परंतु हे दोघे गृहस्थ या कामीं अभिप्राय देण्यास लायक होते असें वाटत नाहीं. "जुलुमानें कोणी कोणावर प्रेम करीत नाहीं. तें मनुष्याचे अंतःकरणांत स्वभावतःच निपजलें पाहिजे."[2]

१ बर्न्स  २ म्यालोरी

स्त्रीपुरुषें जरी एकमेकांपासून दूर असलीं अगर त्यांच्यामध्यें महासागर आड असला, तरी प्रेम त्यास जुमानीत नाहीं. सेस्टास व आबिडास ह्या दोन शहरांमध्यें पूर्वीं समुद्र होता. परंतु प्रेमानें आपल्या एका बाणानें त्यांस जोडिलें अशी एक दंतकथा आहे.

एक प्रेम असलें, म्हणजे स्त्रीपुरुषें कोठेंहि असलीं तरी तीं सुख पावतात.

( श्लोक )

“ प्रिया जवळि एकही असतां सुंदरी कोमला,
बसा ! मग काननीं त्यजुन वास होतो भला;
तिथें वसुन या मना विसर मानवांचा पडो,
सुमन वसुनि तिच्या, न परकेर ते आवडो. ”

—बायरन्

प्रेमामुळें कित्येकांची उत्तररामचरित्रांत वर्णन केल्याप्रमाणें प्रसंगीं तृप्ति झालीच पाहिजे.

( पद )

आठवतें तुज काय ? सीते ! आठवतें । धृ० ।
त्याच गिरीवर आपण होतों पहात निर्झर शोभा, सीते ! । धृ० ।
त्या श्रीगोदावरीचें केलें स्नानें पानें सेवन, सीते ! । धृ० ।
गोदावरीच्या तीरीं आपण केले फार विहार, सीते ! । धृ० ।

—उत्तररामचरित्र

प्रेमानें सर्व ठिकाणीं सर्व काळीं, मनुष्यमात्रास अगदीं आपल्या आधीन करून टाकिलें आहे. “ ज्या वेळेस देशांत दंगाधोपा नसतो, त्या वेळीं लोक प्रेमाचें वैभव गातात व युद्धप्रसंगीं त्याकरितां शिर हातावर घेऊन रणांत शिरतात. प्रेम खेड्यांत आहे तसेंच राजदरबारींहि आहे.

१ स्कॉट

इहलोकीं मनुष्यमात्रांत आहे. व स्वर्गांतील संतांत आहे. कारण, प्रेम हाच स्वर्ग आणि स्वर्ग हेंच प्रेम."

आपल्या धर्मांत, तसेंच आशिया खंडांतील पूर्वप्रदेशीं राहणाऱ्या लोकांचे धर्मांत व विचारांत, स्त्रीप्रेमाचा निषेध केलेला आढळतो; परंतु आपल्या काव्यांत व त्यांच्या रूढ म्हणींत स्त्रियांस इतकें गौणत्व दिलेलें दिसत नाहीं. भर्तृहरि म्हणतो कीं,—

( श्लोक )

" सति प्रदीपे सत्यग्नौ, सत्सु तारारवीन्दुषु,
विना मे मृगशावाक्ष्या तमोभूतमिदं जगत्."

**भावार्थः**—दीप, अग्नि, व सूर्यचंद्रनक्षत्रादि, हे सर्व लोकांस प्रकाश देणारे असतां, बालमृगलोचनेवांचून हें सर्व जगत् मला अंधकाररूप दिसतें.

तुर्क लोकांत अशी म्हण आहे कीं, सर्व स्त्रिया सर्व गुणसंपन्न असतात, परंतु जिचें आपल्यावर प्रेम बसलें आहे तिचे गुण तर अवर्णनीय असतात.

" स्त्री आपल्या एका केसानें जितकें वजन ओढिते, तितकें दोन बैलांच्या जोडीसहि ओढवत नाहीं " ही पोल लोकांतील म्हण एका फ्रेंच स्त्रीनें अबदुल कादर ह्या सरदारास म्हणून दाखविली. तेव्हां तो म्हणाला कीं, " ती स्वतः काळासारखी प्रबळ असतां, तिला केस तरी कशास पाहिजे ! " होमर कवीनें काळाविषयीं जें म्हटलें आहे, तेंच स्त्रियांसहि लागू पडतें:—

( आर्या )

" पद कोमल काळाचे ! ठेवी नच तो स्वपावलें धरणी,
मनुजशिरीं परि ठेवुनि चाले, ऐशी कृतांत करि करणी."

परंतु स्त्री ही कोणी काळासारखी प्रबळ अथवा सत्ताधीश आहे असें न मानितां, ती आपल्यास सुख देणारी देवता व गृहानंदाचें साधन आहे असें मानून, स्त्रीप्रेमाचा विचार करणें प्रशस्त वाटतें. कारण, प्रेम हा एक गूढ ओढा असून कोणास न कळत अंतःकरणांत निपजतो व—

( श्लोकार्ध )

" बांधी स्नेह गुंफुनि मंजुमन मना, अलग अनर्गला;
देही नेत्रांनि आत्मा न तुटत कधि तो गगनांबुध त्यांसी."

— स्कॉट

" मित्रासें आपला आनंद कळविला असतां तो वाढतो, व त्यास आपलें दुःख निवेदन केलें तर तें कमी होतें." हीच गोष्ट आपल्या स्त्रीसहि लागू पडते. ज्या स्त्रीवर आपलें प्रेम आहे, ती—

( श्लोक )

" प्रिया जवळ आलिया सकल विश्व भासे नवें;
फुलें वनलता मही नटति ही नव्या वैभवें;
क्षणार्धिं सभोंवतीं बदल वाटतो मानसा,
सखा सजणि भेटतां घडत तो कळेना कसा."

— ट्रेंच

संसारांत मनुष्यानें सुविचारानें व प्रेमानें वागलें पाहिजे. सुविचाराशिवाय नुसत्या प्रेमानें, अथवा प्रेमाशिवाय नुसत्या विचारानें, मनुष्याचे ठिकाणीं सद्गुणांची उत्पत्ति होत नाहीं. " प्रेम आपल्या हृदयांत उत्तम इच्छांचें बीज पेरितें." कोणास देवाजवळ कांहीं मागणें झाल्यास प्रेमच मागून घ्यावें. कारण, प्रेम हें कृपाळू तसेंच आपल्याकरितां बहुत कष्ट सोसणारें आहे. तें लीन

१ बेकन   २ मिल्यानिपिडिज

असून आपण दिलेलें दुःख मनांत ठेवीत नाहीं व इतकें सहिष्णु व उदार असून मृत्युपेक्षांहि बलवत्तर आहे."

कवींनीं प्रेमप्रशंसा फारशी केली नाहीं, असें प्राचीन काळच्या एका ग्रंथकाराचें म्हणणें आहे; परंतु आतां तसें म्हणतां येणार नाहीं. उलट, प्रेमाविषयीं उल्लेख करितांना अर्वाचीन कवींची प्रासादिक वाणी फारच प्रसन्न झालेली आढळते. उदाहरणार्थ, मिल्टननें केलेली प्रेमप्रशंसा किती मनोहर व सुंदर आहे पहा.

( ओव्या )

" एक तव प्रेमसंगतीं, दिनऋतु पालटतां,
परी विसरून जाय मती, सर्व ही प्रिय म्हणोनी
अरुणोदयाचे वारे, प्रभातीं पक्षी गोजिरे,
तरुशाखीं गाती सुस्वरें; हे सर्वाचि प्रिय.
जई प्रथम भूमिवरी, दंहिवरें उजळल्या तरुवरी,
पुष्पीं फळीं सोहरी, बालसूर्य प्रवेशे;
तेसेंचि पर्जन्यामागुतीं, सुवासें भरली अती,
फलद मनोहर ही क्षिती, मज प्रिय असे का.
नंतरें होत संध्याकाळ, तोय देई जो अमोल,
शांत रजनी बुलबुल, अखंड गाणें रंजवी;
वरि हा रमणीय शशी, तेसा तेजःपुंज आकाशी,
दिव्य या रत्नराशी, ही सारखीच प्रिय."

परंतु तीच स्त्री जवळ नसल्यास, ह्याच्या उलट परिणाम होतोः—

" परि अरुणोदयांचे वारे, प्रभातीं पक्षी गोजिरे
प्रसन्न पृथ्वी भानुकरें, तुजविण नच प्रिय.
तसी दंवें उजळलीं, फलें पुष्पें तरु वल्ली,
वृष्टिमागुती दाटली, परिमळें वसुंधरा;

सुखद तो संध्याकाळ, शांत रजनी बुलबुल,
तशानि रत्नराशी उज्वल, तुजविण नच गोड त्या."

उत्तम स्त्री मिळून तिच्या सहवासानें संसार अत्यंत सुखावह होण्याचा संभव नाहीं असें कोणींहि मनांत आणूं नये. सुदैवेंकरून आपल्या रुचि भिन्न असल्यामुळें आपणास पाहिजे तशी स्त्री मिळण्यास फारशी हरकत पडणार नाहीं. जेथें आईबाप आपल्या मुलांचीं लग्नें करितात तेथें देखील उत्तम स्त्री प्राप्त होण्याचा संभव आहे. कारण, आपण जर आपल्या स्त्रीवर प्रेम केलें, तर ती निःसंशय आपल्यावर उलट प्रेम करील. कारण, प्रेमानें प्रेम वाढतें; म्हणून शेक्सपिअर म्हणतो त्याप्रमाणें शेंकडो लोकांसहि म्हणतां येईल:—

( श्लोक )

" सखी माझी झाली; पदरि पडलें रत्न निरलें;
जगी झालों आजी अमितधनसंपन्न सकळें;
नको मातें आतां उदधि जरि रत्नेंहि भरले,
सुधाकल्लोळांनी, कनकगिरिनीं जे उजळले."

एकमेकांवर प्रेम करणारीं वधूवरें हीं अविचारी नसतात, तरी त्यांचे सुद्धां प्रेमाचा कधीं कधीं अल्प कारणानें बेरंग होतो.

( श्लोक )

" जें प्रेम नीट टिकलें क्षितिच्या कपारीं,
दुःखींहि फार गुतलें दृढ मोहपाशीं,
जें क्षोभल्या भवजलीं स्थिर राहिलेंसे,
त्या अल्प कारण कसें विटण्या पुरेसें ! "

—मूर

म्हणून आपण आपल्या प्रियेचे प्रेमास धक्का बसेल

अशी अल्प दृष्टीची कृति करूं नये. कारण, ही अल्प कृति " वीणेमधे पडलेल्या भेगसारखी आहे. ही भेग उत्तरोत्तर मोठी होऊन वीणा बेसूर होते, व शेवटी तर तींतून ध्वनिच निघत नाही. " प्रेम हें अत्यंत नाजूक आहे. तें कलहानें दुखावतें. कोणतेंहि तंतुवाद्य दांडगाईनें वापरलें तर तें टिकत नाही; तीच प्रेमाची गति होय. परंतु " ज्यांस नांव देतां येत नाही व ज्या लक्षांतहि रहात नाहीत अशा अल्प कृतींनी " त्याच प्रेमाचें संगोपन केलें, तर हा संसार अत्यंत सुखावह होईल यांत संशय नाही.

ज्या स्त्रियेबरोबर आपला विवाह झाला आहे, तिजविषयीं असें मानावें की.—

( श्लोक )

" अर्धं भार्या मनुष्यस्य, भार्या श्रेष्ठतमः सखा;
भार्या मूलं त्रिवर्गस्य, भार्या मूलं तरिष्यतः "

— **महाभारत**

**भावार्थः**--भार्या ही पुरुषाचा अर्धा देह व सर्वांत श्रेष्ठ असा मित्र होय; व ती धर्म, अर्थ आणि काम यांचें मूळ, आणि संसारसमुद्र तरून जाण्याचें साधन होय.

अथवा —

( ओव्या )

" तिन्ही अवस्थांमाजी साचें, झालें अद्वैत सुखदुःखाचें,
एक रूप उभयतांचें, जें स्नेहाशीं अनुरूप;
जें हृदया विश्रांतिस्थान, जेथें प्रेमरसाचें मान,
कधींही होईना न्यून, वयोभेद झाला तरी;
मध्यें आलिया आवरण, कालेंकरून त्याचें निवारण
होतां, पहिल्यापरी पूर्ण, स्नेहसत्वीं जें राहिलें. "

**—उत्तररामचरित**

१ टेनिसन्  २ वर्डस्वर्थ

खऱ्या प्रेमानें मनुष्याचें मन उत्कर्ष पावतें, म्हणून एका कवीनें म्हटलें आहे कीं, "मनांत प्रेमोत्पत्ति न होणें, यापेक्षां प्रेम करून अपयश आलेलें बरें."

"हिचा सहवास झाला असतां उदार शिक्षणच मिळतें" अशी स्टीलनें लेडी एलिजाबेथ हेस्टिंग हिची एके ठिकाणीं स्तुति केली आहे. अशी स्त्रियांची स्तुति कोणीं केलेली आढळत नाहीं. परंतु प्रत्येक स्त्रीनें असें मनांत आणावें कीं, जसजसें आपलें मन सुधारेल, तसतसें आपल्या व आपल्या भ्रताराच्या सुखसाधनांचें आपण एक भांडारच निर्माण करीत आहों.

खरें प्रेम कालक्रमानें इतकें वाढतें कीं, शेवटीं स्त्रीपुरुष वरून जरी दोन मूर्ति दिसल्या, तरी अंतर्यामीं त्या एकच असतात व त्यांचा वियोग कधींहि होत नाहीं.

इतर मनोविकारांसारखें प्रेम प्राणाबरोबर नष्ट होत नाहीं.

( श्लोक )

" मरण मनुजा येतां जाती विकार दुजे लया;
सकल असती मिथ्या, स्वर्गी निवास नसे तया,
जनन जगतीं त्यातें, तेथ विनाशहि योजिला;
अमर परि ही प्रेमज्वाला, निरंतर उजवळा !"
" स्वर्गांतुनी प्रणय भूमिवरी उदेला,
जाई पुनः परतुनी अपुल्या स्थळाला;
एथें कधीं कधिं तया बहु कष्ट होती,
तेंसें वृथा कुटिल दुर्जन गांजिताती."
" या लोकीं जरि भागलें दुखवलें कष्टें बहु प्रेम तें,
दुःखें निर्मल होउनी स्थिरसुखा स्वर्गी तरी जोडितें;

१ टेनिसन्

प्रेमें भूवरि बीज जें निवपिलें, क्लेशें अती तापुनी,
भोगी तें गगनी उदंड सुफलें त्याचीं, स्वयें तोपुनी. "

" बालासाठीं जागृत माता दिनरातीं
ढाळी अश्रु, बाळगि चिंता, भय चित्तीं;
प्रेमानंदीं ती विसरे ह्या पांगाळा
जेव्हां अंबा स्वर्गिं विलोकी सुत बाळा. "

—सोदे

आपल्या स्त्रियेच्या, मित्रांच्या व मुलांच्या प्रेमानें आपल्या वृद्धापकाळीं आपणांस सुख व समाधान होऊन, स्त्रीप्रेमानें भूतकाळीं भोगिलेल्या सुखाची आठवण होते, व मुलांच्या प्रेमानें भावी आयुष्यक्रम सुखावह होतो. कारण,

" आत्मा वै पुत्रनामासि "

असें आश्वलायनानें जें म्हटलें आहे, तें आपल्या मुलांबाळांसंबंधानें सर्वथैव सत्य होय.

" या सृष्टीत जें जें म्हणून मंगल, शुद्ध व रम्य असेल, त्या त्यावर प्रेम ठेवून, त्याचे ठिकाणीं प्रकट होणारें सौंदर्य, चित्रकारानें आपल्या प्रासादिक बुद्धिबलानें व्यक्त करून दाखविणें व पहाणाराचें मन त्याजकडे आकर्षण करून घेणें, या कृतीचें नांव कला होय. "

—रस्किन्

# प्रकरण १५

## कला

हिंदुस्थानांत फार प्राचीन काळीं कला किती उदयास आली होती, हें समजण्यास मार्ग नाहीं. मूर्तिपूजेची एथे रूढी पडल्यापासून चित्रकलेकडे हिंदु लोकांचें लक्ष लागलें असावें असें दिसतें. हरिणाचे शिंगावर अथवा हाडावर जनावरांचीं ओबडधोबड कोरलेलीं चित्रें जर्मनी, इंग्लंद व फ्रान्स या देशांतील गुहांतून सांपडतात; त्यांवरून युरोपांत प्राचीन काळीं चित्रकला लोकांस कांहींशी अवगत होती असें सिद्ध होतें. पुढेंमागें आणखी शोध लागून त्या काळच्या चित्रकलेच्या स्वरूपाची आपणांस याहूनहि अधिक माहिती मिळण्याचा संभव आहे.

ख्रिस्ती शकाचे पूर्वीं दोन हजार वर्षांचा काळ घेतला, तर त्या काळीं असिरिया व मिसर देशांत कलेचा बराच उदय झाला होता, असें त्या देशांतील थडग्यांवर व देवळांतून कोरलेल्या अथवा काढिलेल्या चित्रांवरून कळतें. ह्या चित्रांत कलेच्या दृष्टीनें बहुत दोष आहेत, परंतु हल्लीं उपलब्ध असलेल्या चित्रांवरून त्या वेळच्या लोकांच्या रीतिरिवाजांचें व इतिहासाचें चांगलें ज्ञान होतें. ह्या चित्रांत जीं युद्धांचीं चित्रें आहेत, त्यांत राजांच्या मूर्ति शिपायांपेक्षां मोठ्या काढिल्या आहेत. खरोखर राजे आपल्या शिपायांपेक्षां आकृतीनें अधिक धिप्पाड असतात असा नियम नाहीं. परंतु ह्या चित्रांवरून, त्या काळीं सर्व युद्धाचा भार राजावर पडत असे, इतकेंच नाहीं, तर

एथे चित्रकलेचाच मुख्यत्वें उल्लेख आहे.

त्यास इतर शिपायांपेक्षां अधिक पराक्रम करावा लागत असे. असें सिद्ध होतें. ह्या चित्रांत राजे कोणते, सरदार कोणते, कोणत्या पक्षाचा जय झाला. जखमा लागून पडलेल्या शिपायांस यातना कशा होत. शत्रु कसा पळून गेला, वगैरे गोष्टी पहाण्याबरोबर लक्षांत येतात. युद्धांच्या अर्वाचीन चित्रांत त्यांची कथा इतकी व्यक्त होत नाहीं. ज्यास चित्रें पहाण्याची संवय नाहीं, त्यास तर अर्वाचीन युद्धचित्रांत जिकडे तिकडे रंग व धूरच दृष्टीस पडतो. हीं प्राचीन काळचीं चित्रें अर्वाचीन चित्रांसारखीं जरी सुरेख नाहींत. तरी त्यांचें महत्त्व व शोभा कांहीं कमी नाहीं.

ग्रीस देशांत चित्रकला इतकी पूर्णावस्था पावली होती कीं, तशी अद्यापि कोठेंहि आढळून येत नाहीं. शिवाय त्या कलेची ग्रीक लोकांत जशी चहा होती, तशी कोणत्याहि लोकांत नाहीं व नव्हती. ज्या वेळेस डेमेट्रिअस यानें होडस शहरावर हल्ला केला. त्या वेळेस त्या शहरांत प्रोटोजनीज हा चितारी एक तसबीर काढीत होता. कदाचित् आपल्या हातून त्या चित्राचा नाश होईल, म्हणून डेमेट्रिअसनें तें शहर घेण्याचें सोडून देऊन एका चित्राचे रक्षणापुढें जयप्राप्ति अगदीं हातीं आली असतांहि ती तुच्छ मानिली. या शहराबाहेर एक बाग होता, व त्याचे आजूबाजूस शत्रूंनीं आपला तळ दिला होता. त्याच बागेंत प्रोटोजनीज तसबीर काढीत असे. ती तसबीर काढण्याचे नादांत तो इतका गर्क होऊन जाई कीं, शत्रुसैन्याच्या गलबल्यानें त्याचें चित्त व्यग्र होत नसे. एके दिवशीं डेमेट्रिअसनें त्यास आपल्या पुढें आणवून पुसलें

की. " तूं प्रत्यक्ष आपल्या शत्रूमध्यें वसून काम करितो-स. हें धाडस तुझ्यानें होतें तरी कसें?" प्रोटाजनीजनें उत्तर केलें की. " तुम्ही इंडियन लोकांशीं युद्ध मांडलें आहे. कलेशीं मांडिलें नाहीं असें मी समजतों."

ग्रीस देशास विपत्काल येतांच तेथील कलेचाहि ऱ्हास झाला. परंतु १३ वे शतकांत सिमांव्यूनें तिचा उद्धार केला. व तेव्हांपासून तिचा उत्तरोत्तर उत्कर्षच होत आहे.

कला हें सुखप्राप्तीचें उत्तम व शुद्ध साधन आहे. तिच्या योगानें. दृष्टीच्या मार्गानें मन व मनाच्या मार्गानें दृष्टि संस्कृत होते. जसें सूर्याच्या प्रकाशानें फुलांस रंग चढून तीं रम्य होतात. तसें कलेनेंहि आपलें आयुष्य रंगून रम्य होतें.

" ज्यांत चित्रकाराचा हात, मन व बुद्धि हीं अगदीं तल्लीन होऊन जातात. ती खरी कला होय. ती फावल्या वेळीं किंवा दुसरा एखादा अधिक उपयुक्त व्यवसाय नसेल त्या वेळीं संपादन करीन म्हटलें. तर संपादन होत नाहीं." ती बहुत अभ्यासानें व श्रमानें प्राप्त होते; तथापि जे जे म्हणून तसा अभ्यास व श्रम करतील ते ते सर्वच कारागीर बनतील असा नियम नाहीं.

कलेचा मुख्य हेतु मनोरंजन होय असें म्हणतात, परंतु अशा दृष्टीनें पाहिलें तर. एखाद्या पुस्तकालयाचाहि मुख्य हेतु रंजन व शोभा आहे असें म्हणतां येईल. तेव्हां कलेचा प्रधानहेतु मनोरंजन नव्हे; मनाचा उत्कर्ष करणें हा तिचा मुख्य हेतु होय.

कलेशीं मनुष्याचा संबंध असल्यामुळें ती सृष्टीहूनहि

१ रस्किन्

प्रसंगविशेषीं थोर आहे असें म्हटलें असतां चालेल. "रानटी व सुधारलेला अशीं दोन मनुष्यें घेऊन त्यांची तुलना केली, तर सुधारलेला मनुष्य रानटी मनुष्यापेक्षां अधिक सुंदर दिसतो." कारण "मनुष्याचा आत्मा जगताहूनहि थोर असल्यामुळें, सृष्टींत उपलब्ध होणारी भव्यता, चांगुलपणा व वैचित्र्य याहून विशेष मोठेपणाची, पूर्ण चांगुलपणाची व पूर्ण वैचित्र्याची तो अपेक्षा करीत असतो." व हेच पूर्ण गुण कलेंत उत्पन्न करण्याचा मनुष्य प्रयत्न करीत असतो.

कवि अशी एक कथा सांगतात कीं,-एकदां, प्रोमिथिअस ह्या मूर्तिकारानें मिनरव्हा देवतेचा एक सुंदर पुतळा तयार केला. तो पाहून ती देवता इतकी सुप्रसन्न झाली कीं, त्या पुतळ्यास पूर्णता येण्यास जें पाहिजे असेल तें मी स्वर्गाहून तुला आणून देतें असें ती त्यास म्हणाली. तेव्हां तिला प्रोमिथिअसनें विनंति केली कीं मलाच स्वर्गीं घेऊन चल, म्हणजे जें मला पाहिजे तें पाहून आणितां येईल. ही त्याची विनंति त्या देवतेनें मान्य केली. स्वर्गीं गेल्यावर मूर्तिकार पहातो तों तेथे सर्व गोष्टी अग्नीनें सचेतन झालेल्या दिसल्या. तेव्हां त्यानें एक विस्तवाची ठिणगी पृथ्वीवर आणून, तयार केलेला पुतळा सजीव केला. या गोष्टीचा भावार्थ असा कीं, प्रतिसृष्टीचशी काय परंतु सृष्टीहूनही अधिक सुंदर रचना करण्याकडे मनुष्याचे मनाची धांव असते. म्हणून कला ही सृष्टीहून थोर असें म्हटलें तें यथार्थ होय.

सर जेशुआ रेनाल्ड्स यानें असें म्हणणें आहे कीं,

१ प्लेटो २ बेकन

सृष्टींतील विषयांचें जो चित्रकार यथातथ्य मनन करून अनुकरण करितो. त्यास कलेची खरी व पूर्ण कल्पना होते. परंतु सृष्टिसौंदर्याचें हुबेहुब अनुकरण करणें हा कलेचा हेतु नसून तें एक तिचें साधन आहे. खऱ्या फळांसारखीं फळें करून चित्रकारानें पक्ष्यास व मनुष्यांस फसविलें म्हणजे. कलेचा जो मोठा हेतु तो साधला असें मुळींच नाहीं. एखाद्या चित्रकारानें सुंदर देखावा पाहून तो आपल्या कलमानें हुबेहूब उतरिला म्हणजे त्याचें कर्तव्य झालें नाहीं. त्यानें सृष्टीचें अनुकरण केलें पाहिजे. तसेंच जी सृष्टींत नाहीं ती नवीन रचना आपल्या बुद्धिबळानें केली पाहिजे. मोठमोठे जे चित्रकार होऊन गेले, त्यांचें नुसत्या सृष्टीच्या अनुकरणानें समाधान झालें नाहीं. त्यांनीं आपल्या कल्पनाशक्तीनें नवीन रचनाहि केली आहे. टर्नर हा चित्रकार जेव्हां एखादा देखावा काढी. तेव्हां तो मूळांत असलेल्या पर्वतांची जागा बदली अगर ते आपल्या चित्रांतून अजीबात वगळी. गाइडो हा स्त्रियांचीं उत्तम चित्रें कोणत्या नमुन्यावरून काढितो, हें पहाण्याची एका सरदारास इच्छा झाली. तेव्हां चित्रकारानें रंग कालविणाऱ्या ओबडधोबड अशा आपल्या नोकरास पुढें बसविलें व मॅगडलीनचें उत्तम चित्र काढून त्या सरदारास म्हटलें. ' अहो ! नमुना कोणताहि असो. उत्तम सौंदर्याची कल्पना आम्हां चित्रकारांचे मनांत असली म्हणजे आमचें काम झालें. '

त्याच चित्रकारानें रोम शहरांतील एका देवालयांत देवदूतांचीं चित्रें काढिली आहेत. ह्या चित्रांसंबंधानें तो असें म्हणे कीं, ' मला जर पंख असते तर, मी उडून

स्वर्गास गेलों असतां व तेथें देवदूतांचें सौंदर्य पाहिलें
असतें. परंतु ही गोष्ट अशक्य असल्यामुळें व पृथ्वी
वरहि त्या सौंदर्याची कल्पना होण्याचें कांहीं साधन न
सल्यामुळें, मी आपल्या मनानें त्यांच्या सौंदर्याची कल्प
ना केली व त्याप्रमाणें कुंचल्यांत देवदूतांची चित्रें काढि
लीं.' सारांश. चित्रकारानें आपल्या कृतींत नवीन रचना
न करितां नुसतें सृष्टीचें अनुकरण केलें. तर त्याच्या कले
चा हेतु सिद्ध होत नाहीं; व सृष्टींत जें सौंदर्य आढळतें
व ज्या पूर्ण सौंदर्याची कल्पना चित्रकाराचे मनांत असते
परंतु तें सृष्टींत सांपडत नाहीं. अशा दोन्ही सौंदर्यांचा स
मागम झाल्याशिवाय कलेचा हेतु सफल होत नाहीं अथ
वा एकादी उत्तम कृतिहि निर्माण करितां येत नाहीं.

कोणी कदाचित म्हणतील कीं, सृष्टींत जें सौंदर्य आ
ढळतें त्यानेंच समाधान करून न घेतां, त्यावरहि ताण
करण्याची हाव धरणें ही कृति " शुद्ध सोन्यास मुलामा
चढविणें, गुलाबाच्या सुवास वाढविणें. इंद्रधनुष्यास रंग दे
णें व दिव्यानें आकाशांतील नक्षत्रांस उजळणें यासारखी
हास्यास्पद होय." परंतु जें कांहीं चकाकतें तें सर्व सोनें
असत नाहीं. व सर्व फुलांस गुलाबासारखाच सुवास येत
नाहीं. तेव्हां दुसऱ्या अनेक फुलांचा सुवास गुलाबाचे फु
लाचे ठिकाणीं कल्पिण्यास मनास अवसर मिळतो. शि
वाय, जो असा आक्षेप घेईल, त्यानें कलेचा जो मोठा
हेतु तो पूर्णपणें मनांत आणिला आहे असें म्हणतां येणा
र नाहीं. कलेचा प्रधान हेतु मनुष्याचे मनाचा उत्कर्ष व
समाधान होय. आणि सृष्टि पाहिली तर तिच्या सौंदर्या-

१ शेक्सपिअर

स सीमा आहे. तर्हां ज्या मनाच्या भावेस व उत्कर्षास मर्यादा नाहीं, त्याचें सृष्टींत दिसतें तेवढ्यानेंच समाधान कसें होणार? " सृष्टींत ज्या मनोहर व सुंदर वस्तु आहेत. त्या एका अनंत परमेश्वराचीं निरनिराळीं रूपें आहेत. सद्गुण, सत्य व सौंदर्य यांवर आपलें मन लुब्ध होतें. तें केवळ त्यांच्या गुणांमुळेंच होत नाहीं, परंतु त्यांत प्रकट होणाऱ्या अनंतेवर आपलें प्रेम असल्यामुळें त्या गोष्टींनीं चित्त वेधून जातें. मनाचें पूर्ण समाधान करणारी ती एक अनंतता होय. तर्हां, तिच्या मर्यादित रूपांनीं म्हणजे सृष्टींत उपलब्ध होणाऱ्या सुंदर व रम्य वस्तूंनीं, मनाचें समाधान नेहमीं होणार नाहीं."

चित्रें, पुतळे व इमारती बनविण्याच्या कलांच्या गुणदोषांविषयीं बरेच लेख लिहिण्यांत आले आहेत. परंतु त्या कलांचें परस्परमहत्त्व व गुण यांचा येथें विस्तृत विचार करण्याचें प्रयोजन नाहीं.

एकादी ताजमहालासारखी सुंदर इमारत पाहिली म्हणजे, मनास तसता अनेनात आनंद होतो. इतकेंच नाहीं, तर ही कांहीं अलौकिक अथवा दैविक कृति आहे असा भास होतो. एक उत्तम देवालय पाहून एकानें म्हटलें आहे कीं, हें देवालय म्हणजे " धोंड्याच्या रूपानें प्रकट झालेली सुंदर कल्पना होय. " हेंच म्हणणें ताजमहालास किती शोभतें! तो संगमरवरी पाषाणरूपानें प्रकट झालेली शिल्पकारांची सुंदर कल्पना नव्हे काय?

कवि हे आपल्या शब्दांनीं चित्रें काढितात; चित्रकार आपल्या कृतींनें जगाशीं बोलतात. कवींस जी नाहीं, ती

१ कसन्. २ मेडम स्टील

चित्रकारांस अनुकूलता आहे. ती ही कीं, एकादें चित्र अथवा पुतळा पाहून जशी मनांत त्या पदार्थाची स्पष्ट कल्पना उतरते, तशी कवींच्या सूक्ष्म व विस्तारपूर्वक वर्णनानेंहि उतरत नाहीं. शिवाय, जे लोक सुधारलेले आहेत, त्यांच्या भाषा जरी भिन्न असल्या, तरी एका देशांतील कारागिरानें तयार केलेलें चित्र पाहून दुसऱ्या देशांतील लोक खुष होतात. गद्यपद्यांत 'खडक' म्हणजे एकंदर खडक जातीचाच फक्त उल्लेख होतो; चित्रांत तो खडक कोणत्या उपजातीचा आहे, तें दाखविल्याशिवाय चालत नाहीं.

देशाच्या नफानुकमानीच्या दृष्टीनें चित्रकलेचें फारच महत्त्व आहे. सर फ्रेडरिक लेटन यांनीं आपल्या एका भाषणांत नुकतेंच असें बोलून दाखविलें कीं, "हल्लीं व्यापारधंद्यांस जी निकृष्टावस्था येत चालली आहे, तिच्या संबंधानें चित्रकलेचें तर फार महत्त्व वाटूं लागलें पाहिजे. इतर देशांची जी इंग्लंदाशीं व्यापारधंद्यांत चढाओढ सुरू आहे, व जिच्या योगानें इंग्लंदांतील कित्येक धंदे रसातळास जाण्याचा संभव आहे, ती चढाओढ कशांत आहे हें पाहूं गेलें तर असें दृष्टीस पडेल कीं, इंग्लंदाशीं स्पर्धा करणाऱ्या प्रत्येक देशांतील कारागीर, इंग्लंद देशांत जो माल उत्पन्न होतो त्याहून अधिक सुंदर सुबक व मनोहर असा तयार करण्याचा प्रयत्न करीत आहेत."

कला आणि शास्त्र ह्या दोन बहिणी आहेत, अथवा हीं बहीणभावंडें आहेत असें म्हटलें असतां चालेल. कारण, कलेचें कर्तव्य स्त्रियांच्या कर्तव्यासारखें आहे. स्त्रिया जशा संसारांतील दगदगीचीं व श्रमाचीं कामें करीत

नाहींत परंतु नाजूक गृहकृत्यें करून घरास शोभा आणि तात. तद्वत् कलेच्या साह्यानें हें जगत् मनोहर होतें.

शास्त्रासारखीच कलाहि उत्तरोत्तर अधिक उदयास येईल. एका चित्रकाराचें असें म्हणणें आहे कीं. पुढें चित्रकारांचे हातून अशीं उत्तम चित्रें निर्माण होतील कीं त्यांपुढें हल्लीं उत्तम गणिलेलीं चित्रें म्हणजे पोरांचा खेळ आहे असें वाटूं लागेल. अशीं उत्तम चित्रें पुढें उत्पन्न झालीं, तर त्यांची योग्यता व महत्त्व जाणण्यासारखी मनुष्याची दृष्टि व मन हींहि उत्कर्ष पावतील असें मानण्यास कांहीं हरकत दिसत नाहीं.

अलीकडे चित्रकलेंत भूप्रदेशाच्या अथवा वनशोभेच्या चित्रांची एक शाखा उत्पन्न झाली आहे. व तिची मानमान्यताहि लोकांत वाढली आहे. पूर्वींच्या चित्रकारांचें ह्या विषयाकडे एकंदरीनें दुर्लक्षच होतें.

कलेच्या योगानें मनुष्यास ज्ञानचक्षु येतात. या जगांत विचार करणारा एक पुरुष उत्पन्न झाला तर त्याच्या ज्ञानाच्या साह्यानें शेंकडों लोकांस बोलतां येतें; परंतु ज्यास ज्ञानचक्षु मिळून सर्व कांहीं दिसतें, असा एक महात्मा निर्माण झाला तर त्याच्या योगानें हजारों लोक विचार करूं लागतात. या जगताचें रहस्य ज्ञानचक्षूंनीं पहातां आलें म्हणजे त्यांतच काव्य, धर्म वगैरे सर्व कांहीं संपादन झालें. कला ही दोन गोष्टींनीं चांगुलपणा पावली आहे. त्यांपैकीं, या जगतांत ज्या बऱ्यावाईट गोष्टी आहेत त्यांचें खरें मर्म ताडून त्यांचा आद्यंत स्पष्टपणें समजणें ही एक गोष्ट, व त्या पहाणारास सुंदर दिसून त्यांचें समाधान होईल अशी त्यांची व्यवस्था लाव-

णें, ही दुसरी. उत्तम चित्रकार हेंच कौशल्य आपल्या कलेंत दाखवीत असतो. तो सृष्टींतील चमत्कार व बऱ्या-वाईट गोष्टी पाहून त्यांचें खरें स्वरूप पहिल्यांदा मनांत आणितो. व नंतर आपल्या चित्रांत त्यांची अशी संगति लावितो कीं तें पाहिल्यापासून पहाणाराचें मन संतोषित होऊन त्यास ज्ञानप्राप्तीहि होते. तेव्हां, उत्तम उदयास पावलेली चित्रकला ही एकाद्या सज्जन पुरुषाच्या सुखद आयुष्यक्रमाचें एक रूपच आहे असें म्हटलें असतां चालेल. मूर्खाचा जन्म दुःखांत जातो; कारण, त्यास सृष्टींतील चमत्कारांचें खरें रहस्य न कळतां तो जगाशीं व्यवहार करितो. कोणत्याहि गोष्टीकडे धैर्यानें पहात नाहीं व त्यांचे भावी परिणामहि त्यास समजत नाहींत व दिसतहि नाहींत. म्हणून तो मूर्ख त्यांच्या एकंदर अनिवार्य ओघांत सांपडून चिरडून जातो. इकडे, ज्ञानी पुरुष जगतांतील सर्व गोष्टी व चमत्कार यांजकडे धैर्यानें पहातो, त्यांचें मर्म व आद्यंत यांचा सखोल विचारानें पत्ता लावितो. आणि नंतर न भांबावतां व शांतबुद्धीनें त्यांची अशी व्यवस्था लावितो कीं, आपल्या बुद्धीनें, निश्चयानें व ज्ञानानें चांगल्या गोष्टींपासून जितकें बरें होईल तितकें बरें करून घेण्याचे व वाईट गोष्टीच्या अनिष्ट परिणामाचा जितका प्रतिकार होईल तितका करण्याचे कामीं, या जगचालनेंत तो मोठ्या महत्त्वाचें काम करीत असतो.

असें चित्रकलेचें सर्वतोपरी महत्त्व असून, हिंदुस्थानासारख्या देशांत तिचा उदय होऊं नये हें आश्चर्य होय. ह्या देशांतील चित्रकला अगदीं बाल्यावस्थेंत आहे. मुसलमानांचा अंमल झाल्यापासून एथें उत्तम इमारती उभा-

रल्या गेल्या खऱ्या, तरी चित्रकलेचें पाऊल पुढें पडलें नाहीं. हल्लीं एथें उपलब्ध असणाऱ्या तसबिरा, देवांच्या मूर्ति व लेण्यांतून कोरलेलीं चित्रें किती ओबडधोबड आहेत, हें जो कोणी ते पुतळे, मूर्ति व चित्रें ह्यांस, 'इलस्ट्रेटेड लंडन न्यूज' अथवा 'ग्रॅफिक' यांमध्यें दर आठवडां येणारीं चित्रें व मुंबईसारख्या मोठ्या शहरांतून दृष्टीस पडणारे पाश्चात्य कारागिरांनीं केलेले पुतळे ह्यांशीं ताडून पाहील त्यास सहज कळेल.

ह्या देशांत चित्रकलेची जर अशी स्थिति आहे, तर मनाचें समाधान होण्याचीं जीं साधनें आहेत त्यांपैकीं एक साधन नाहींसें झाल्यासारखेंच आहे. तेव्हां सर्वसाधारण लोकांचें चित्रकलेवर किती प्रेम असेल, व चित्रदर्शनानें त्यांची दृष्टि किती संस्कृत व मनाचा किती उत्कर्ष होत असेल हें सांगावयास नको.

पूर्वींच्या व हल्लींच्या राजेरजवाड्यांचा चित्रकारांस आश्रय होता व आहे. अशा राजाश्रयास राहिलेल्या चित्रकारांपैकीं कांहीं प्रासादिक कारागिरांच्या कृति पहाण्यालायक आहेत हें कबूल केलें पाहिजे. तसेंच, कांहीं संस्कृत नाटकांतून नायक व नायिका यांस चित्रकलेचें ज्ञान होतें असें संविधानकांवरून दिसतें. परंतु एवढें खरें कीं, सर्वसाधारण लोकांस चित्रकलेचें महत्त्व पूर्वीं समजत होतें व हल्लीं समजत आहे, हें एकंदर चित्रकलेच्या बाल्यावस्थेवरून कोणीहि समंजस व विचारी मनुष्य कबूल करणार नाहीं. जर चित्रकलाच आपल्या लोकांस समजत नव्हती, तर तिचें महत्त्व, तिचे प्रत्यक्ष व परंपरेनें एकंदर शिक्षणांत होणारे परिणाम, व तिचे प्रधान व गौण

हेतु आपल्या लोकांस समजले नाहींत हें आश्चर्य नाहीं.

इंग्लंदांतील साधारण स्त्रीपुरुषांचें चित्रकलेवर किती प्रेम आहे, हें एथे व इतर ठिकाणीं जीं चित्रप्रदर्शनें होतात त्यांवरून सहज कळतें. तेंच आपल्या लोकांत त्या कलेचें जवळजवळ अज्ञानच आहे असें म्हणावें लागतें. ही अगदीं शोचनीय स्थिति आहे. तथापि, उत्तरोत्तर चित्रकलेचा उदय होऊन, चित्रकारांच्या कृतीनें नवीन नवीन सुंदर गोष्टी आपल्या दृष्टीस पडतील व ज्या संबंधानें आपण हल्लीं एकंदरीनें उदास आहों त्यापासून पुढील पिढ्यांच्या सुखोत्पत्तीचीं साधनें वाढतील असा ह्या देशास सुदिन येईल; व प्रत्येक राजमंदिरांत व धनाढ्य गृहस्थांचे वाड्यांतच काय, पण इंग्लंदासारखें प्रत्येक खेड्यांतील झोपडींत उत्तम चित्रकारांच्या कृतीस स्थळ मिळून लोकांस सुखाचें एक साधन प्राप्त होईल. अशी आशा करणें म्हणजे केवळ असंभवनीय गोष्टीची आशा धरण्यासारखें होणार नाहीं.

( श्लोक )

कान्पृच्छाम: ? सुरा: स्वर्गे, निवसामो वयं भुवि;
किंवा काव्यरस: स्वादु: किंवा स्वादीयसी सुधा !

—सुभाषित

**भावार्थः**—काय करावें ? आह्मी पडलों भूलोकीं राहणार व देव पडले स्वर्गलोकीं; नाहींतर त्यांना विचारिलें असतें, कीं काव्य-रस मधुर कीं अमृत मधुर ?

## प्रकरण १६

### काव्य

सिसिली बेटांत सारक्यूज एथें. ज्या वेळेस अथिनिअन लोकांचा मोठा पराभव होऊन त्यांच्या सर्व सैन्याची वाताहत झाली. त्या वेळीं त्या सैन्यांतील ज्या शिपायांस युरिपिडिज ह्या महा कवीचीं पद्यें म्हणतां येत होतीं. त्यांस शत्रूंनीं प्राणदान दिलें.

प्लूटार्क म्हणतो कीं. " युरिपिडिजच्या काव्यामुळें त्या सैन्यांतील कांहीं योद्धयांचें प्राणरक्षण झालें. ग्रीस देशांतील इतर कवींपेक्षां. युरिपिडिजचें काव्य सिसिलियन लोकांस फारच आवडत असे. परकी लोक त्या बेटांत जेव्हां उतरत. त्या वेळेस त्यांपासून त्या कवीच्या मिळतील तितक्या पद्यांचा सिसिलिअन लोक संग्रह करून आपसांत त्यांचा प्रसार करीत. ह्या प्रसंगीं त्या धुळधाण झालेल्या सैन्यापैकीं बरेच शिपाई स्वदेशीं परत आल्यावर युरिपिडिजकडे गेले, व तुमच्या काव्यामुळें आमच्यांपैकीं कित्येकांचे प्राण वांचले. कित्येक शत्रूंच्या दास्यत्वापासून मुक्त झाले, व कित्येक लढाईनंतर रानोमाळ भटकत फिरत असतां शत्रूंनीं अन्नपाणी दिल्यामुळें आपला जीव घेऊन परत आले, असें सांगून कृतज्ञताबुद्धीनें त्यांनीं त्या कवीचे आभार मानिले. "

ह्या मतांत एकाद्या कवीचें काव्य अवगत असल्यामुळें अथिनिअन लोकांसारखे आपले प्राण वांचतील असें घडणार नाहीं; परंतु दुसऱ्या दृष्टीनें पाहिलें तर, काव्याचे हल्लींहि त्याच प्रकारचे आपणांवर उपकार होत आहेत अ-

सें आढळून येईल. ज्या वेळेस अतिशय श्रमानें, दुःखानें अगर चिंतेनें शरीरास अत्यंत थकवा येऊन मन उदास होतें, त्या वेळेस एखादें मनोहर काव्य हातीं घेतलें तर, दुःखाचें ओझें हळूहळू हलकें होतें. शरीराचा थकवा जाऊन त्यास हुशारी येते, व मनाची खिन्नता नष्ट होऊन तें सुप्रसन्न होतें.

प्लेटोनें आपल्या काल्पनिक 'प्रजासत्ताक' राज्यांतून कवींस हद्दपार केलें आहे. कारण त्याचा अभिप्राय असा होता कीं, त्यांच्या काव्यानें इंद्रियांचा क्षोभ होतो, मनोविकारांस उत्तेजन मिळतें, व ते कल्पनातरंगांत सत्यास अगदींच विसरतात. परंतु जेथें कवींची अशी निभर्त्सना होईल तें प्रजासत्ताक राज्य सुखावह असेल, असें थोडेच लोक म्हणतील. काव्याचें चित्रकलेशीं साम्य आहे असें लोक म्हणतात तें खरें आहे. सिमोनिडिज हा ग्रीस देशांतला कवि म्हणत असे कीं, "काव्य हें बोलकें चित्र व चित्र हें मूककाव्य होय."

कला ह्या बहुतेक स्वतंत्र असून, त्यांचा परस्परांशीं संबंध नसतो. परंतु जें खरें काव्य आहे, तें सर्व कलांचे साह्यानें मनोहर होतें. कवि आपल्या वाणीनें चित्रें काढितात, पुतळे बनवितात, व सुंदर मंदिरें उठवितात. काव्यांत संगीतहि आहे. तेव्हां, त्यांत बहुत कलांचा समावेश होतो, असें म्हटलें असतां चालेल.

खरें काव्य हा एक चित्रसंग्रहच आहे. एकाद्या पदार्थाचे चित्रानें, अगर एकाद्या पुरुषाचे पुतळ्यानें, त्या पदार्थाच्या अथवा पुरुषाच्या स्वरूपाची जशी व्यक्त कल्पना मनांत येते, तशी त्यांच्या सूक्ष्मवर्णनानें येत नाहीं.

परंतु त्या पदार्थाच्या अथवा पुरुषाच्या संबंधानें अशा कांहीं दुसऱ्या गोष्टी कवि दाखवितात कीं, चित्रांत त्या आपणांस दिसत नाहींत. ज्या पुरुषाचा पुतळा आपण पाहिला त्याचें रूप जरी आपल्या लक्षांत आलें, तरी तो कसा बोलत असे अथवा त्यानें अमक्या प्रसंगीं अमुक कृति कशी केली, हें काव्यांतच समजतें. म्हणून चित्रकार हे पदार्थांचें रूप व कवि हे त्यांची गति, कृति वगैरे दाखविणारे होत असें म्हटलें आहे.

उदाहरणार्थ, स्त्रीसौंदर्य घ्या. कितीहि वर्णन केलें तरी स्त्रीसौंदर्याची अस्पष्टच कल्पना मनांत येते. ही गोष्ट मोटमोठे कवि जाणून होते; म्हणूनच कालिदास हा शकुंतलेच्या सौंदर्याचें सूक्ष्म वर्णन करण्याचे भरीस पडला नाहीं; परंतु त्यानें एवढेंच म्हटलें कीं—

( श्लोक )

" चित्रार्पणीं तनु निची रचिली विधीनें,
चातुर्य सर्व खरचूनि कलानिधीनें;
स्त्रीरत्नसृष्टि दिसते मज ही निराळी,
झाली नसेलचि कधीं अशि पूर्वकाळीं. "

कवीस प्रसाद, दिव्यदृष्टि, व इतर मनुष्यांपेक्षां अधिक सहृदयता असली पाहिजे.

( आर्या )

" अन्तर्गूढानर्थानव्यञ्जयतः प्रसादरहितस्य
संदर्भस्य नदस्य च न रसः प्रीत्यै रसज्ञानाम्. "

—सुभाषित

**भावार्थः**—जो नद किंवा काव्यप्रबंध प्रसादानें रहित ( गढूळ; काव्यपक्षीं क्लिष्ट ) असल्यामुळें, आंतील गुप्त अर्थ ( नदपक्षीं पदार्थ ) दाखविण्यास असमर्थ असतो, त्याचा रस ( नदपक्षीं उदक ) रसिकांस आनंद देत नाहीं.

" जो अनादि परमेश्वर, सकल ज्ञानानें व रम्य वाणीनें पाहिजे त्यास अलंकृत करितो व आपल्या स्थंडिलांतील शुद्धाग्नि देवदूतांचे हातीं धाडून, त्याची वाणी निर्मल व मंगलकारक करितो, त्या परमेश्वराचा भक्तिस्तव खऱ्या कवींच्या वाणींत सदैव वास करितो. "

धनाढ्य व मोठ्या पुरुषांचे ठिकाणीं काव्यप्रसाद असतो असें नाहीं. कारण, कवि कोठे व कोणत्या कुळांत निर्माण होतील याचा मुळींच नेम नाहीं. चाटर्टन हा ' अलौकिक बालकवि ' गरीब आईबापांचें मूल होतें. बर्न्स हा आनंदानें नांगर हांकीत असे. तुकाराम एक साधारण शूद्राचा मुलगा होता.

पुष्कळ लोकांस कविताशक्ति असते, परंतु ते सर्वच काव्य लिहीत नाहींत. पण अशा कवींपैकीं कोणीं जर निरस पद्यें रचिलीं, तर त्यांस जगतांत मान मिळत नाहीं. ज्या काव्यांत प्रसाद नाहीं, तें अजरामर होत नाहीं.

" जें काव्य प्रसादनिर्मित असतें, तेवढेंच अंतःकरणास मोहित करितें. " " उत्तम विषयावर लोकमान्य ग्रंथ करून, लोकांस माना डोलवावयास लावीन म्हटलें, तर आपण स्वतः कवि असलें पाहिजे. " " कवितादेवीच्या प्रसादाचा व स्फूर्तीचा, ज्याचे मनास गंध सुद्धां नाहीं, तो जर, यमक साधण्याचा कृत्रिम गुण आपले अंगीं आहे म्हणून तिच्या मंदिरांत शिरूं पाहील, तर त्याचा व त्याच्या काव्याचा तेथे प्रवेश होणार नाहीं.

अशातशा कवींचीं नांवें नाहींशीं होऊन, त्यांच्या कृतिहि लोक विसरून जातात; परंतु महाकवि जे आहेत

१ अर्नोल्ड २ कालरिज् ३ मिल्टन् ४ प्लेटो

त्यांचीं काव्यें अमर होतात. होमर, व्यास, वाल्मीक यांचीं काव्यें शेंकडो वर्षे उलटून गेलीं तरी जशींचीं तशीं कायम आहेत. त्यांच्या काव्यांतील एका अक्षराचा अथवा शब्दाचाहि लोप झाला नाहीं. इतक्या काळांत अनंत राजमंदिरें, इमारती, देवालयें व किल्ले मोडकळीस येऊन जमीनदोस्त झाले आहेत. प्राचीन काळीं शिकंदरासारखे जे मोठमोठे योद्धे, राजे व पराक्रमी पुरुष होऊन गेले, त्यांच्या तसबिरी दुर्लभ झाल्या आहेत. अलीकडील मोठमोठ्या पुरुषांच्या तसबिरींचीहि हीच गति आहे. कारण, तसबिरी फार दिवस टिकत नाहींत; व त्यांच्या नकला करून ठेविल्या तर त्यांत मुळांतील खुबी उतरत नाहीं, परंतु कवींच्या बुद्धिबलानें व ज्ञानानें निर्माण केलेल्या काव्यरूपी प्रतिमा, पुस्तकांतून कायम राहतात. हीं पुस्तकें जुनीं झालीं तर त्यांस नवीं करितां येतात, व त्यांस काळापासून धक्का पोंचत नाहीं. शिवाय तसबिरींसारखें या काव्यरूपी प्रतिमांस निर्जीवहि म्हणतां येत नाहीं. कारण त्या निरनिराळ्या युगांतील अनंत मनुष्यांचे मनांत नानाविध कृतींचें, विचारांचें व कल्पनांचें बीजारोपण करितात. नौका ही संपत्ति व माल एका ठिकाणाहून दुसऱ्या स्थळीं नेते व तिच्यायोगानें निरनिराळ्या स्थळीं उत्पन्न होणाऱ्या संपत्तीचा दूरदूरच्या स्थळांस उपभोग घेतां येतो म्हणून नौकेची जर इतकी प्रशंसा, तर काव्यग्रंथांची किती असावी! कारण तेहि नौकांसारखे काळाच्या अफाट सागरांतून चालत जाऊन, युगायुगांत प्रकट झालेल्या शहाणपणाचा, ज्ञानप्रकाशाचा, व नवीन कल्पनांचा मनुष्यमात्रास लाभ करून देतात.

विचारशक्ति, प्रेमा, रसिकत्व व असे दुसरेहि बहुत गुण कवींचे अंगीं असले पाहिजेत. " ह्या काव्याची मांडणी प्रथम कोणीं केली ?—विचारबुद्धीनें. यास मनोहरत्व कोणीं आणिलें ?—प्रेमानें. विचारास व प्रेमास मार्ग कोणीं दाखविला ?—तारतम्यबुद्धीनें. " सर्वांस कल्पनाशक्ति असते. परंतु कवींच्या तर ती सर्व रसांशीं मिळून राहते.—

( ओंव्या )

" कवींस होतां काव्यस्फूर्ति; प्रगल्भदृष्टीनें देखती
आकाश तैसी ही क्षिति; वारंवार सप्रेमें.
अमूर्त तरंग जे उठती मनीं; त्यां प्रगटें करूनी;
मूर्तिमंत करिती कवनीं. नाम, स्थळही देती त्यां. "

शेक्सपिअर

काव्य हें प्रसादाचें फळ असून, श्रमसाध्य आहे. मुअर कवि सावकाश व फार श्रमानें काव्यरचना करी.

मनुष्यानें आपल्या बुद्धिमत्तेनें जें इतिहासरूप एक महाकाव्य रचिलें आहे, त्यांतील मोठमोठ्या कवींच्या कृति ह्या उपकथा होत.

एकदां एका मोठ्या गणितशास्त्रवेत्त्यानें असा प्रश्न केला कीं, मिल्टन्नें आपल्या महाकाव्यांत काय सिद्ध केलें आहे ? ह्या गणित जाणणाऱ्या गृहस्थासारखे अरसिक गृहस्थ जगांत पुष्कळ आहेत. हे लोक वरच्यासारखा प्रश्न दुसऱ्यास करण्याचें साहस जरी करीत नाहींत, तरी तो स्वतःस तरी विचारितात. काव्य हें मनोरंजन करितें ही जणुकाय त्याचे हातून मनुष्यमात्राची कांहींच सेवा होत नाहीं, असें समजून ते म्हणतात कीं ज-

१ कष्टान्

गास काव्याचा तादृश उपयोग नाहीं. परंतु जो खरा उपयोगवादी आहे, तोहि काव्यास मान दिल्याशिवाय राहणार नाहीं. कारण, ‘ मोठ्या समाजाचें मोठें हित ’ हा त्या पंथाचा प्रधान सिद्धांत आहे. तेव्हां, काव्यापासून जर बहुत लोकांचें मनोरंजन होतें, तर तें मूल्यवान् नाहीं. असें त्यास कसें म्हणतां येईल ?

मोठमोठ्या प्रासादिक ग्रंथकारांच्या ग्रंथांचा मुख्य हेतु जरी वाचणारांचें मन आनंदभरित करण्याचा असला, व तो त्यांपासून सफलहि झाला, तरी तेवढ्यावरून त्या ग्रंथांचें मोल ठरवूं नये. हे ग्रंथकार आपला ग्रंथ रचितांना, वाचणारांचे अंगीं बुद्धि आहे असें गृहीत धरून, ती आपल्या कृतीनें प्रचलित करितात; ह्याहि गुणांवरून त्या ग्रंथांचें महत्त्व ठरविलें पाहिजे.

काव्याचा पूर्ण आस्वाद घेणें असल्, तर वाचकानें आपलें मन संकुचित न करितां, त्याची धांव मोठी ठेवून, कवीनें आपल्या वाक्चातुर्यानें निर्माण केलेलें लाघव समजण्याची त्यास संवय लाविली पाहिजे; व जगांत जें जें म्हणून उत्तम गणिलें आहे, त्याचें सौंदर्य व त्यापासून मनावर होणार संस्कार हे नेहमीं जाणिले पाहिजेत.

आर्कियास कवीसंबंधानें सिसरोनें केलेलें भाषण अगदीं यथार्थ आहे:—“ मीं ह्या मनुष्यावर प्रेम करावें, याची वाहवा करावी, व माझ्यानें होईल तितकें याचें रक्षण करावें, असा याचा मजवर अधिकार नाहीं काय ? काव्याहून इतर प्रत्येक विषयांच्या शिक्षणानें, व्यासंगानें व उपदेशानें जगतांत महान् विद्वान् पुरुष निर्माण होतात व अशा पुरुषांपासून आपण बोधहि घेतों. परंतु कवि हे स्व-

तः सृष्टीनें घडविले असतात; त्यांस त्यांच्या बुद्धिबलानें स्फुरण येनें व परमेश्वरी अंशानें त्यांचे ठिकाणीं प्रेरणा होते. म्हणून कवींस लोक ‘ पवित्र ’ म्हणतात तें योग्य होय. कवि हीं इहलोकींचीं रत्नें नाहींत; तीं आपल्या उत्कर्षाकरितां दयाळू होऊन परमेश्वर वेळोवेळीं स्वर्गाहून पृथ्वीवर पाठवितो. ”

“ नानाविध कल्पनांचे अनेक संयोग आकलन करण्यास लावून काव्य हें मनाचा विकास करितें. व या जगतांत लोपून राहिलेल्या सौंदर्यावरील पडदा काढून परिचयांतील पदार्थ अगदीं अपरिचितसे करून टाकितें. ”

जसें “ एका सूक्ष्म बीजाचे पोटीं अनंत वृक्षांचा संभव असतो. तसा काव्याचे ठिकाणीं अनंत अशा सौंदर्याचा संभव होतो. पडद्यामागून पडदा जरी दूर केला व त्यांतील मूळ सौंदर्य जरी उदयास आणिलें. तरी काव्यानें खरें मर्म ताडितां येत नाहीं. महाकाव्य हें एक कारंजें आहे. त्यांतून ज्ञान व आनंदरूपी निर्झराचे तुषार सदैव उडत असतात. ”

कवि हे निर्माणकर्ते होत. म्हणून असें म्हटलें आहे, -

( ओव्या )

“ * * * * * जे शब्दसृष्टीचे ईश्वर;
ना तरी हे परमेश्वर. वेदावतारी;
कीं हे सरस्वतीचें निजस्थान, कीं हे नाना कलांचें जीवन.
नाना शब्दांचें भूषण, यथार्थ होय;
कीं हे शब्दरत्नांचे सागर, कीं हे मुक्तांचें मुक्त सरोवर,
नाना बुद्धींचे वैरागर, निर्माण झाले;
कीं हे कल्पनेचे कल्पतरू. कीं हे मोक्षाचे मध्य पडिभारु.

नाना सायुज्यतेचे विस्तारु, विस्तारिले;
कीं हे अमृताचे मेघ वोळले, कीं हे नवरसांचे वोघ लोटले,
नाना सुखांचें उचंबळलें, सागरवर हे;
कीं हीं विवेकनिधीचीं भांडारें, प्रकट झालीं मनुष्याकारें,
नाना वस्तूंचेनी विचारें, कोंदटलीं. "

—रामदास

ज्या सृष्टींत 'जिकडे तिकडे सौंदर्यच दिसतें व कर्णांस मंजुळ गीत ऐकूं येतें' ती काव्यावर प्रेम करणाऱ्या मनुष्यास अत्यंत आनंदकारक होते.

निरनिराळ्या कवींनीं ह्या आपल्या प्रिय पृथ्वीस चित्रविचित्र रंगांनीं, सुंदर नद्यांनीं, फलभारानें लवलेल्या नाना प्रकारच्या वृक्षांनीं, सुवासिक पुष्पांनीं व इतर रमणीय वस्तूंनीं जशी सुशोभित केली आहे, तशी खुद्द सृष्टीनेंहि केली नाहीं.

एकाद्या गजबजलेल्या शहरांत जरी आपण असलों, तरी काव्यवाचनानें आपण ताज्या हवेंत व उजेडांत बसलों आहों असें होतें; वनांतील पाखरांचा व निर्झरांचा गुंजारव कानीं पडतो व आनंदसागरांत मन मग्न होऊन आपण संसारांतील यातना व चिंता विसरून जातों.

कवि हे सृष्टीचे निःसीमभक्त आहेत, म्हणून

( श्लोकार्थ )

" कविवर्गनिधनें ही सृष्टि दुःखें तळावे,
विगलित निजभक्तासाठीं होई स्वभावें. "

—स्कॉट

असें जें म्हणतात तें कांहीं मिथ्या नाहीं.

काव्याचें महत्त्व पूर्णपणें समजून घेणें असल्यास त्याचें पूर्ण मनन केल्याशिवाय नुसतें पाहून किंवा धांवतां

धांवतां वाचून, समजणार नाहीं. काव्यावर एकादें भाषण करावयाचे आहे किंवा निबंध लिहावयाचा आहे म्हणून जरी तें वाचिलें, तरी त्याचें खरें सौंदर्य कळावयाचें नाहीं. त्याचें स्वारस्य घेण्यास पात्र अशी आपली चित्तवृत्ति झाली पाहिजे. पुष्कळ लोक चिंतेनें किंवा दुःखानें पीडिले असतां काव्य वाचतील व त्या वेळेस त्यांचें रंजनहि होईल; परंतु मन व्यग्र असल्यामुळें त्यांस खरा काव्यरसास्वाद घेतां येणार नाहीं. स्थिर, शांत व प्रसन्न मनानेंच काव्य वाचिलें पाहिजे.

छापण्याची कला निघाल्यापासून काव्याचें अमोल भांडार लुटण्याचा मार्ग सर्वांस खुला झाला आहे. कारण थोडें मोल देऊन तें पाहिजे त्यास विकत घेतां येतें.

प्राचीन काळीं किंवा हल्लीं काव्यापासून होत असलेल्या भागावर, त्याची योग्यता ठरवितां येत नाहीं; कारण त्याची योग्यता यापुढेंहि फारच वाढणार आहे. कालांतरानें उत्तम काव्य हें मनुष्यमात्राच्या समाधानाचें एक खरें व अप्रतिम साधन होणार आहे. आजपर्यंत त्याचें जसें लोक महत्त्व मानीत आले आहेत, त्याहून त्यास पुढें अधिक योग्यता येऊन त्याचा उपयोगहि विशेष होणार आहे.

काव्य हें सुखी पुरुषांनीं अत्यंत सुखांत घातलेल्या काळाचा लेख व ह्या जन्मास सुप्रकाशित करणारा दीप होय. तें ह्या जगतांत दिसणाऱ्या सौंदर्यास अजरामर करून टाकितें, व ज्या अतिपरिचयरूप पटलामुळें आपल्या अंतर्दृष्टीस ह्या जन्माचें खरें कौतुक वाटत नाहीं, तें पटल दूर करितें. काव्य हें सर्व ज्ञानाचा विस्तार होय,

आणि कवि हे वर्तमान काळावर भावी काळाच्या पड-णाऱ्या प्रचंड छायेचे आदर्श होत. म्हणून रामदास स्वामी म्हणतात,—

( ओंव्या )

“ कीं हे निरंजनाची गंपत्ती, कीं हे विराटाची योगस्थिती
कीं हे भक्तांची फलश्रुति, फळागि आली;
कीं ईश्वराचा पवाड, पहातां गगनाहून वाड,
ब्रह्मांड रचनेहूनि जाड, कविप्रबंधरचना. ”

( श्लोक )

" दोलायां शायितो बालो रुदन्नास्ते यदा क्वचित्।
तदा गीतामृतं पीत्वा हर्षोत्कर्षं प्रपद्यते;
क्रुद्धो विषं वमन्सर्पः फणामान्दोलयन्मुहुः
गानं जांगलिकाच्छ्रुत्वा हर्षोत्कर्षं प्रपद्यते. "

**—संगीत पारिजात**

**भावार्थः**—पाळण्यांत निजविलेलें बालक रडूं लागलें असतां त्याचे कानीं जर गायनामृत पडलें तर त्यास आनंद होतो; हें तर काय, पण क्रुद्ध होऊन गरळ टाकणारा सर्पहि गारुड्याचा नागस्वर ऐकून आनंदानें डोलूं लागतो.

# प्रकरण १७

## संगीत

संगीताच्या इतिहासाचा दुर्दैवानें लोप झाला आहे. स्वरांचा शोध लागण्यापूर्वी. मनुष्यानें वर्ण शोधून काढिले असावे: परंतु यासंबंधानें दंतकथांवरूनहि कांहीं विश्वसनीय माहिती मिळत नाहीं. नुसतीं वाद्यें घेतलीं. तर पहिल्यांदा गंजिरी अथवा ढोल. नंतर वेणू व त्यानंतर तंतुवाद्यें उत्पन्न झालीं असावीं असें दिसतें.

संगीताच्या उत्पत्तीविषयीं निरनिराळ्या दंतकथा ऐकण्यांत येतात. ग्रीक लोकांत अशी एक कथा आहे कीं, पूर्वी एका निराळ्या जगांत टोळ हे मनुष्यप्राणी होते; परंतु जेव्हां वाग्देवतेचा त्या जगांत वास झाला. तेव्हां तिच्या गाण्यानें हे टोळ इतके तल्लीन होऊन गेले कीं ते स्वतःहि गाऊं लागले. आणि गाण्याचे नादांत अन्नपाणी विसरून प्राणास मुकले.

एके दिवशीं पिथ्यागोरास एका लोहाराचे दुकानावरून जात असतां. त्यास घनाचा नाद सुस्वरसा वाटला; म्हणून त्यानें ते घन वजन केले, तों सहा, आठ, नऊ व बारा अशा प्रमाणानें ते चार घन वजन भरले. नंतर त्यानें त्याच प्रमाणाचीं चार वजनें सारख्या जाडीच्या व लांबीच्या चार दोऱ्यांस बांधिलीं. व वाजवून पाहिलीं, तेव्हां त्यांतून मध्यम, पंचम, षड्ज असे निरनिराळे सूर निघाले अशी एक संगीताच्या उत्पत्तीची दुसरी कथा सांगतात.

हिंदु लोकांच्या संगीताच्या इतिहासाचाहि अत्यंत लोप झाला आहे. स्वर्गांत गंधर्व व अप्सरा ह्या संगीतांत नि-

पुण असत हें प्रसिद्ध आहे. परंतु संगीताची उत्पत्ति शिव, पार्वती, नंदी, हनुमान व अर्जुन यांजपासून झाली आहे, असें म्हणतात. भरतानें संगीतास पद्धत लावून तें स्वर्गाहून पृथ्वीवर आणिलें, अशीहि एक कथा आहे. वेदकाळीं संगीत चांगलें उदयास आलें होतें. सामवेदांत धैवत, निषाद, षड्ज, ऋषभ आणि गांधार असे पांचच सूर दृष्टीस पडतात; पुढें पंचम आणि मध्यम हे दोन नवीन सूर जोडिल्यावर हल्लींचे सप्तसूर झाले आहेत.

अति प्राचीन काळीं आपले ऋषि पर्वतांत व अरण्यांत राहून, मोठ्या आनंदानें वीणेवर वेद म्हणत असत, व होमहवनेंहि वीणेवर मंत्र गाइल्याशिवाय यथासांग झालीं असें ते मानीत नसत. पुराणकालींहि संगीताची अत्यंत थोरवी मानिली जात असे. लवकुश हे रामपुत्र वाल्मिकाचे आश्रमीं असतां, त्यांस त्यांच्या पित्याचे गुणानुवाद वीणेच्या संगतीनें गावयास शिकविलें होतें. रावणानें संगीतशास्त्रावर ग्रंथ लिहिले असून, तो आपल्या मंदिरांत राक्षसी व अप्सरा यांजकडून गाववून आपलें मनोरंजन करी; यमुनेचे कांठीं कृष्ण आपली मुरली वाजवून गोपी व गोप लुब्ध करून टाकीत असे. एकदां रुक्मांगद राजानें कडकडीत एकादशीव्रत धारण केलें. ही गोष्ट इंद्रास न रुचून, त्या व्रताचा भंग करण्याकारितां त्यानें मोहिनी नांवाचे अप्सरेस त्या राजाकडे पाठविलें. तिनें आपल्या वीणेवर तोडी, झिंजोटी, खमाज वगैरे मनोहर राग गाऊन राजास मोहित केलें व त्यानें धारण केलेल्या एकादशीव्रताचा त्याचे हातून भंग करविला. हिंदु लोक संगीतास वेदासारखेंच पूज्य मानीत अ-

सल्यामुळें, तें पूर्वींचे राजेरजवाडेहि शिकत असत. विक्रमादित्य व भोजराजा हे मोठे गायक व वादक होते. कादंबरींतील मुख्य नायक चंद्रापीड हा, राजपदभोगपात्रता अंगीं येण्यास संगीत, वाद्य व नृत्य यांचें शिक्षण अवश्यक आहे. असें समजून तें शिकला होता. राजपुत्र व राजकन्या, तसेंच मोठमोठ्या घराण्यांतील स्त्रिया, पूर्वी संगीत शिकत असत. परंतु मुसलमानांचें राज्य झाल्यापासून संगीतास उतरती कळा लागून, ती कला हलक्या लोकांचे हातीं गेली; इतकेंच नाहीं, ज्या रागरागिण्या शुद्ध राखण्याविषयीं हिंदु लोकांनीं शेंकडो वर्षें मोठी काळजी घेतली त्यांतहि अल्प काळांतच भेसळ होऊन त्यांचें पूर्वीचें स्वरूप बरेंच बदललें.

"हिंदु लोकांचें संगीतशास्त्र पाणिनीचे काळापूर्वी म्हणजे ख्रिस्ती शकाचे पूर्वी ३५० वर्षांचे सुमारास चांगलें उदयास आलें होतें. त्या वेळेसच सप्तसूर ठरले जाऊन त्यांच्या नांवाच्या पहिल्या अक्षरानें ते दाखविले गेले. ह्या हिंदु लोकांनीं बसविलेल्या सप्तसुरांचा पर्शिअन लोकांचे मार्फत अरबस्थानांत प्रसार होऊन तेथून अकरावे शतकाचे सुमारास युरोपांतहि त्यांचा विस्तार झाला."

चिनी लोक आपल्या संगीतशास्त्रांतले सूर त्यांच्या नांवानें अथवा आद्य अक्षरानें दाखवितात. त्यांनीं पहिल्या सुरास 'बादशहा', दुसऱ्यास 'मुख्य प्रधान', तिसऱ्यास 'प्रजा', चौथ्यास 'राजकारण' व पांचव्यास 'आकाशचा आरसा' अशीं नांवें दिलीं आहेत. ग्रीक लोकांनींहि प्रत्येक सुरास निरनिराळें नांव दिलें होतें; परंतु

१ डा० हंटर

त्यांच्या संगीताचा आतां मागमूस सुद्धां राहिला नाहीं. युरोपांतील लोकांच्या सुरज्ञानाची उत्पत्ति ज्यास 'ग्रेगोरियन' सूर म्हणतात त्यापासून झाली, असें म्हणतात. परंतु त्यांचें संगीत हळूहळू सुधारत जाऊन आतां तर तें चांगलेंच नांवारूपास आलें आहे. तशांत इंग्रज लोकांच्या परिश्रमानें व कल्पनेनें संगीताचा फारच उत्कर्ष झाला आहे. सन ११८५ सालीं एकानें त्यांच्या गायनासंबंधानें असें लिहिलें आहे कीं, " इंग्लंदांत एकाहून अधिक लोक एकाच वेळीं गातात, परंतु इतर लोकांप्रमाणें ते एका सुरांत एकमिलाफानें गात नाहींत. प्रत्येक गायक स्वतंत्र गात असतो. याचा परिणाम असा होतो कीं, निरनिराळे लोक स्वतंत्र अशीं गाणीं गात आहेत असें वाटतें." इंग्लंदांतील संगीतशास्त्रांत निष्णात असा पर्सेल नांवाचा गृहस्थ होऊन गेला. नाटककारांत जशी शेक्सपिअरची, कवींत मिल्टन्‌ची, व गणितशास्त्र जाणणारांत न्यूटनची, तशी संगीतांत त्याची गणना असे. परंतु त्यानें निर्माण केलेल्या संगीताचें जसें तेथील लोकांस ज्ञान असावें तसें नाहीं. पर्सेल हा अल्पवयी मरण पावल्यामुळें, संगीतास चांगलाच धक्का बसला असें म्हणतात.

हिंदु लोकांच्या रागरागिण्या ह्या, मनुष्याच्या निरनिराळ्या मनोवृत्तींच्या दर्शक असून, त्या दिवसां व रात्रीं नेमल्या वेळीं म्हणण्याचा प्रघात आहे. ह्या रागरागिण्या किती गोड आहेत, हें एथें सांगावयास नको. कांहीं राग विशेषेंकरून जे सकाळीं गावयाचे आहेत ते, एकाद्या कुशल गायकानें म्हटले अगर एकाद्या वादकानें तंतुवाद्या-

१ कंब्रेन्सीस

वर वाजविले, तर मन अगदीं तल्लीन होऊन जातें, असें पुष्कळांचे अनुभवास आलें असेल.

इंग्रजी भाषेंत, तशीं युरोपांतील इतर निरनिराळ्या भाषांतून, सुरस गाणीं निरनिराळ्या सुरांत बसविलेलीं आहेत. तीं फारच मनोहर असून लोकप्रिय आहेत. परंतु जशा आपल्या रागरागिण्या कोणीं निर्माण केल्या याचा पत्ता नाहीं, तसें ह्यांपैकीं बहुतेक गाण्यांच्या कर्त्यांचा शोध लागत नाहीं. हा काळाचा महिमा नव्हे काय? असो. पण एथे संगीतशास्त्राचें स्वरूप, नियम, वगैरे सांगण्याचें प्रयोजन नाहीं. या संसारांत जीं इतर सुखसाधनें परमेश्वरदयेनें मनुष्यास प्राप्त झालीं आहेत, त्यांतच संगीताची गणना होय. म्हणून त्याजविषयीं मुख्यत्वें एथे उल्लेख करावयाचा आहे.

कित्येक ध्वनींस, संगीत हें नांव शोभत नाहीं, तरी ते ऐकिल्यापासून मनास आनंद होतो. पारध करणाऱ्यास शिंग फुंकल्याबरोबर स्फुरण चढत नाहीं काय?—परंतु खरें संगीत सृष्टींत आहे. पक्ष्यांचें गाणें, वृक्षपाल्वींतून वारा वाहतांना होणारा सूं सूं शब्द, वालुकामय किनाऱ्यावर पाणी आदळतें त्याचा खळखळाट, वाऱ्याचा सोंसाटा व समुद्राची गर्जना, हें खरें संगीत होय. शिवाय, आकाशांत ग्रह भ्रमण करीत असतांना गातात, अशी शेक्सपिअरनें केलेली कल्पना इंग्रजी जाणणारांस विदित आहेच.

( श्लोक )

"असंख्य, बघ, तारका भ्रमति दिव्यमार्गी वरीं;
जरि गमति मूक ह्या, स्वपथमार्गिं गाती परी;

जणूं गगनिं अप्सरांसहित सुस्वरा काढुनी,
प्रसन्न परमेश्वरा करिति नित्य त्या गाउनी. "

—शेक्सपिअर

संगीत हें ह्या जडपृथ्वीवर निर्माण झालेलें नसावें. ज्या ठिकाणीं " संगीत, चंद्रिका व सहृदयता या अत्यंत मनोहर गोष्टी एकच आहेत, अशा दुसऱ्या एकाद्या भाग्यशाली जगतांतून तें पृथ्वीवर आलें असावें."

जसें गाण्यांत संगीत आहे, तसें बोलण्यांतहि आहे. एकादा सुंदर वक्ता बोलून गेला तरी त्याची मधुर वाणी कर्णीं घुमत राहून तो अजून बोलतोच आहे असा भास होतो.

जसें गाणें शिकवितांना गळा व वाणी यांस काळजी घेऊन कमावितात व तयार करितात तशी साधारण भाषणांत व बोलण्यांत वाणीची लोक प्रतिष्ठा मानीत नाहींत, हें आश्चर्य आहे. कारण, वाणीचा महिमा असा आहे कीं,—

( श्लोक )

" विरोधिवचसो मूकान्वागीशानपि कुर्वते,
जडानप्यनुलोमार्थान्प्रवाचः कृतिनां गिरः. "

—माघ

**भावार्थः**—कुशल वाणी ही, विरुद्ध बोलणारा प्रत्यक्ष बृहस्पति असला तरी त्यास मुका करून टाकिते व अनुकूल भाषण करणारा जड असला तरी त्यास प्रौढता आणिते.

असा एक साधारण नियम आहे कीं,—

( श्लोकार्ध )

" ज्याचें चित्त न भेदतें न डुलतें संगीत तें ऐकुनी,
तो शीलें शठ, दीर्घदृष्टि फितुरी, फंदी, असे वर्तनीं. "

—शेक्सपिअर

१ स्विनबर्न

परंतु ह्या नियमास अपवाद आहे. डॉक्टर जॉन्सन् ह्यास संगीताचा मोठा तिटकारा असे. एके प्रसंगीं एकानें त्यास म्हटलें कीं, अमकें गाणें गाण्यास फारच अवघड आहे; तेव्हां तो म्हणाला कीं, तें गाणें कधीं तरी कोणास बहुप्रयत्नानें गातां येईल, ही दिलगिरीची गोष्ट आहे; तें कधीं कोणास मुदलींच गातां आलें नसतें, तर फार चांगलें झालें असतें. असा तो संगीताचा द्वेषी असतांहि, वरील श्लोकार्धांत वर्णन केल्यासारखा दुर्जन नव्हता.

कवींनीं संगीताची निरनिराळ्या दृष्टीनें प्रशंसा करावी हें साहजिक आहे. मिल्टननें त्यास ऐषआरामाचें साधन असें गणलें आहेः—" ज्या संगीतांत कधींहि नाश पावणार नाहीं असें काव्य असेल, जें अंतःकरण भेदून जातें, ज्याचे सूर अत्यंत मधुर असून ते सर्व एकमेकांस साह्यभूत होऊन एकंदर माधुर्य वाढेल अशा रीतीनें एके ठिकाणीं गोंविले आहेत,—अंत्रा, अस्ताई, आलाफ, लय, तान इत्यादिरूपानें ज्या संगीतांतील सूर स्वैर खेळतात व कुशल वाणींतून चाहील तशीं बहुत वळणें घेऊन क्रीडा करितात व पडद्यान् पडदा दूर करून संगीताचें गूढरहस्य प्रकट करितात, असें जें संगीत असेल, तें ऐकवून मला सदैव गुंग करून टाका, म्हणजे मनास आंतून खाणाऱ्या चिंतेची बाधा मला कधींही पीडा देणार नाहीं. "

कधीं कधीं संगीत ऐकून मनुष्यास स्वतः गाण्याचा मोह उत्पन्न होतो.

( श्लोक )

" जई पक्षी गाती बसुनि तरुशाखे मधुरसें,
तई गाऊं लागे कमलनयनाही, प्रिय कसें !

करीं स्पर्धा त्यांशीं; उपजन त्यांच्या स्वरगा
फिके पाडूं, ऐसा धरि निज मनीं तो भरंवसा!"

—स्पेन्सर

कधीं कधीं तें पूर्ण आनंदाचें वसतिस्थान असतें.

( श्लोक )

"अपि ब्रह्मपरानंदादिदमभ्यधिकं ध्रुवं
जहार नारदादीनां चित्तानि कथमन्यथा."

—सुभाषित

**भावार्थः**—खरोखर ब्रह्मानंदापेक्षां गायनानंद हा अधिक आहे; कारण, असें नसतें तर **नारदासारख्या** परम वैराग्यशाली पुरुषाचेंहि मन गायनाच्या योगानें कसें आकर्षण केलें जातें?

कधीं कधीं तें अंतःकरण गोंधळून टाकितेंः—

( साक्या )

"पाहुन सुंदर वस्तू, ऐकुन शब्द मधुरहि कानें,
होतें मन अति उत्सुक मानव असतां तृप्त सुखानें.
नाहीं बोधित केलें तरि तें सौहृद चित्तीं स्मरतें.
जन्मांतरिंचा लागाबांधा म्हणउनि मन हुरहुरतें."

—शाकुंतल

कधीं कधीं संगीत हें शिक्षणाचें एक साधन आहे असें मानिलें आहे. "मीं[1] आपलीं तंतुवाद्यें पुढें धाडिलीं आहेत. कारण, तीं ऐकलीं असतां, मनास उल्हास येऊन भावी काळ डोळ्यापुढें उभा राहतो, भूतकाळाचें दिग्दर्शन होतें, व वर्तमानकाळ फार वेळ टिकून जो कधीं लयास जात नाहीं अशा आनंदांत व कल्पनातरंगांत मन निमग्न होतें."

ईश्वरभक्तीस संगीतानें तर फारच साहाय्य होतें.—

१ सौंदे

( अभंग )

" गायनाचे रंगीं, शक्ति अद्भुत हे अंगीं;
हें तों देणें तुमचें देवा, घ्यावी अखंडित सेवा;
अंगीं प्रेमाचें भरतें, नाहीं उतारचढतें,
तुका म्हणे वाणी, परम अमृताची खाणी. "

कवींनीं संगीताचे अंगीं, जडपदार्थास देखील मोहित करण्याची शक्ति आहे, अशी कल्पना केली आहे.—

( श्लोक )

" तर्हि भग्नगतयः सरितो वै तत्पदांबुजरजोऽनिलनीतम् ,
अमृशन्पयसि वा बहुपुण्याः प्रेमवेपितभुजा हतवेगाः "

—श्रीमद्भागवत

**भावार्थः**—त्या वेळीं, ज्यांचा वेग गायनाच्या मंजुल रवानें स्तब्ध झाला आहे व गति भग्न होऊन प्रेमानें तरंगरूपी भुज कंपित झाले आहेत अशा पुण्यवान् नद्यांनीं, वायूच्या योगानें उडून आलेली कृष्णाच्या पायांची जी धूळ तिचें सेवन केलें.

( श्लोक )

" वाजवी म्हणोनि जो निज पांवा
कृष्ण तोचि हृदयांत जपावा;
पशु जसे ध्वनिनें स्थिर राहती;
तेंवि जळें न नद्यांतील वाहती. "

—वामन

जशी संगीताची कवींनीं थोरवी गाइली आहे, तशी गद्यग्रंथकारांनींहि गाइली आहे.

" [1]संगीताच्या योगानें या विश्वाचा कोणी चालक आहे हें कळतें, मनास पंख फुटतात, कल्पनाशक्ति उड्डाण घेते, दुःखांत सुख होतें आणि सर्व पदार्थ आनंदमय दिसूं लागतात. संगीत ऐकिलें असतां मनुष्य सज्जन

१ प्लेटो

होतो, व ज्या न्यायदेवतेची व सौंदर्याची तें एक अदृश्य प्रतिमाच आहे असें म्हटलें असतां चालेल त्या न्यायदेवतेवर व सौंदर्यावर तो प्रेम करूं लागतो." "[1]संगीतासारखी सुंदर व सुखकर अशी दुसरी देणगी देवानें मनुष्यास कधीं दिलीच नाहीं; म्हणून मला जें कांहीं संगीत येतें, तें मी सर्व पृथ्वीचें राज्य मिळालें तरी दुसऱ्यास देणार नाहीं." "[2]संगीत ही देवाची अशी कांहीं देणगी आहे कीं, तिच्या योगानें निरनिराळ्या देशांतील व विविध भाषा बोलणारे लोक परमेश्वराचे गुणानुवाद एका वाणीनें गाऊन त्यास आळवूं शकतील." "[3]संगीत हें एक प्रकारचें अस्पष्ट व अगाध भाषण होय. तें अनंत अशा परमेश्वराजवळ आपणास नेऊन त्याचें क्षणभर स्वरूप दाखवितें."

"[4]सप्तसुरांचे जरी चौदा सूर केले, तरी संगीतापासून जें महत्कार्य होतें तें पहातां ही सामग्री फारच अल्प नाहीं काय? अशा अल्प पायावर प्रासादिक गायक नवीन सूररचना करून एक नवीन सृष्टिच निर्माण करितो. ही नवीन सृष्टि मिथ्या, निरर्थक, अथवा एकाद्या गारुड्याच्या हातचलाखीचा खेळ आहे काय? ह्या सप्तसुरांची जी साधी परंतु मनोहर, मिश्र परंतु प्रमाणांत केलेली, निरनिराळी परंतु अत्यंत प्रौढ अशी विविध रचना व मांडणी, ही नाश पावणारा असा फोल ध्वनि आहे काय? संगीत ऐकल्यापासून अंतःकरणास स्फूर्ति चढते, चित्तवृत्ति व्यग्र होतात, सांगतां येत नाहींत अशा इच्छा उद्भवतात, व मनावर चमत्कारिक संस्कार घडतात, हें सर्व

१ ल्यूथर २ हाल्वे ३ कारलाइल ४ न्यूमन

कार्य मिथ्या व नष्ट होणाऱ्या गोष्टींपासून होईल काय? छि:! असें नाहीं. हे सूर स्वर्गासारख्या सुंदर अशा दुसऱ्या जगांतून आपल्यास प्राप्त होतात. हे आपल्या खऱ्या व भावी सुखधामांतील स्वर आहेत. संगीत ही देवदूतांची वाणी व परमेश्वरगुणानुवाद होत. तें दिसतें त्याहून निराळें आहे. गोड गीत आपण गातों व निर्माण करितों, तरी त्याचें खरें स्वरूप आपणांस समजत नाहीं व त्याचें वर्णनहि आपणांस करितां येत नाहीं."

" अखंड हेलावत असणाऱ्या समुद्राचाहि विविध ध्वनि जणुकाय तालावरच होत असल्यामुळें, त्यानें ऐकणाराचें चित्त वेधून जातें. परंतु सृष्टींतील नुसत्या जडशक्तीच्या योगानें हा ध्वनि उत्पन्न होतो, व त्यांत मनुष्याचा बिलकुल संबंध नसतो, ही गोष्ट मनांत आली म्हणजे आपण एकांतस्थानीं आहों असा मनावर अखेर परिणाम होतो. परंतु मनुष्यानें निर्माण केलेल्या संगीतांत गायक अथवा वादक यांच्या चित्तवृत्ति जशा उतू जातात, तशी सुरांची योजना व रचना होत असते. अशा मनुष्यकृतींत सूर कधीं मंद गतीनें निघतात, कधीं एकदम उडी मारल्यासारखे, कधीं एकाएकीं गडबडून हालल्यासारखे, व कधीं गायकाच्या मनोवृत्तीशीं झगडा करीत आहेतसे दिसतात. ते श्रोत्यांची वृत्ति गायकाच्या वृत्तीसारखी बनवितात, व शेवटीं ज्या संगीतानंदाची उत्पत्ति करण्याचें सामर्थ्य देव फक्त आपल्या प्रिय भक्तांसच देतो, त्या आनंदांत त्यास मग्न करून टाकितात."

अति प्राचीन कालापासून उद्योग आणि गीत यांची

१ हेमहोल्ड

सांगड पडलेली आहे. कोळी समुद्रावर होडींत बसून मासे धरितांना कसेंबसें तरी गात असतो. धनगर शेळ्या हांकितांना, बायका दळतांना, शेतकरी शेतांत नांगर चालवितांना गात असतात. सर्व धंद्यांत मेहनत करणारे लोकांस गायल्याशिवाय श्रम हलके वाटत नाहींत.

संगीतापासून ह्या संसारांत मनुष्यास सुखच झालेलें आहे. इतर कलांची गोडी लागण्यास त्यांच्या शिक्षणाचा अल्प तरी संस्कार असला पाहिजे, परंतु संगीतशास्त्राचा यत्किंचित् परिचय नसतांहि, त्यापासून आबालवृद्धांस आनंद होतो. अरसिक लोक जगतांत नाहींत असें नाहीं; परंतु परमेश्वरसत्तेनें ते फारच थोडे आहेत; तेव्हां जसजसा मनुष्यमात्राचा उत्कर्ष होईल तसतसें संगीताच्या योगानें सर्वांचें सुख वाढेल, असें मानण्यास कांहीं हरकत दिसत नाहीं.

( अभंग )

वृक्षवल्ली आह्मां सोयरीं वनचरें, पक्षीही सुस्वरें आळविती;
येणें सुखें रुचे एकांताचा वास, नाहीं गुणदोष अंगीं येत;

* * * * *

आकाश मंडप, पृथिवी आसन, रमे तेथें मन क्रीडा करी;
तुका म्हणे होय मनासी संवाद, आपुलाचि वाद आपणांसी;

( श्लोक )

" हरिणचरणक्षुण्णोपान्ताः, सशाद्वलनिर्झराः,
कुसुमकलितैर्विष्वग्वातैस्तरंगितपादपाः,
विविधविहगश्रेणीचित्रस्वनप्रतिनादिता,
मनसि न मुदं दध्युः केषां शिवा वनभूमयः. "

—सुभाषित

**भावार्थः**—ज्या ठिकाणीं हिरवेगार गवत उगवलें आहे, आजूबाजूस सुंदर झरे वाहाताहेत, जवळ हरिणें चरताहेत, पुष्पांच्या संसर्गानें सुगंधी आलेले वायु वहात असून त्यांच्या वेगानें वृक्ष डोलताहेत व अनेक प्रकारचे पक्षी मंजुळ शब्द करीत असल्यामुळे तो सर्व भाग नादमय होऊन गेला आहे, अशा प्रकारचे रमणीय वनप्रदेश कोणाच्या बरें मनास आनंद देणार नाहींत !

# प्रकरण १८

## सृष्टिसौंदर्य

ही सृष्टि सरोसर अत्यंत सुंदर आहे, परंतु तिचें सौंदर्य थोड्यांसच कळतें. मागल्या एकदोन प्रकरणांत, सृष्टिसौंदर्याचा कोठेकोठे उल्लेख केला आहे; परंतु ज्याच्या योगानें या संसारांत सुख व आनंद होतो, अशा साधनांचा जर आपण विचार करीत आहों, तर सृष्टिसौंदर्याविषयीं स्वतंत्र उल्लेख करणें जरूर आहे.

"[1] समुद्र प्रथम पहाणें, ओसाड रानांतून प्रथम प्रवास करणें, ज्वालामुखींतून निघालेल्या धोंड्यामातीचा रस वाहत असतां प्रथम पाहणें व बर्फावरून प्रथम चालणें, या चार गोष्टींपासून जो नवीन अनुभव येतो व मनावर नवीन संस्कार घडतो, त्याचें स्वरूप नुसत्या वर्णनानें कधींहि मनांत भरावयाचें नाहीं. हे चार चमत्कार म्हणजे, सृष्टीची विलक्षण क्रीडा आहे असें मनास वाटून, आपण एखाद्या नवीन जगांत आलों आहों असा भास होतो व ती क्रीडा वर्णन करण्यास आपण असमर्थ आहों, असें वाटावयास लागतें." सृष्टींतील चमत्कारांचें वर्णन करणें झाल्यास, सर्वच चमत्कार आपल्या सामर्थ्याबाहेर आहेत असें नाहीं; कांहींचें नुसतें वर्णन वाचूनहि ते कसे असावे याची कल्पना मनांत येण्यास अडचण पडत नाहीं.

पिशाचें जशीं पृथ्वीवर राहात नाहींत परंतु तिजवर संचार मात्र करितात, तद्वत् आपणांपैकीं बहुतेक लोक पृथ्वीवर राहून, ती आपली कोणी नाहीं व तिचे आपण

1 ह्यामर्टन्

कोणी नाहीं, असें वागतात. डोळे असून आपण पहात नाहीं व कान असून ऐकत नाहीं. सृष्टीचें सौंदर्य समजण्याचे पूर्वी. आपण तें पाहिलें पाहिजे. तिच्याकडे दुर्लक्ष करण्यापेक्षां तिला पहाणें ही गोष्ट सुलभ आहे व जें आपण पहातों त्याचें मर्म कळणें हा तर एक मनुष्याचे अंगीं मोटाच गुण आहे. रस्किन् म्हणतो कीं,—" ह्या पृथ्वीवर आपला जीवात्मा नेहमीं एक गोष्ट करीत असतो: तो सर्व अवलोकन करून, आपण काय पाहिलें तें सरळ रीतीनें सांगत असतो." ह्या ज्ञानी पुरुषाचे डोळे आपल्या डोळ्यांपेक्षां चांगले आहेत असें नाहीं. परंतु आपणास जें दिसत नाहीं तें त्यास दिसतें.

"[1] जो लक्षपूर्वक अवलोकन करील, त्यास वर्षांतल्या प्रतिक्षणीं निरनिराळें सौंदर्य दिसेल. शेतांत किंवा रानांत उभें राहून पाहिलें तर प्रत्येक घटकेस पूर्वी पाहिलें नाहीं व पुढें दिसणार नाहीं, अशी नवीन वनश्री दृष्टीस पडते. आकाशहि क्षणोक्षणीं बदलत राहून त्याच्या निर्मल शोभेचें अगर छायेचें प्रतिबिंब पृथ्वीवर उमटत असतें."

सृष्टचमत्कार पाहून आनंद होणें, हा एक मनाचा उत्तम धर्म आहे. ह्या धर्माचा जर आपण बीमोड केला, तर आपल्या सर्व वर्तनावर अनिष्ट परिणाम घडण्याचा संभव आहे. म्हणून ज्यास सृष्टिसौंदर्य पाहून आल्हाद होत नाहीं तो निश्चयेंकरून दुर्जन, व ज्यास तसा आल्हाद होतो तो सज्जन असतो, असें म्हणणें नाहीं; परंतु सृष्टिसौंदर्यावर प्रेम ठेविल्यापासून बहुतेकांचा आनंदांत काळ जातो ही गोष्ट निर्विवाद होय.

१ इमरसन्

सूर्योदयाची व सूर्यास्ताची शोभा, कधीं शांत व कधीं क्षोभलेल्या अफाट सागराचें ऐश्वर्य व शक्ति, झंझावातानें डोलत असलेलें अगर पक्ष्यांच्या गाण्यानें नादमय झालेलें अरण्य व विशाल पर्वत, इत्यादि चमत्कार पाहून ज्यांस आनंद होत नाहीं असे कांहीं लोक असतात. अशा लोकांच्या डोळ्यांसमोर आकाश व पृथ्वी यांची निरनिराळी दिव्य शोभा प्रतिदिवशीं येते व जाते; तथापि त्यापासून त्यांचे मनावर कांहींच संस्कार होत नाहीं. अशा अरसिक लोकांची खरोखर कींव येते. परंतु सुदैवानें असे लोक जगतांत थोडे सांपडतात.

वसंत ऋतु फारच रमणीय असून तो सर्वांस अत्यंत प्रिय असतो.

( श्लोक )

विकसितसहकारभारहारि-परिमलपुंजितगुंजितद्विरेफः,
नवकिसलयचारुचामरश्रीर्हरति मुनेरपि मानसं वसंतः "

— **सुभाषित**

**भावार्थः**—आम्रादि वृक्षांस पुष्पें येऊन त्यांचा सुगंध चोहोंकडे पसरल्यामुळें भृगांचा समुदाय त्यास लुब्ध होऊन मंजुळ गुंजारव करीत आहे. तसेंच झाडांस नवी पालवी फुटल्यामुळें सुंदर चामरांची शोभा ज्यांत आली आहे, असा वसंतऋतु विरक्त पुरुषाचेंहि मन आकर्षण करितो.

" [1]मी ह्या उंच रानांतून रेंगाळत चालत आहें; सभोंवतीं वनदाट पालवी जोमांत आली आहे, व वरतीं वृक्षांतून पक्ष्यांचा शब्द निघत आहे. सूर्याच्या उन्हानें व दक्षिण दिशेकडून वाहणाऱ्या वाऱ्यानें या सर्वांस जें तेज व स्वरूप

१ जेफ्रीज

आलें आहे, तें मनांत उत्तम ठसत आहे. ह्या अखंड गवतांपासून, अनंत पालवीपासून, व त्यावर बहुत विस्तार पावलेल्या मजबूत ओक वृक्षांपासून व फिंच व ब्ल्याकबर्ड यांच्या शुद्धानंदमय गाण्यापासून मला थोडीबहुत प्राप्ति होतच आहे. हा ब्ल्याकबर्ड जें गात आहे, त्यांत माझ्या मनोरंजनाकरितां तो कांहीं गात आहे. ह्या पालवीच्या छायेचें तांडव मजकरितांच चाललें आहे, आणि हीं फुलें मजकरितांच विकास पावलीं आहेत. ह्या सर्वांसारखाच मला आनंद होत असल्यामुळें मी त्यांच्यासारखाच उपभोग घेत आहें. हें सर्व पाहून माझी तृप्ति होत नाहीं, व एथें कितो वेळ जरी थांबलों, तरी आणखी थांबावेंसें वाटतेंच. आपला जितका वेळ सौंदर्योपभोगांत गेला, तितका वेळ आपण खरे जिवंत राहिलों व तो आपण काळाच्या जबड्यांतून हिसकावून घेतल्यासारखा होतो. हाच काळ आपण व्यर्थ घालविला तर तेवढें आयुष्य मिथ्या व क्लेशमय, असेंच मानिलें पाहिजे."

कित्येक देशांतील लोकांस शिकारीची मोठी आवड असते. शिकार करीत असतांना निरनिराळे सृष्टचमत्कार अशा लोकांचे दृष्टीस पडतात. परंतु ही शिकारीची होस नष्ट होऊन, सर्व पशु व जनावरें यांजवर जर आपलें प्रेम बसलें व तीं आपली भीति न बाळगितां आपल्याजवळ लडिवाळपणानें येऊं लागलीं, तर त्यांची चेष्टा, त्यांचें बागडणें, व त्यांचें खेळणें पाहून आपणांस आनंद होणार नाहीं काय? पशुपक्ष्यादिकांची उत्पत्ति, त्यांचा इतिहास, त्यांच्या शरीराची रचना, त्यांची चालचर्या व बुद्धि वगैरे गोष्टींचें जर आपणांस चांगलें ज्ञान झालें, तर तें चि-

तत्वेधक व आश्चर्ययुक्त झाल्याशिवाय राहणार नाहीं.

आपण बस्काभर शांत बसून कुरणांतील गवताकडे दृष्टि पोंचविली, तर त्या ठिकाणीं क्रीडा करीत असलेले एकमेकांहून भिन्न असे अनेक प्राणी पाहून विस्मयच होईल. ह्यांपैकीं प्रत्येक प्राण्यांचा इतिहास समजल्यानें मनास बोधहि होतो. " मनुष्याचें अंतःकरण जर सरळ व शुद्ध असेल, तर प्रत्येक प्राण्यापासून ह्या जन्माचें मर्म समजून त्याच ठिकाणीं परमार्थ व प्रेमबुद्धिहि उत्पन्न होईल. "

नुसते सृष्टचमत्कारच सुंदर असतात असें नाहीं; कित्येक शहरेंहि रमणीय असतात. कवि वर्डस्वर्थ हा सृष्टिसौंदर्य पाहून फार तल्लीन होत असे. परंतु लंदनसारखें सुंदर शहरहि त्यास फार आवडे. पुढें दिलेलें लंदन शहराचें वर्णन थोडा फरबदल केल्यास पृथ्वीवरील कित्येक सुंदर शहरांसहि लागू पडेल.

( ओव्या )

" देखा हें नगर अद्भुत ! सर्व पृथ्वीमाजी शुशोभित,
देखोनि रंगेना जयाचें चित्त, तो मतिमंद निश्चयें.
प्रभातसौंदर्ये व्यापिलें, जणु दिव्यांबरें वेष्टिलें,
शुद्धप्रकाशें उजळलें; धूमहीन दशदिशा.
घुमट, गोपुरें, रंगशाला, देवमंदिरें गृहमाला,
शांत, स्थिर दिसती डोळां, नील निर्मल आकाशीं;
न कधीं वृक्ष पर्वत वनें, माखिलीं बालार्ककिरणें,
विलसे ऐशा तेजोधनें, भव्य नगरी प्रभातीं !
स्वैर वाहे ही तटिनी, शांत उदकें भरोनी,
निरखुनी उपजे माझ्या मनीं, अगाध शांति एधवां.
पौरजन निद्रिस्त सारे, तशीं तयांचीं मंदिरें;
जणु निश्चल निद्राभारें, हृदय हें एक विशाल. "

१ टॉमस् आ केम्पिस्

मिल्टन् कवीनें ह्या शहराविषयीं वरच्यामागखाच उल्लेख केला आहे. परंतु शहराचें नांव काढिल्याबरोबर रानावनांची आठवण होते, तेव्हां त्यांजकडे फिरून वळूं.

( श्लोक )

“ जें क्षुद्र पुष्प फुलतें गिरिकंदरांत;
जें मंजुगान पडतें श्रवणीं वनांत,
हा सूर्य, हें गगन, हीं क्षिति सर्व वाटे
कीं स्वर्गिचीं उघडलीं मजला कपाटें. ”

—ग्रे

वरील पद्यांत जी सृष्टचमत्कारप्रशंसा केली आहे, त्यांत कवीनें फुलांस पहिलें स्थान दिलें आहे. खरोखर पहातां, वनांची कल्पना मनांत आली असतां फुलें पहिल्या प्रथम डोळ्यांपुढें दिसूं लागतात.

“ [1]फुलें एकंदर मनुष्यमात्रांचे सुखाकरितांच निर्माण केलेलीं आहेत. मुलांस तीं आवडतात. शांत, सुंदर व नाजूक पुष्पांवर गरीब लोकहि प्रेम करितात. मिजासखोर व ऐषआरामांत लोळणारे, तीं तोडून आणून त्यांचा उपभोग घेतात. तशींच खेड्यापाड्यांतील व शहरांतील लोकांची फुलांवर भक्ति असते. ”

प्रत्येक ऋतूंत फुलणारीं निरनिराळीं फुलें आहेत. वसंत, ग्रीष्म व शरद् या ऋतूंत फुलें दृष्टीस पडतात. तशींच रानांत, कुरणांत, समुद्रतीरीं व पर्वतांवर उगवणारीं निरनिराळीं फुलें आहेत.

फुलांपासून नुसत्या डोळ्यांचें समाधान होतें असें नाहीं. त्यांपासून ज्ञान करून घेणारास ज्ञान, व बोध करून घेणा-

१ रस्किन्.

गम बोधहि प्राप्त होतो. फुलांचे रंग व आकार पाहून, हीं एकाद्या थोर उद्देशानें परमेश्वर उत्पन्न करितो. असे-हि मनास वाटतें.

जशीं फुलें मनोहर असतात, तशीच वृक्षवल्लींची पाल्वीहि रम्य असून तिजपासून सृष्टीस फार शोभा येते. बहुतेक मोठमोठ्या झाडांस फुलें मोठीं येत नाहींत. व जीं बारीक येतात तीं फार दिवस टिकत नाहींत; परंतु वृक्षांचीं पालवी महिनेच्यामहिने त्यांस शोभिवंत करिते. प्रत्येक वृक्ष हें एक सुंदर चित्र आहे. हें म्हणणें त्यांचीं नांवें घेतल्याबरोबर खोटें वाटत नाहीं.

( ओव्या )

" देखे महा प्रचंड गिरि, विशाल पर्वतांचिया दरी,
जळें तुंबलीं भरिता पुरी, समुद्रतुल्य अगाध;
तेथ आम्र निंबोळ बेल, कवठ कदंब मधुपिंपळ,
शिरस पळाश विशाल, न्यग्रोधवृक्ष वाढले;
ताळ हिंताळ शाल सरळ, मंदार कांचन तमाल निर्मळ,
पिचुमंद देवदार धवल, अर्जुनवृक्ष अपार;
खदिर कंटकी हिवर सवंदडे, हिरडे हिंगण ब्याहडे कुडे,
आंवळे पाचुडे कंकाकडे, करंज पांगारे चौंफेरी;
वेणु कळक चिंचिया जाळीं, औदुंबर फळले सुगंध फळीं,
तोरणें लागलीं घोसाळीं. खिरणिया टेंबुरणी पिंपरी;
बदरी श्लेष्मातकी आंवळी, शाल्मली करवंदी जांबळी,
चारी भल्लातकी गुग्गुळी, शमी वेरुकळी चिंचणिका;
ऐशिया वृक्षांचा अचाट, डोंगीं लागली घनदाट,
माजीं निर्झरोदकाचे पाट, सैरावैरा धांवती."

—मुक्तेश्वर

वसंत ऋतूंत आम्रवृक्षाची शोभा फारच रमणीय अ-

सते. हिरवीगर्द पाल्वी, प्रत्येक ल्हानमोठ्या शाखेचा शेवट मोहोराच्या भरदार तुऱ्यांनीं प्रफुल्लित झालेला व एकंदर वृक्षाचा गोंडस आकार, हें पाहून व मोहोराच्या सुवासाचा उपभोग घेऊन, कोणास कौतुक वाटत नाहीं? नारळीचा वृक्ष तर मोठा चमत्कारिक आहे. ह्या वृक्षाचा पाल्वीरहित सोट उंच गेलेला असतो व त्यावर चवरीसारखा पानांचा झुपका असून फांद्यांचे बुडख्यांशीं नारळांचीं तोरणें लटकलेलीं असतात. ह्या वृक्षाचे वनांत गेलें असतां त्यांच्या छायेनें मनुष्यास अत्यंत समाधान होतें. बकुळीचा मोठा विस्तार, सुवासिक फुलें व तांबडीं सुंदर फळें. तसेंच अशोकाची कातर पडलेल्या पानांची दाट पाल्वी. पिंपरी आणि वड यांची पांथस्थांस व इतरांस सुखकर छाया. पिंपळाचा विशाल विस्तार. केळींचीं थोरलीं लांब पानें व केळफुलें. सोनचांफ्याचीं सोन्यासारखीं पिवळीं व सुवासिक पुष्पें. इत्यादिकांची शोभा पाहून सर्वांस आनंद होतो तो यथार्थ होय. मोठीं झाडें जशीं शोभिवंत असतात, तशाच ल्हान वेली व वनस्पतिहि डोळ्यांस समाधानकारक असतात.

थंड प्रदेशांतील अरण्यें ग्रीष्म ऋतूंत फार शोभायमान् दिसतात. परंतु हिंवाळ्यांत तेथील झाडांचीं पानें जेव्हां झडून फांद्या मोकळ्या सडसडीत होतात व बर्फ पडून त्या रुप्यासारख्या चमकतात. त्या वेळीं हीं वनेंरानें एक प्रकारचीं शोभिवंत असतात. उष्णकटिबंधांतील अरण्याचें वैभव याहून भिन्न असतें. "तीं[1] पाहिल्यानें चित्तवृत्ति भयभीत होऊन गोंधळून जाते. झाडांचीं खोडें

१ किंग्स्ले

सरळ व उंच गेलेलीं असतात. परंतु त्यांस बऱ्याच उं-
चीपर्यंत फांदी किंवा पालवी मुळींच नसते. म्हणून तीं
अरण्यें मोकळीं व उघडीं भासतात. ब्रझील देशांतल्या
अरण्यांतील झाडें फार उंच वाढतात. त्यांची पालवी सु-
मारें शंभर फूट उंचीवर अखंड मेघडंबरीसारखी पसर-
लेली असते. या अरण्यांतलें सर्वकांहीं, सूर्यप्रकाशप्राप्ती-
च्या इच्छेनें वर चढून जात आहेसें दिसतें. चतुष्पाद
ही वर चढून जातात. पक्षी व सरपटणारे प्राणीहि त-
लीं वर जात असतात. परंतु ह्या अरण्यांत वर जाऊन
वर वृक्षांस आलिंगन देणाऱ्या वेलींच्या जाती इतक्या
विविध असतात कीं, तितक्या आपल्या पाहण्यांत कधीं-
हि येत नाहींत."

कित्येक रानटी लोक झाडांस देवता मानून त्यांची पू-
जा करितात. यांत कांहीं आश्चर्य नाहीं. कारण आपण
एकटे एकाद्या अरण्यांत गेलों असतां जर एकादें झाड
आपल्याशीं बोलूं लागलें, तर आपणास त्याचें आश्चर्य न
वाटतां कौतुकच वाटेल, व आनंदहि होईल. दिवसां एका-
द्या घोर अरण्यांत गेलें असतां तेथें एकप्रकारचें भयहि वाटतें.

जेथें पालवी दृष्टीस पडते तेथें. कोठें तरी पाणी ठेवि-
लेलेंच आहे. कोणताहि देखावा घ्या, त्यांत कोठें नदी,
सरोवर, झरा वगैरे नसल्यास तो जितका सुंदर दिसावा
तितका दिसत नाहीं. पाण्याचे ढग आकाशास सुशोभित
करितात. नद्या, निर्झर, झरे व सरोवरें यांस आपले पूर्व-
ज देवता मानीत असत. सकाळच्या धुक्यांत, सरोवरां-
त, झळकणाऱ्या व वाहणाऱ्या नदींत, डबक्यांत व वि-
स्तीर्ण सागरांत पाणी शोभायमान दिसतें. पाणी वनस्प-

तीचें जीवन होय. त्यामुळें मैदानें हिरवीं होतात व पर्वतांवर बर्फ पडतें. पाण्यामुळें पर्वतांचे खडक कांतून कोरले जातात व त्यांत मोठमोठ्या दऱ्या बनतात.

जसा वनस्पतीवर पाण्याचा परिणाम होतो, तसाच मनुष्यावर होतो. काम करितां करितां थकून गेल्यावर सरोवराच्या अगर नदीच्या कांठीं. अगर समुद्रकिनाऱ्यावर आपण विश्रांति घेतली. तर आराम व आनंद वा तसेंच. स्वच्छ हवा, पाण्यावर किरणांची चमक, वि वंटावर लोटणाऱ्या पाण्याच्या लाटा वगैरे पाहून व फारच हुशारी येते.

इंग्रज लोकांस जसा समुद्र प्रिय वाटतो, तसा दुसऱ्या लोकांस वाटत असेल कीं नाहीं, याची शंका आहे. आकाशापेक्षांहि समुद्र विशेष स्वेच्छाचारी व ऐश्वर्यवान् भासतो. समुद्रकिनारा तर अनंत प्राण्यांनीं व गवतानें गच्च भरलेला असतो. यांपैकीं कित्येक प्राणी भरतीची वाट पहात असतात, व कित्येक खोल पाण्यांतून लाटांनीं किनाऱ्यावर झुगारून दिलेले असतात. एथे उभें राहिलें असतां, समुद्राच्या सन्निध राहणाऱ्या पक्ष्यांचें भेसूर ओरडणें कानीं पडतें व श्वासोच्छ्वास घेत असतांना, तो आपल्या शरीरास हितकर होत आहे व त्यापासून आपणास हुशारी व उमेद येत आहे, असें मनास वाटतें. ह्या सर्व गोष्टींचा विचार केला तर, समुद्राचा आपणावर जो महत् उपकार होत असतो त्याचें महत्त्व आपल्या मनांत ठसेल.

समुद्राचें रूप नेहमीं बदलत असतें. एकाद्या सामान्य दिवशीं समुद्राचें रूप एकाद्या ठिकाणीं सकाळपासून संध्याकाळपर्यंत पाहिलें, तर त्यांत अनंत फेरबदल झा-

त्याचें आढळून येईल. कल्पना करा कीं, समुद्रकिनाऱ्यावर आपलें घर आहे व तेथें बसून खिडकींतून आपण पाहत आहों; खिडकीखालीं लहानसें मैदान आहे, पलीकडे जमीन खोल होत गेली असून पुढें समुद्रविस्तार आहे. समोर समुद्रांत एक कोसाच्या अंतरावर पिंवळ्या वाळूनें सुशोभित झालेल्या टेंकड्या आहेत. एकादे दिवशीं प्रातःकाळीं पहावें. तर सूर्य उदयास येत आहे, व त्याचीं झळझळीत किरणें शांत समुद्रावर पडून आपल्या खोलींतहि शिरलीं आहेत. असें दृष्टीस पडतें. जसजसा सूर्य वर येतो, तसतसा सर्व समुद्रविस्तार प्रकाशानें झळकूं लागतो व त्यांतील टेंकड्या गर्दनिळ्या धुक्यानें वेष्टून जातात. नऊ वाजण्याचे सुमारास समुद्राचा रंग फिका पडत जातो, वर आकाश निळें दिसतें व मधून मधून त्यांत पिंजलेल्या शुभ्र कापसाप्रमाणें ढग आढळतात. समोरील खडकाच्या उतरणीवरील शेतें, रानें, दगडांच्या खाणी व खडकांच्या थरांच्या रेषा दिसूं लागतात. तथापि त्या खडकांचे तुटलेले कडे छायेंत असून त्यांच्या मागें एकापुढें एक अशा उभ्या ठाकलेल्या टेंकड्या अंतराच्या प्रमाणानें मंदमंद दिसतात. जसजशी दुपारची वेळ होत जाते, तसतसा समुद्राचा रंग निळा दिसूं लागतो व समोरील किनाऱ्यावर छायामय वनें, हिरवीं कुरणें आणि पिंवळीं शेतें स्पष्ट दिसूं लागतात; कड्यांचे निरनिराळे भागहि हळूहळू व्यक्त होतात. आणि कोळ्यांच्या होड्या व काळीं शिडें नजरेस येतात.

जसजसा सूर्य वर येतो, तसतसा समोरच्या कड्याखालचा किनारा पिंवळा भासावयास लागतो; समुद्राचा

रंग पालटतो; त्याच्या उथळ भागांतलें पाणी निळेंहिरवें दिसतें, व खोल भाग तांबडानिळा दिसूं लागतो.

हें समुद्राचें रूप फार वेळ टिकत नाहीं. एकाएकीं आकाशांत वादळाचीं चिन्हें दिसूं लागतात; वारें सोंसाट्यानें वाहतें; वृक्षपालवीवर पावसाचे थेंब टप्‌टप् वाजूं लागतात व समोरील किनारा जणुकाय वादळास भिऊन, कोठे तरी लपतो आहे, असा त्याचा संकोच झालेला भासतो. समुद्र काळा होऊन खवळतो. आतां वादळ संपलें आहे, ढग वितळत आहेत, पाऊस थांबला आहे, फिरून ऊन्ह पडलें आहे व समोरील टेंकड्या व्यक्त दिसत आहेत. या टेंकड्यांवर आतां नुसतीं शेतें व रानेंच दिसतात असें नाहीं, तर त्यांवरील प्रकाश आणि छाया स्पष्ट दिसत आहेत; आकाश स्वच्छ झालें आहे, सूर्य पश्चिमेकडे उतरत आहे, आणि समुद्राचा रंग जिकडे पहावें तिकडे एकसारखा सुंदर निळा बनला आहे; परंतु लागलींच तोच रंग जवळ फिकटनिळा दिसतो, व दूरच्या समुद्रावर तांबडानिळा व्हावयास लागतो. पुन्हां आकाशांत ढग जमावयास लागले म्हणजे तोच समुद्र चकचकीत निळा होतो. जसा सूर्य पश्चिमेकडे जातो, तसा समोरील टेंकडयांत फेरबदल होतो. त्या पूर्वींच्याच टेंकडया आहेत कीं नाहींत याची भ्रांति पडते. त्यांचा जो भाग पूर्वीं उन्हांत होता त्याजवर आतां छाया पडली आहे, व जो पूर्वीं छायेंत होता तो प्रकाशमय झाला आहे. समुद्र फिरून गर्दनिळा दिसावयास लागला आहे, आणि सूर्यास्ताचे सुमारास तो फिकट होऊन, ज्या कडयांवर सूर्यास्ताचीं किरणें पडलीं आहेत, त्यांचा गर्द रंग जाऊन

कित्येक ठिकाणीं ते चुन्यासारखे पांढरे फटफटीत झाले आहेत. पुन्हां सूर्यास्तानंतर ते कडे सोन्यासारख्या प्रकाशानें क्षणभर उज्ज्वल होऊन समुद्राचा रंग मंद करडा होतो. लवकरच रात्रीच्या छायेनें हेच कडे, रानें, शेतें व कुरणें दृष्टीआड झाल्यासारखीं होतात.

वर वर्णन केलेल्या समुद्राच्या रूपांतील फेरबदल, एका दिवसांत होणाऱ्या एकंदर फेरबदलाचा थोडाच अंश आहे असें म्हटलें तरी चालेल. आज जसा समुद्र दिसतो तसाच उद्यां दिसेल असा नियम नाहीं. कधींकधीं त्याजवर धुकें पसरून तो दृष्टीआड होतो. जो समुद्र आज शांत व स्थिर दिसतो. तोच उद्यां तुफान होतो.

जसा दिवसाच्या रूपांत फेरबदल होतो, तसा रात्रीच्याहि रूपांत होत असतो. कधींकधीं रात्रीं गाढ अंधकार पडलेला असतो, कधीं कधीं ती अनंत प्रकाशमय ग्रहांनीं प्रसन्न झालेली असते, व कधींकधीं, ज्या चंद्राच्या कला नेहमीं चढत उतरत असतात, त्या चंद्राच्या प्रकाशानें ती जणुकाय नाहून माखून निघते.

सरोवरें जरी समुद्राइतकीं भव्य नसतात, तरी तीं कित्येक दृष्टीनें समुद्राहून अधिक मनोहर असतात. समुद्राचा किनारा बहुतकरून खुला व उघडा असतो. तोच सरोवराचा कांठ हिरव्यागार व दाट पालवीनें आच्छादित असून, ती पालवी पाण्यापर्यंत पोंचलेली असते. कधींकधीं तर वृक्षांच्या फांद्या पाण्यावर लोंबत असतात. ह्या सरोवरांत कोठे कोठे हिरवीं बेटेंहि असतात. कधीं कधीं त्या सरोवरांच्या किनाऱ्यावर हिरवीं कुरणें, व जणुकाय खोल पाण्यांतून बाहेर निघून तटस्थ उभे राहिले आहेत अ-

से खडकांचे सुळके ठिकठिकाणीं असतात. कधीं कधीं ह्या सरोवरांच्या शांत व उज्ज्वल पृष्ठभागावर मंद लहरी उत्पन्न होऊन त्यांची त्या पाण्यावर एक जाळीच पसरलेली असते, अथवा कधीं कधीं त्या पाण्यांत किनाऱ्यावरील देखाव्याचें उलटें प्रतिबिंब क्षणभर दिसतें.

पाण्यामुळेंच आश्चर्यमुक्त इंद्रधनुष्याची उत्पत्ति होते. इंद्रधनुष्यास देवदूताची उपमा दिली असतां चालेल. त्याचें साम्य या जगांत कोणत्याहि वस्तूस येत नाहीं व तें इहलोकचा चमत्कार आहे असें वाटत नाहीं.

या पृथ्वींत पुष्कळ पदार्थांस निरनिराळे रंग असतात, परंतु इंद्रधनुष्य हें सर्व रंगांचा एक अवतारच आहे असें म्हणण्यास चिंता नाहीं.

( श्लोक )

" आरंभीं रमणीय इंद्रधनु तें आरक्त रंगें सजे,
नारिंगी, मग शुद्ध पीत विलसे, पाहूनि दृष्टी रिझे,
पाचू नंतर दिव्य वर्ण निवटे, कांती वहू निर्मल,
अंतीं रम्य सुनील, शांत उजळे; ऐसें धनू उज्वल. "

—टाम्सन्

आपणांस रंगांचें जें ज्ञान होतें त्याचें महत्त्व आपण जितकें उमजावें, तितकें उमजत नाहीं. तें नसतें तर कदाचित् छाया, आकार आणि प्रकाश यांच्या साहाय्यानें निरनिराळे पदार्थ आपणांस ओळखूं आले असते. रंगांचें ज्ञान आपणांस कसें होतें, हें समजणें फार कठिण आहे; तथापि ज्या वेळेस आपण सौंदर्य म्हणजे काय असा आपणास प्रश्न करितों, त्या वेळेस स्वभावतःच आपल्या मनांत निरनिराळ्या रंगांचे पक्षी आणि पतंग, फुलें आ-

णि शिंपा, मौल्यवान् रत्नें, आकाश आणि इंद्रधनुष्य या चमत्कारांच्या कल्पना येतात.

आपल्या माथ्यांत जें एक ज्ञानेंद्रिय आहे, तें नसतें तर जगतांत ध्वनि म्हणून जेवढा पदार्थ आहे. तेवढा आपणास नाहींसा झाला असता व सृष्टींतील अनेक सुस्वर.मन लुब्ध करून टाकणारें संगीत व मित्रांची वाणी, या सर्वांस आपण अंतरलों असतों. जें आपल्या डोळ्याचें बुबूळ, कागदाहून अधिक जाड अथवा बोटाच्या नखाहून अधिक मोठें नाहीं, त्यांत जर यत्किंचित् फरक केला असता, तर या सुंदर जगताचें ऐश्वर्य. त्यांतील पदार्थांचे विविध व मनोहर थाट व डौल, रंगांची चमक व क्रीडा, नानाविध देखाव्यांचें वैचित्र्य, तशींच रानें आणि शेतें. सरोवरें आणि टेंकड्या, समुद्र आणि पर्वत व दिवसारात्रीं दिसणारें आकाशाचें सौंदर्य. ह्या सर्व शोभेस आपण मुकलों असतों.

पर्वतांकडे पाहिलें असतां. ते तर "मनुष्याकरितांच परमेश्वरानें निर्माण केले आहेत असें दिसतें. ते त्याच्या बोधाकरितां शाळा, भक्तीकरितां देवालयें, ज्ञानेच्छूंच्या करितां ज्ञान संपादन करण्याचीं स्थळें, मनन करणारांस शांत व एकांत असे मठ व परमेश्वराराधना करणारांस अत्यंत पवित्र देवमंदिरें होत." पर्वत हे "या पृथ्वीवरील प्रचंड देवालयें आहेत. खडक हीं या देवालयांचीं द्वारें, ढग हीं तक्तपोशी, कड्यांवरून उड्या घेणाऱ्या प्रवाहांची गर्जना हें त्यांतील कीर्तन आणि नामगजर, बर्फ हीं स्थंडिलें व अनंत ताराररत्नांनीं खचित निळें आकाश ही मेघडंबरी होय."

१ रस्किन्.

( श्लोक )

“ ईशें विश्व विशालमंदिर पहा ऐसें करें निर्मिलें !
शोभा दाखविण्यास हेर रुचिरीं द्वारीं उभे ठाकले.
येतां प्रेक्षक जे तयांस बघुनी ते बाहतां सत्वरीं:–
याहो, या जनहो, विलोचनसुखा घ्या; या शिरा मंदिरीं.”

**—कुसुमांजली**

या पृथ्वीवरची नजर काढून जर वर पाहिलें तर, ह्या निळ्या आकाशाचें सौंदर्यरूप चेटूक कोणाच्या मनास भुलवून सोडीत नाहीं ? आकाशांत एकादा ढग वरवर चढत असला, तर तो स्वर्गी जात आहे असें कोणास बरें वाटत नाहीं ?

“ ज्या वेळेस आपलें मन उदास व विरस होऊन आपणास चैन पडत नाहींसें होतें, त्या वेळेस तें सुप्रसन्न होण्यासाठीं आकाशाकडे पाहिलें, तर तेथे घडणाऱ्या चमत्कारांचें कौतुक आपणांपैकीं पुष्कळांस वाटणार नाहीं. एकजण म्हणेल आज पाऊस पडून सर्व कांहीं ओलेंचिब झालें आहे; दुसरा म्हणेल आज वारें फार सुटलें आहे. तिसरा म्हणेल आज फार उकडत आहे. परंतु आदल्या दिवशीं दुपारीं ह्याच आकाशांत ज्या उंच व शुभ्र ढगांच्या माला व त्यांत पर्वतप्राय दिसणारे कडे व आकृति सर्व क्षितिजावर पसरल्या होत्या, त्यांचें ह्या अरसिक लोकांपैकीं एकास तरी आश्चर्य वाटलें होतें काय ? दक्षिणेकडून एक चिंचोळें बिंब येऊन ह्याच पर्वतप्राय ढगांवर येऊन पडलें; त्यासरसे ते ढग वितळून जलबिंदुरूपानें पृथ्वीवर उतरले, हा चमत्कार कोणी सांगू शकेल काय ? सूर्यास्तानंतर पश्चिमेकडील वायूनें, वाळलेल्या पानांप्रमाणें जेव्हां ढगांस उडवून दिलें, तेव्हां निस्तेज झालेल्या

ढगांचें तांडव कोणीं पाहिलें असेल काय? असे चमत्कार आकाशांत नेहमीं होतात. परंतु त्यांजकडे कोणी पहात नाहीं व ते नाहींसे झाले म्हणजे त्यांबद्दल कोणास वाईटहि वाटत नाहीं; अथवा एकादे वेळेस अशा अरसिक लोकांनीं आकाशाकडे लक्षपूर्वक पाहिलेंच तर फक्त एकादा स्थूल अथवा अलौकिक चमत्कारच त्यांचे लक्षांत येतो; बाकी सर्व बारीकसारीक चमत्कारांकडे त्यांचें दुर्लक्ष होतें. पण त्यांस असें समजत नाहीं, कीं पंचतत्त्वांच्या अत्यंत भयंकर आणि भेसूर झगड्यांत अथवा गारांच्या वर्षावांत अगर वाऱ्याच्या तडाक्यांत ह्या सृष्टीनें उदात्त व महान् सौंदर्य नेहमींच प्रकट होतें असें नाहीं.

मध्याह्नाचे सुमारास हा आकाशाचा निळा घुमट व त्यावर पसरलेले अखंड व विचित्र ढग, हे जरी अत्यंत मनोहर असले तरी मनुष्याचे मनास नुसते ते पाहून पूर्ण समाधान होत नाहीं. "तो[1] नेहमीं सूर्यास्त व सूर्योदयाचे वेळीं जे विविध रंग व निळ्या आकाशांत विशाल दीपामाळेप्रमाणें देदीप्यमान् व आरक्त ढग दृष्टीस पडतात ते पहाण्याची इच्छा करितो."

संध्याकाळचे आकाशांतील रंग लवकरच नाहींसे होऊन रात्र झाली म्हणजे तर आकाशाची शोभा अवर्णनीय असते.

( श्लोक )

" ह्या तारा निघती प्रदीप गगनीं, रत्नापरी शोभती,
शुक्रासी अधिपत्व देउनि तयामागें पहा चालती;

१ रस्किन्.

अंतीं, अंबुदवैभवा त्यजुनिया, इंदु स्वयें डोलतो,
ह्या लोकां निज चंद्रिका पसरुनी रौप्यांवरें वेष्टितो. "

—मिल्टन्

ज्या रात्रीं आकाश शांत व स्वच्छ असून, तारा उज्ज्वल प्रकाशतात, ती रात्र फार आल्हादकारक आहे असें आपण म्हणतों; परंतु अशा एकाद्या रात्रीं सृष्टीनें आपलें भयंकर रूप प्रकट केलें, व आकाशांत अथवा "पर्वतांत ह्या कड्यावरून त्या कड्यावर दिव्य विद्युल्लता नाचूं लागून घोर मेघगर्जना व्हावयास लागल्या" म्हणजे तो देखावा अत्यंत भव्य असतो. आकाशांतील ढग व रंग हे जरी चित्तवेधक असले, तरी तेवढ्यानेंच त्याचें सर्व सौंदर्य प्रकट झालें असें नाहीं. तारांकडे पहा; तारांचे रूपानें अनंत परमेश्वराचें स्वरूप आपल्या डोळ्यांस सदैव दिसतें.

( श्लोकचरण )

" आहे मूर्ति अनंत ही ! स्मरवितें मूर्ति प्रभूची प्रिया ! "

—कुसुमांजलि

तारा जरी अत्यंत प्रचंड व अत्यंत दूर आहेत, तरी ग्रीष्म ऋतूंत एकाद्या सौम्य रात्रीं " आपल्या आत्म्याशीं हितगुज करण्यासाठीं सन्निध येऊन त्यांनीं आपल्या माना लववल्या आहेत असें भासतें. "

सेनेका म्हणतो कीं, जो म्हणून लक्षपूर्वक आकाशाकडे पाहील, त्यास कोट्यवधि देदीप्यमान तारा, त्यांच्या गति व त्यांचें भ्रमण पाहून कौतुक वाटेल व त्याचे ठिकाणीं परमेश्वराविषयीं पूज्यबुद्धिहि उत्पन्न होईल.

ज्या वेळेस आपण तारांकडे पहातों, त्या वेळेस त्या शांत व स्थिर दिसतात; परंतु मनुष्याच्यानें कल्पना सुद्धां

१ बायरन् २ सिमोंड्स

करवणार नाहीं अशा वेगानें त्या त्या वेळेस आकाशांतून भ्रमण करीत असतात, हा चमत्कार आपल्या स्वप्नींहि येत नाहीं.

आकाशांत दहा कोटींहून अधिक तारा आहेत; शिवाय कित्येक ग्रहांस उपग्रह आहेत ते निराळेच. एवढ्यानेंहि आलें नाहीं. ज्यांचा प्रकाश हल्लीं नष्ट झाला आहे असे अनेक गोल आकाशांत आहेत. ते पूर्वी आपल्या सूर्यासारखे उज्ज्वल व प्रकाशमय होते. परंतु आतां निस्तेज आणि थंड पडले आहेत. आपला सूर्य देखील सुमारें एक कोटी सत्तर लक्ष वर्षांनीं असाच निस्तेज होईल असा हेमहोल्ड यानें अजमास केला आहे. खेरीज आकाशांत जे धूमकेतु आहेत त्यांपैकीं जे दुर्बिणीशिवाय आपल्या डोळ्यांस थोडेच दिसतात. त्यांची संख्या तारांहून अधिक आहे. याशिवाय अनंत लहान लहान तारा आकाशांतून भ्रमण करीत असतात आणि मधून मधून त्या उल्कांचे रूपानें आपल्या नजरेस येतात.

तारांची अमर्याद संख्या पाहून मनुष्याची छाती दडपून जाते, परंतु त्यांचे विशाल आकार व एकमेकांमधील अंतरें पाहून त्याची काय गति होते हें पुसूंच नये. समुद्र हा इतका खोल व विस्तृत आहे कीं त्यास अनंत असें म्हणण्याचा प्रघात आहे तो कांहीं खोटा नाहीं; परंतु आकाशाशीं समुद्राची तुलना केली तर त्यापुढें त्याचा कांहींच पाड नाहीं. राक्षसप्राय गुरु व शनि या दोन्ही ग्रहांच्या मानानें ही पृथ्वी अगदींच लहान आहे. सूर्याशीं त्यांची तुलना केली तर ते अगदींच क्षुल्लक ठरतात. एकंदर सूर्यमालेशीं सूर्य लावून पाहिला तर तो

त्यापुढें कांहींच नाहीं असें सिद्ध होतें. सिरियस हा ग्रह सूर्याहून हजारों पट मोठा आहे व लक्षावधि पटीनें दूर आहे. ही सूर्यमाला आकाशाच्या एका लहानशा प्रदेशांत निरनिराळ्या जगतांमधून फिरत असते. ह्या सूर्यमालेभोंवतीं दुसऱ्या इतक्याच मोठ्या ग्रहमाला फिरत आहेत. परंतु एवढें ग्रहांचें ज्ञान आपणांस असूनहि विश्वाच्या मर्यादेचा यत्किंचितूहि थांग लागला आहे असें होत नाहीं. तारांत कित्येक तारा इतक्या दूर आहेत, कीं प्रकाशाचा वेग एका सेकंदांत एक लक्ष ऐंशीं हजार मैल असूनहि त्यांजवरील प्रकाश पृथ्वीवर येण्यास वर्षानुवर्षे लागतात. ह्या तारांच्या पलीकडेहि आणखी पुष्कळ ग्रह आहेत, परंतु ते अत्यंत दूर असल्यामुळें निरनिराळे दृष्टीस पडत नाहींत व मोठमोठ्या उत्तम दुर्बिणींतूनहि जरी पाहिलें तरी ते नुसते धुक्यासारखे दिसतात. निरनिराळ्या शास्त्रज्ञानानें, ह्या जगतांतील अत्यंत प्रचंड तसेच अत्यंत सूक्ष्म चमत्कार मनुष्यास दाखविले आहेत; परंतु त्या ज्ञानाचे योगानें जें सृष्टीचें अनंतरूप मनुष्याचे नजरेस आलें आहे, तेवढ्यानेंच जगताची मर्यादा समजली असें नाहीं. ज्यांच्या भव्यपणाची मनुष्याच्यानें कधींच कल्पना करवली नाहीं असे चमत्कार शास्त्रज्ञानानें उदयास आणिले आहेत हें खरें आहे; तथापि तेवढ्यानें सर्व जगताचें गूढ उलगडलें असें होत नाहीं. असें असूनहि हे चमत्कार चित्तवेधक व मनुष्याच्या आदंदप्रवाहाचे कधीं न अटणारे उगम होत. म्हणून त्या चमत्कारांचे उपभोगांत ह्या संसारांतील क्षुल्लक बाधा व दुःखें यांस मनुष्यानें कधींहि जुमानूं नये.

( श्लोक )

" गणावें दुःखानें स्थिर, अढळ, आनंदमग्नें,
तयांसंगें व्हावें दृढ, निवळ, उन्नीत मन तें;
तसें यावें त्यातें बल, सकल जें ताप निववी,
मनीं, ध्यानीं, अंतीं, स्थिरतर विवेका निपजवी. "

—डिव्हेरी

# प्रकरण १९

## संसारबाधा

ह्या जन्मांत आपणास पुष्कळ क्लेश, दुःख व उपव्याप होतो व ह्या उपाधींचे प्रकारहि बहुत असतात. कित्येक दुःखें, विशेषेंकरून जीं आपण आपल्या कृतीनें आपणावर ओढवून घेतों, तीं खरीं दुःखें असतात; परंतु कित्येक तर केवळ मिथ्या असतात. आपण जर त्यांस दाद दिली नाहीं, तर तीं आपल्या वेडगळ कल्पनेचा निवळ खेळ आहे असें आपणास आढळून येईल. मनुष्य दुःखाच्या प्रतिछायेस हरहमेष भिऊन आपलें मन उदास करून घेतो.

( अभंग )

"छाया देखोनी आपुली, शंका अंतरी वाटली;
ऐसें भ्रमाचें लक्षण, भुले आपणा आपण;
मुखें बोलतां उत्तर, तेथे आलें प्रत्युत्तर;
डोळां घालितां आंगुळी, एकाचीं तीं दोन झालीं;
पोटीं आपण कल्पिलें, तेंचि आलेंसें वाटलें;
दास म्हणे हे उपाधि, शंका धरितां अधिक बाधी."

संसारांतील कांहीं उपाधि जरी हानिकर असल्या, तरी त्या खऱ्या उपाधि नाहींत व कांहीं खऱ्या उपाधि असूनहि त्यांपासून आपली हानि होत नाहीं.

"ज्या वेळेस जगांतील उपव्यापानें मन उद्विग्न होतें, त्या वेळेस तें ताळ्यावर न रहातां, संकटरूपी खोल खड्डयांत उडी घेतें. मनुष्याच्या मनाचा नैसर्गिक धर्म

१ सिंथियस

अनंत सुख भोगण्याचा आहे. हा धर्म विसरून तें जर बाह्य जगांतील तापत्रयांत घुसूं लागलें, तर त्याच्या वांट्यास शोकाशिवाय दुसरें कांहींएक येणें नाहीं."

एपिक्टिटस म्हणत असे कीं, "अथेन्स नगर चांगलें आहे, परंतु सुख हें त्याहूनहि अधिक चांगलें आहे, म्हणून त्या नगरांत राहणें इष्ट नाहीं; कारण तेथे राहिल्यानें मनुष्याचे मनोविकार क्षोभतात व तो नगरवास त्याचे दुःखास कारण होतो."

आपण आपली अशी चित्तवृत्ति ठेवावी कीं,

(आर्या)

" भव गूढदुःख, तैसा भार जगाचा असह्य, जड भारी
ज्या चित्तवृत्तियोगें, होतो हलका अगम्य संसारीं."

—वर्डस्वर्थ

"अशी चित्तवृत्ति ठेविल्यानें, जसा अरिस्टायडीस देशत्यागाचा, आनॅक्स्यागोरास यास कारागृहाचा, सॉक्रेटिसास दारिद्र्याचा व फोशियन यास देहदंडाचा विषाद वाटला नाहीं. तसा अशा उपाधींचा आपणासहि वाटणार नाहीं; इतकेंच नाहीं, तर अशा प्राणसंकटीं आपणहि या सत्पुरुषांसारखेंच सद्गुणांपासून पराङ्मुख होणार नाहीं." सबब बाह्य गोष्टींवर अवलंबून रहाण्याचें आपणास प्रयोजन नाहीं: कारण,

(श्लोक)

" ज्यांचें निर्मल, शांत, शुद्ध मन त्यां पीडा करूनी बळें,
लोहाच्या जरि पंजरीं अडविलें, कारागृहीं कोंडिलें,
त्यांतें दुःसह बंधदुःख न शिवे, आनंदहानी न हो;

१ प्लूटार्क

मानीती निज आश्रमासमचि तीं दंडस्थळें चित्तिं. हो ! ”

—लव्हलेस

सुख हें आपल्या मनाचे ठिकाणीं आहे; बाहेर नाहीं. जसें मन मानील तसें मनुष्यास सुख अथवा दुःख होतें. शेक्सपिअरच्या हॅमलेट नाटकांत, जेव्हां नायकाची व रोझिनक्रांट ह्याची गांठ पडली, त्या वेळेस नायक त्यास म्हणतो कीं, “ बाबा रे, जग हा एक मोठा कारागृह असून, यांत पुष्कळ साच्या व अंधारकोठड्या आहेत; परंतु त्यांतील जी अत्यंत वाईट कोठडी, ती हा डेन्मार्क देश होय. ” हें भाषण रोझिनक्रांट यास मानवलें नाहीं, तेव्हां त्यास तो फिरून म्हणतो कीं “ हें जग तुला कारागृह असें वाटत नाहीं, तें बरोबर आहे; कारण, बरें-वाईट हें मानण्यावर आहे. मला तर बाबा तो एक तुरुंगच वाटतो. ”

मार्कस अरिलिअस म्हणतो कीं, “ सर्व गोष्टी अभिप्रायावर अवलंबून असतात. ज्या गोष्टीनें मनुष्य दुर्जन होत नाहीं, त्यानें त्याचा आयुष्यक्रम निंद्य काय म्हणून व्हावा ? दुर्जन आणि सज्जन या दोघांसहि मृत्यु येतो; कीर्ति अपकीर्ति, मान अपमान, दुःख आणि सुख हीं दोघांसहि सारखींच प्राप्त होतात; परंतु त्यांपासून दुर्जनाचा सज्जन होत नाहीं, किंवा सज्जनाचा दुर्जन होत नाहीं.”[1]

“ आपल्या मोठमोठ्या दुःखांची उत्पत्ति आपल्या मनांतच होते, म्हणूनच आपल्या महत्सुखाचा शोध त्याच ठिकाणीं केला पाहिजे. ”

**मन हेंच आपल्या सुखदुःखांचें कारण होय.**

१ टेलर

( श्लोकार्ध )

" मन एव मनुष्याणां कारणं बंधमोक्षयोः "

( अभंग )

" मन करा रे प्रसन्न, सर्व सिद्धींचें कारण;
मोक्ष अथवा भवबंधन, सुख समाधान इच्छा ते. "

—तुकाराम

पुढें काय घडणार, हें जेव्हां आपणास कळत नाहीं, तेव्हां येणाऱ्या संकटाचें स्वरूप मोठें वाटून आपण भयभीत होतों. ज्या वेळेस एकाद्या संकटाचें स्वरूप आपणास कळून चुकतें, त्या वेळेस त्याचें अर्धें भय नाहींसें होतें, म्हणूनच चोरांपेक्षां पिशाचांची आपणांस अधिक भीति वाटते; कारण भूतपिशाचांचें रूप, ठावठिकाण, शक्ति व चाळे यांचा आपणास मुळींच अजमास झालेला नसतो. पिशाचांची आपण विनाकारण भीति बाळगितों, हा निवळ अविचार होय. कारण जगांत पिशाचें जरी असलीं, तरी तीं आपणास काय म्हणून इजा करतील ? शिवाय, जे लोक आपण पिशाच पाहिलें आहे असें म्हणतात, त्यांचे सांगण्यांतहि, पिशाचानें आपणास झपाटलें असें कधींहि येत नाहीं.

ज्या संकटाचें साद्यंत स्वरूप आपणास समजत नाहीं, त्याच्या अस्पष्ट कल्पनेनें केवळ तें आपणास वाजवीपेक्षां फाजील भयंकर भासतें. ह्याच कल्पनेच्या आधारानें मिल्टननें मृत्यूचें स्वरूप किती भयंकर बनविलें आहे तें पहा ! " तेथे आह्मीं दुसरी एक आकृति पाहिली. तिला आकृति म्हणावी, तर तीस एकापासून एक निरनिराळे दिसतील असे अवयव, सांधे, अथवा इंद्रियें असें बिल-

कुल कांहीं नव्हतें. तिला एकादी मूर्तवस्तु म्हणावी, तर ती छाया भासत असे, व छाया म्हणावी तर मूर्तवस्तु वाटे. ह्या आकृतीचा रंग अमावास्येच्या काळोखासारखा होता. ती दहा राक्षसींसारखी भेसूर, व यमासारखी विक्राळ असून, एक भयंकर तीर हालवीत होती. जें आह्मांस तिचें डोकें म्हणून भासलें, त्यावर राजमुकुटासारखा मुकुट दिसत होता."

कित्येक प्रसंगीं रात्रीमुळें व अंधकारामुळें बऱ्याच गोष्टी अत्यंत भयंकर वाटतात.—

"ज्या वेळेस मनुष्यमात्रावर निद्रेचा अंमल बसतो, अशा एका प्रसंगीं मला एकाएकीं भीति वाटली. माझे हातपाय कांपूं लागले व माझी दांतखिळी बसली. इतक्यांत एक देवदूत मजपुढून जाऊं लागला. त्या वेळेस तर भीतीनें माझे केंस ताठ उभे राहिले. तो देवदूत मजपुढें उभाहि राहिला. परंतु मला त्याचा आकार स्पष्ट दिसेना; एवढें खरें कीं, माझ्या डोळ्यांपुढें एक मूर्ति उभी होती. जिकडे तिकडे सामसूम होतें. अशा स्थितींत मीं त्यास म्हणतांना ऐकलें कीं, नाशवंत मनुष्य हा परमेश्वरापेक्षां कधीं तरी अधिक न्यायी होईल काय?"[1]

आपण नेहमीं संकटांचें रूप शुष्क कल्पनेनें वाढवून मग त्यांजकडे पहातों. तेणेंकरून, खरोखर असतात त्यापेक्षां तीं संकटें अधिक दारुण भासतात. "कोणतेंहि संकट एकदां का क्षुल्लक भासलें, म्हणजे तें खरोखरीच क्षुद्र होतें. संकटानें आजपर्यंत मनुष्यमात्रास भेवडावलें मात्र आहे. संकट येतें आहे असें समजल्याबरोबर तें अ-

१ जॉब २ बेकन्

ध्यां वाटेंतच गांठण्याची आपण होऊन तयारी करावी; तें येईल असें म्हणून त्याची वाट पहात बसूं नये. कारण, अशी फार वेळ त्याची मार्गप्रतीक्षा करीत बसलों, तर आपणास झोंप लागण्याचा, म्हणजे त्याजविषयीं आपण बेफिकीर राहण्याचा संभव आहे."

दूरदृष्टीनें, येणारें संकट ताडणें, हा शहाणपणा होय; परंतु तें येण्यापूर्वीच त्याचें दुःख करीत बसणें यासारखा दुसरा मूर्खपणा नाहीं. कधीं कधीं जाणून बुजून किंवा न कळत आपलें पाऊल वांकडें पडून आपण आड मार्गानें जातों, पण असें आड मार्गानें गेल्यास पुन्हां सरळ मार्गास लागण्याचा संभव आहे कीं नाहीं? असा प्रश्न केल्यास, ज्ञाते ' होय ' म्हणून म्हणतात.

कुकर्मच जितकें टाळवेल, तितकें टाळावें; व जर मनुष्यानें कुकर्म केलेंच, तर त्यास त्याबद्दल दंडच होणें न्याय्य आहे.

स्वार्थ पाहणें हा एक आपल्या वर्तनांत मोठा दोष असून त्या योगानें एकंदर समाजाचे सुखास व्यत्यय येतो, असें लोक म्हणतात; परंतु हें म्हणणें सर्वथैव खरें नाहीं. कित्येक लोक स्वार्थ पाहतात, तेणेंकरून त्यांचा असा कांहीं वर्तनक्रम बनतो कीं, त्यांस स्वतःस सुख होत नाहीं तें नाहींच, परंतु दुसऱ्यासहि होत नाहीं. गेटी म्हणत असे कीं, प्रत्येक मनुष्यानें प्रथम स्वार्थ पहावा, व आपल्या सुखाविषयीं असें तत्पर असावें कीं त्यापासून अंतीं सर्व समाजास सुख होईल. ह्या म्हणण्यास अपवाद सांपडेल; परंतु खरोखर पाहतां, प्रत्येक मनुष्यानें जर नियत वर्तन ठेविलें, आपल्या शरीरसंपत्तीची

योग्य जोगवण करून आनंदवृत्ति राखिली, आपलें घर आनंदित केलें, ज्या क्षुल्लक निमित्तांवरून गृहसुखाचा वारंवार ऱ्हास होतो त्यांस कारण केलें नाहीं, आपला धंदा योग्य चालविला व नियमित वर्तन ठेवून आपली पत राखिली, तर अशा वर्तनक्रमास कदाचित् कोणी उदार म्हणणार नाहीं, परंतु त्यापासून त्याच्या कुटुंबास, आप्तवर्गास आणि मित्रांस सुखच होईल. परंतु " सर्व जगताचें जरी शोधन केलें, तरी ज्यांस आपलें हित समजतें अथवा समजून साधण्याचे जे परिश्रम करितात, असे लोक थोडेच आढळतील. "

दुष्कर्मानें कोणाहि मनुष्याचे सुखांत कधींहि भर पडावयाची नाहीं. हें तत्त्व जर सर्वांचे मनांत चिंबलें, तर मनुष्यमात्राचा मोठाच फायदा होईल. हें तत्त्व आपण नेहमीं लहान मुलांस लागू करितों. जें मूल लाडानें बिघडतें त्यास कधींहि सुख होत नाहीं; त्यास जर पहिल्याच अपराधाचें शासन झालें, तर पुढें त्याची सर्व हयात सुखांत जाते.

प्रत्येक मनुष्यास अनुकूल अशी एकादी देवता सुमार्ग दाखविण्यास सदैव तत्पर असते, असें म्हणण्याचा कित्येक लोकांत जो परिपाठ आहे, तो कांहीं खोटा नाहीं. कारण, आपला सदसद्विचार नेहमीं जागृत राहून, आपणावर पुढें गुदरणाऱ्या संकटाची तो पूर्वींच सूचना करीत असतो.

पुढील पद्यांत उल्लेख केल्याप्रमाणें, किरकीर करण्याकडे आपल्या मनाचा वारंवार कल होतो; परंतु असें गाऱ्हाणें गाणें हा निवळ अविचार आहे.

१ ड्रायडन्.

(ओंव्या)

" देवें दिधलीं या मना बुद्धि, विचार, चेतना,
भोगपात्रताआणि कल्पना, आंकळी जी अनंता;
ऐसें हें जीवित जरी, दुःखें व्यापिलें नानापरी,
कोण सांडोन मरणोदरीं, शून्यावस्था आदरील ? "

—मिल्टन्

आपण जन्मास आल्याचें खरें मर्म म्हटलें म्हणजे, आपणाण पुढें उत्तमलोकप्राप्ति होऊन आपली सद्गति व्हावी, व ती भोगण्याची पात्रता आपले अंगीं यावी, म्हणून ही जीवदशा योजिली आहे, असें कदाचित् कोणी म्हणेल; पण पुढील सुखोपभोगासाठीं ही जीवदशा जर पूर्वतयारी असेल, तर आपण ह्या जन्माचा काय म्हणून निषेध करावा? बेथेस्डा झऱ्याचें पाणी चांगलें ढवळल्याशिवाय आपले आरोग्यदायक गुण प्रकट करीत नाहीं, तद्वतच कित्येक लोक जन्मयातनेसारखे कष्ट झाल्याशिवाय आपल्या सद्गुणांचें अवलंबन करीत नाहींत.

" जीं[1] सुखसाधनें आपल्या हातीं आहेत, तीं तशीं हातीं नाहींत, अशी जर कल्पना केली, व मनुष्य दुखणाईत पडलें म्हणजे आरोग्याची, युद्धप्रसंगीं शांततेची, आणि मोठ्या नगरांत परकी आणि अप्रसिद्ध लोकांस कीर्तीची व मित्रांची कशी इच्छा होते व ह्या इष्ट गोष्टी साध्य होऊन नाहींतशा झाल्यास त्यांपासून कसें दुःसह दुःख होतें हें आपण ध्यानांत ठेवीत गेलों, तर आपणांस समाधानच होईल. कारण, अशा विचारानें हीं सुखसाधनें हातीं असतां तृणवत् वाटणार नाहींत, व त्यांस कारणपरत्वें जर आपण अंतरलों, तर तीं मौल्यवान् होतीं असें वा-

१ प्लूटार्क

दून तीं गेल्याचा शोकहि होणार नाहीं. जर आपण स्वतःच्या स्थितीकडे पाहिलें, अथवा ज्यांच्या पदरीं आपणाहूनहि अधिक दैना आहे त्यांजकडे लक्ष दिलें व आपणाहून अधिक संपन्न लोकांशीं आपणांस तोलून पाहिलें नाहीं, तर आपण सुखासमाधानानें राहूं. परंतु लोकांचा असा कांहीं विलक्षण स्वभाव आहे कीं, प्राप्त झालेल्या वैभवानें संतुष्ट न होतां, अधिक ऐश्वर्याची इच्छा करून, ते आपल्या जीवास असमाधान करून घेतात. पण बाबानों, असें न करितां, जेव्हां तुम्हीं एकादा धनशेट पालखींत बसून जातांना पहाल, तेव्हां थोडी खालीं दृष्टि करून, जे पालखी वहातात त्यांजकडे पहा !"

" एकदां लॅसिडीमान एथे, एक परस्थ गृहस्थ एका सणाचे दिवशीं छानछोक पोषाख करण्यांत अगदीं गर्क झालेला पाहून, डायोजनीज त्यास म्हणतो, कायहो ! आजच इतकी छानछोक करण्याची काय गरज आहे ? ज्ञानी लोक प्रत्येक दिवस हा सणच आहे असें मानीत नाहींत काय ? सारांश, ही जीवदशा आपल्या भावी सुखाची जर पूर्व तयारी असेल, तर आपलें मन नेहमीं शांत, स्थिर व आनंदी असलें पाहिजे. ह्या जीवदशेचें जर खरें रहस्य आपण ताडिलें, तर जें आहे त्याविषयीं आपण गाऱ्हाणें गाणार नाहीं, गतसुखाची आठवण करून परमेश्वराचे आभार मानूं, व साशंक न होतां, निर्भ्रान्तपणें आनंदानें व उमेदीनें भावी अवस्थेची मार्गप्रतीक्षा करीत बसूं."

१प्लूटार्क

" श्रमा अंती आराम, आणि युद्धा अंती विजय. "

—केम्पि

# प्रकरण २०

## श्रम आणि आराम

संसारबाधांमध्यें श्रमांची गणना केली पाहिजे असें नाहीं. कारण, आपण आपल्या शक्तीस सहन होतील इतके श्रम जर केले, तर त्यांपासून उत्तम सुखोत्पत्ति होते. जेव्हां आपण एकाद्या उद्योगांत गर्क होऊन जातों, तेव्हां आपला वेळ किती जलद जातो, हें सर्वांस माहीत आहे; तेंच आपण निकामी असलों, तर वेळ जातां जात नाहीं. उद्योगांत मन गुंतलें असतां काळजी व अल्पस्वल्प संसारबाधा आपण विसरून जातों. उद्योगी मनुष्यास दुःख करीत बसण्यास फुरसतच सांपडत नाहीं.

( अभंग )

" श्रमां अंतीं सुख ध्यावी, आनंदमनांची चवी;
दिनीं देह कष्टविला, रात्रीं निद्रे सुखावला;
कष्टें मिळवी आडका, देवाजीचा तो लाडका
तया सुखसमाधान, देव करी तोषें दान. "

—प्र

वरील म्हणणें. जे लोक शेतांत आणि कारखान्यांत कष्ट करीत असतात, त्यांस विशेष लागू पडतें. हे धंदे हलके आहेत खरे. परंतु त्यांच्या योगानें मनुष्याचे मनांत कीर्तीची अथवा महत्त्वाची त्याज्य अशी जी लालसा ती उत्पन्न न होतां, कर्तव्य केल्याचें समाधान आणि शरीरसंपत्ति त्यास प्राप्त होते. " एकाद्या व्यवहारधंद्यांत शिरण्यापूर्वीं भावी स्वमहत्त्व व मानधन यांच्या प्राप्तीची जी

१ इमरसन

तरुण लोक उमेद बाळगितात, ती सफल होण्यास श्रमानें त्यांस देह झिजविला पाहिजे व सत्याचें नेहमीं अवलंबन करून एकमेकांशीं सचोटीनें राहिलें पाहिजे." टांकीचे घाव सोसल्याशिवाय देवपण येत नाहीं.

प्राचीन काळीं लोक असें समजत असत कीं, ह्या संसारांत ज्या म्हणून इष्ट गोष्टी आहेत, त्यांचें मोल सोन्यानाण्यानें देवानें ठरविलें नाहीं; श्रम हेंच त्यांचें मोल. दीर्घप्रयत्नाचा गुण अलौकिक आहे हें आपण कबूल करितों; परंतु त्याचें आपणास नेहमीं विस्मरण होऊन आपण यत्नपराङ्मुख होतों. दीर्घयत्नाशिवाय मनुष्यास गत्यंतर नाहीं, असा सृष्टींतील कोळ्यासारखा यःकश्चित् प्राणी देखील बोध करीत असतो.

( श्लोक )

" अनिर्वेदोहि सततं सर्वार्थेषु प्रवर्तकः
करोति सफलं जंतोः कर्म यच्च करोति सः "

—**रामायण**

**भावार्थः**—कोणत्याहि कामीं प्रवृत्ति होण्याला मनाचा हिम्मत कारण आहे व हातीं धरलेल्या कामीं तीच सिद्धि देते.

आपण जर मोठी मेहनत घेऊन एकादा लेख लिहिला, तर तो वाचावयास सुलभ होतो. असें म्हणतात कीं, प्लेटोनें आपल्या प्रजासत्ताक नांवाच्या ग्रंथाचें पहिलें पान १३ दां लिहून काढिलें, व कार्लो मराटी ह्या चितान्यानें अन्टिनोअसचा चेहेरा ३०० वेळां काढिला तेव्हां तो त्याचे मनासारखा उतरला.

निरुद्योगी राहून शरीर व मन गंजूं देण्यापेक्षां उद्योगानें तें झिजलेलें फार चांगलें. " खिडकीच्या कंगोऱ्यावर

१ जेफ्रीज

जशी धूळ बसते, तसा एक प्रकारचा मळ आपल्या अं-तःकरणास जडून तें दूषित होतें. "

आजकाल मजूर लोकांस कांहीं विशेष अडचणी येतात खऱ्या; तरी एकंदरीनें त्यांची स्थिति फार चांगली आहे. हल्लीं त्यांचें रक्षण उत्तम प्रकारें होऊन, त्यांनीं निढळच्या घामानें मिळविलेलें फळ कोणी त्यांजपासून जबरीनें हिरावून घेईल असा संभव नाहीं.

श्रम जरी मनुष्यास हितकर असले, तरी ते वारंवार शक्तीबाहेर केले जातात; म्हणून ' आमचें जीवित असेंच का कष्टमय असणार ? ' असा बहुतेक प्रश्न करीत असतात.

सॉलमन म्हणतो कीं, " सर्व गोष्टी करण्याच्या निरनिराळ्या वेळा असतात, तशीच उद्योग करण्याची आणि खेळण्याचीहि वेळ असते. आपण जर मधूनमधून थोडेसें खेळलों, तर आपले हातून श्रम चांगले होतात व उद्योग केल्यानें मनुष्यास वेळहि फावतो. "

' मनुष्य मनांत आणील तर सर्व कांहीं करील ' अशी एक उत्तम म्हण आहे; परंतु नुसतें मनांत आणून उद्योग केला नाहीं, तर कांहीं फलप्राप्ति व्हावयाची नाहीं.

मनुष्य कोणत्याहि धंद्यांत पडो, त्यानें दुसऱ्यावर अवलंबून राहूं नये.

( श्लोक )

" यद्यत्परवशं कर्म तत्तद्यत्नेन वर्जयेत्,
यद्यदात्मवशं तु स्यात् तत्तत्सेवेत यत्नतः
सर्वं परवशं दुःखं सर्वमात्मवशं सुखं.
* * * * * * "

—मनु

**भावार्थः**—दुसऱ्यावर अवलंबून कोणत्याहि कामीं राहूं नये. आपल्या हिंमतीचे जोरावर नेहमीं कार्य करीत असावें. कारण, परावलंबन हें दुःख व स्वावलंबन हें सुख, असें म्हटलें आहे.

दुसरे लोक आपणास मदत करूं शकतील; परंतु आपणास सर्व भार स्वतःवरच ठेविला पाहिजे. कारण, आपलें हित दुसऱ्यास दिसत नाहीं; आपणास अनुकूल असलेल्या गोष्टींचा पूर्ण उपयोग करून घेणें झाल्यास स्वतःचेच विचारानें वागलें पाहिजे. आपल्या ठिकाणीं जो आत्मा आहे त्यास अनुसरलें तर आपले हेतु सद्वर्तन राहून उत्तम साधतात.

( श्लोक )

" सर्वमात्मनि संपश्येत्सदसच्च समाहितं
सर्वं ह्यात्मनि संपश्यन्नधर्मे कुरुते मनः "

—मनु

**भावार्थः**—या चराचरात्मक सृष्टीचें अवलोकन आत्म्याचे ठिकाणीं करावें, म्हणजे दुष्कृत्याकडे मनाची प्रवृत्ति होत नाहीं.

जर आपण मनापासून उद्योग केला, तर तो कधींहि वायां जात नाहीं. ह्या म्हणण्यांत व्याजोक्ति नाहीं. इसापनीतींतिल एका गोष्टींत सांगितल्याप्रमाणें, श्रम करूनहि यद्यपि शेतांत मौल्यवान् ठेवा आपणास सांपडला नाहीं, तथापि उत्तम पीक तरी आपल्या पदरांत पडलेंच पाहिजे.

सृष्टि मनुष्यास असा बोध करिते कीं, बाबारे, तुला नेहमीं मोलमजुरी मिळो अथवा न मिळो, नेहमीं उद्योग करीत जा म्हणजे झालें; त्याचे फलास तूं कधींहि अंतरणार नाहींस; तें तुला आपोआप मिळेल. तुझें काम नाजूक असो अथवा ओबडधोबड असो, तूं शेत पेर अथवा महाकाव्यें लिही, परंतु प्रामाणिकपणानें व तुझें मन तुला

शात्मिकी देईल अशा रीतीनें श्रम कर, म्हणजे तुझ्या शरीरास तसेंच मनास. निश्चयें सुख होईल: उद्योग करितां करितां जरी तुला वारंवार अपयश आलें, तरी असें मनांत आण. कीं शेवटीं यश हें ठेविलेलेंच आहे.

( श्लोक )

" नात्मानमवमन्येत पूर्वाभिरसमृद्धिभिः
आमृत्योः श्रियमन्विच्छेन्नैनां मन्येत दुर्लभां. "

-मनु

**भावार्थः**—पूर्वी यत्न केले असूनहि कार्यसिद्धि झाली नाहीं, एवढ्यावरूनच मी दुर्दैवी आहें असें, निराश होऊन आपली अवज्ञा करूं नको. मरेपर्यंत इष्टकार्याविषयीं प्रयत्न करीत असावें. कार्य होणार नाहीं असें कधींहि मानूं नये.

एकादें काम उत्तम वजाविल्यानें मनास जें समाधान होतें, तेंच त्याचें बक्षीस समज.

जे एकंदर व्यवहारांत दीर्घोद्योग करितात व त्यांत यश संपादितात. त्यांनीं या जन्मांत जेवढें म्हणून मिळवावयाचें आहे तेवढें मिळविलें असें होत नाहीं. अशा अत्यंत उद्योगी व यशस्वी लोकांस देखील इतकें करूनहि शेवटीं असेंच वाटतें कीं, " अद्यापि बहुत गोष्टी करावयाच्या असून, त्यांस आपण प्रारंभहि केला नाहीं; व पुष्कळ गोष्टी साध्य करून घेण्यासारख्या असून, त्या अद्यापि आपणास समजल्या देखील नाहींत; तेव्हां, केलें हें कांहींच नाहीं. "

" ऐकाद्या मानी राजाची, अथवा यशस्वी राज्यापहारी बंडखोराची, सेवा करण्यासारखें आपलें जीवित दीर्घ नाहीं; तसेंच मोठी संपत्ति मिळविण्यास, अथवा ए-

१ टेनिसन् २ टेलर

काद्या पोकळ दिमाख करणाऱ्या मूर्खांची थुंकी झेलून त्यास संतुष्ट करण्यास किंवा आपल्या सर्व हितशत्रूंचा फडशा उडविण्यास, आपलें जीवित अगदींच अल्प आहे; परंतु सद्गुण, नियतवर्तन, विनयभक्ति इत्यादि गुण संपादन करण्यास पुरेसा वेळ परमेश्वरानें आपणास दिला आहे."

आपल्या अस्तित्वास श्रमांची अत्यंत जरूरी आहे, हें तर निर्विवाद ठरलेलेंच आहे: फक्त ते कसे करावे एवढाच काय तो विचार उरतो. अशी एक जुनी म्हण आहे कीं, ज्यास काय काम करावें हें उमगत नाहीं, त्याच्याकरितां सैतान काम काढितो. तुर्क लोकांतहि असें म्हणण्याचा परिपाठ आहे कीं, आळशी मनुष्यास आपला अंकित करण्याकरितां सैतान त्यास भूल घालितो; परंतु आळशी मनुष्य आपण होऊन सैतानास आपलासा करून घेतो.

एकंदर इंग्रज लोकांनीं जें काम हातीं घेतलें व जो उद्योग आरंभिला, त्यांत त्यांस यशच येत गेलें. याचें मुख्य कारण त्यांचा दीर्घोद्योग होय. इतकेंच नाहीं; त्यांनीं विद्युल्लता, वाफ इत्यादि सृष्टींतील शक्तींचें आपणांस पूर्ण साहाय्य करून घेतलें आहे. इमरसन म्हणत असे कीं " पाण्याची वाफ हाच इंग्रज."

इंग्रज लोकांत जे मोठे जगद्विख्यात पुरुष होऊन गेले, ते अत्यंत उद्योगी असत. रॅले हा जबरदस्त श्रम करीत असे, असें एकानें म्हटलें आहे.

आजपर्यंत कधीं कोणीं स्थापिलें नाहीं असें विशाल साम्राज्य इंग्रज लोकांनीं स्थापन केलें आहे व या महान् पराक्रमाचा प्रत्येक इंग्रजास मोठा अभिमान वाटतो. इंग्र-

जांसारखे जगन्मोहांत गुंतून गेलेले लोक दुसरे कोठेहि आढळणार नाहींत. त्यांचें राज्य एवढें विस्तीर्ण आहे कीं त्यांनीं मनांत आणिलें तरी त्यांस या मोहांतून मुक्त होण्यास मार्ग नाहीं. परंतु त्यांनीं जर आपल्या अंमलाखालीं असलेल्या लोकांस सुविचारानें व न्यायानें वागवून त्यांचा उत्कर्ष केला. तर त्यांनीं संसारांत गुंग राहूनहि परमार्थ साधिलासें होईल.

काम करण्याचे निरनिराळे मार्ग आहेत: काम समजून जल्द केलें तर चांगलें. परंतु तेंच न समजतां घाईनें केलें तर त्यांत बिघाड होतो. तारा जशा घाई न करितां व न थांबतां भ्रमण करीत असतात, तसा आपण उद्योग करीत असावा.

उद्योग केल्यानें. विश्रांतीसारखें सुख भोगण्याचा आपणास हक्क येतो. श्रम करण्यास उमेद यावी. म्हणून विश्रांति घेतली पाहिजे व विश्रांतीचा योग्य उपभोग घेतां यावा म्हणून श्रम केले पाहिजेत.

"परंतु आपली विश्रांति धोंड्याच्या स्थिरतेसारखी न होऊं देण्याविषयीं आपण झटलें पाहिजे. जोंपर्यंत पाण्याच्या लोटानें अथवा विद्युल्लतेच्या तडाक्यानें हे धोंडे इकडून तिकडे उगारून दिले जातात. तोंपर्यंत ते आपलें वैभव कायम ठेवितात; परंतु तेच पाण्याचे लोट शांत व स्तब्ध झाले आणि वादळ संपलें, म्हणजे ह्या धोंड्यांवर गवत व शेवाळ वाढून कृमिकीटक ते खातात, व शेवटीं नांगरले जाऊन धुळीस मिळतात." वाघ हा पराक्रम करून एकाद्या दरींत सावधपणें विश्रांति घेतो, ती खरी विश्रां-

१ रस्किन्

ति होय; परंतु ठाणबंदी बैलाची खरी विश्रांति नाहीं.

आपण आपली पराकाष्ठा करून उद्योग व श्रम केले म्हणजे निर्धास्त व शांतपणें फलाची वाट पहात बसावें. एपिक्टिटस म्हणतो कीं, "ज्यानें सर्व गोष्टींचें पूर्ण मनन केलें आहे, त्यास आनंदानें रहाण्यास, एकादा प्रतिबंध सहन करण्यास, जी गोष्ट घडणारीच आहे तिची शांतपणें वाट पहाण्यास व जी घडून चुकली आहे ती सोसण्यास कोणाची आडकाठी आहे ? दरिद्री असूनहि आनंदानें कसें रहावें हें मी तुम्हांस दाखवितों. माझे हातीं सत्ता असावी अशी का तुमची इच्छा आहे ? मला जर सत्ता प्राप्त झाली, तर तिच्यामागें ठेवलेली दगदग, यातायात व प्राणसंकट यांचाहि मी आनंदानें आदर करीन. मला जरी उद्यां देशपार केलें, व पृथ्वीवर भटकत फिरण्याचा मजवर प्रसंग आला, तरी जेथें मी जाईन, तेथें माझ्या समाधानांत यत्किंचित् सुद्धां उणें पडणार नाहीं."

रस्किननें आपल्या देशबंधूंविषयीं असें म्हटलें आहे कीं, "आमच्या लोकांस कांहीं ना कांहीं तरी नेहमीं हवें असतेंच. कोणास पार्लमेंट सभेंत आपला शिरकाव व्हावा म्हणून लोकमतें, कोणास स्वातंत्र्य, कोणास करमणूक व कोणास पैसा, अशा प्रकारें निरनिराळ्या लोकांस निरनिराळ्या गोष्टींची अपेक्षा असते. परंतु आपल्यास शांति पाहिजे असें एकासहि वाटत अथवा समजत नाहीं. ही शांति संपादण्याचे दोन मार्ग आहेत. त्यांपैकीं एक अगदीं तुमच्या स्वाधीन आहे. तुम्ही आपलें मन सुखकर विचारांचें माहेरघर करून टाका. आपण आपल्या मनाचे ठिकाणीं रंगलों, तर त्या ठिकाणीं सुंदर कल्पनां-

चा उद्भव होऊन, काय मौज उडून जाते हें आपणांस अद्यापि कळून आलें नाहीं. आनंदमय तरंग, गतसुखाची आठवण, बोधपर इतिहास, ज्ञानपर म्हणी इत्यादि ठिकाणीं आपणांस आनंदानें रमतां येतें. ह्या कल्पनांचा चिंतेनें ऱ्हास होत नाहीं, दुःखानें बेरंग होत नाहीं व दारिद्र्य आपल्यापासून त्या हिरावून घेत नाहीं. ह्या हातांचे मदतीवांचून मनांत रचलेल्या कल्पनारूप मंदिरांत आपला आत्मा विलास करीत असतो."

सद्गुणांचें फल निर्वाण म्हणजे अनंत आराम होय, असें बुद्धधर्मी लोक मानितात. अश्मनेझर या राजानें आपले थडग्यावर पुढें दिलेला चित्तवेधक लेख लिहून ठेविला होताः—" मला अकालीं मरण आलें आहे; मी एकदां मोठा बलाढ्य होतों, आतां माझी वाचा खुंटली आहे; सारांश हा देवाचा पुत्र मरण पावला आहे. मी स्वतः आपल्याकरितां बांधिलेल्या या थडग्यांत विश्रांति घेत आहें. माझी सर्व राजांस व लोकांस अशी विनंति आहे कीं, कोणीं हें थडगें उघडूं नये; एथें कांहीं ठेवा सांपडेल अशा आशेनें हें धुंडाळूं नये, कारण एथें मजजवळ ठेवा मुळींच नाहीं. माझा विश्रांतीचा मंचक कोणीं घेऊन जाऊं नये, आणि मी आपल्या मंचकावर महानिद्रा घेत असतां कोणीं तिचा भंग करूं नये. जो कोणी माझें थडगें उघडील अथवा निद्रामंचक हलवील, अथवा माझा निद्राभंग करील, त्यास मरणानंतर कधींहि आराम मिळणार नाहीं व तो थडग्यांत पुरला जाणार नाहीं. त्याची संतति वांचणार नाहीं व त्यास मनुष्यमात्रांत मान

१ ग्रँट डफ

मिळणार नाहीं. जशीं वृक्षास खालीं पालें व वर फळें नसावीं, तद्वत् त्याची पृथ्वीवर संतति व्हाणार नाहीं. व स्वर्गी त्यास सुखप्राप्ति होणार नाहीं."

विश्रांतीचें खरें सुख काय आहे, हें उद्योगद्वेषी व आळशी ह्यास मुद्दलींच ठाउकें नसतें. उत्तम श्रम केल्यास शरीरास विश्रांति मिळते, इतकेंच नाहीं,पण मन शांत व सुप्रसन्न होतें. इहलोकीं. आपण मनापासून झटून सदाचरणानें वागलों, तर अंतीं उत्तम आराम मिळेल.

तारुण्यांत श्रमांची अपेक्षा करणें साहजिकच आहे; कारण त्या वयांत उद्योगापासून आनंद होऊन मनास उमेद येते. परंतु जसजसे आपण वृद्ध होतों, तसतशी विश्रांतीची आणि शांतीची हळूहळू इच्छा करूं लागतों.

( श्लोक )

" आला मृत्यु समीप, जीवित सरे, तेंशी भवाची कथा;
आतां जीव विराम जो अनुभवी, तो गोड, कीं अन्यथा !
हें जाणे जन एकला श्रमसुखा ज्यानें सदा चाखिलें;
अन्यातें उमजे न, जन्मभर जे उद्योगवैरी खुळे."

—सिमॉसइ

( श्लोक )

" तप्यंते लोकतापेन साधवः प्रायशो जनाः
परमाराधनं तद्धि पुरुषस्याखिलात्मनः "

—भागवत

**भावार्थः**—दुसऱ्यास दुःख झालें असतां जो दुःख पावतो, व दुःखी जनांचा परामर्श घेतो, त्याची हीच सर्वांत श्रेष्ठ अशी परमेश्वराराधना होय.

( श्लोकार्थ )

" सत्कर्म आणि समता सदयत्व रीता,
हा मुख्य धर्म निगम स्फुट हे करीतीः "

-वामन

# प्रकरण २१

## धर्म

एकाद्या परमार्थविषयक प्रश्नाची चर्चा अथवा एकाद्या विशेष धर्ममताचें मंडन करण्याचें हें स्थळ नाहीं हें खरें; परंतु जेणेंकरून मनुष्यमात्राचे मनास दुःखांत समाधान आलें आहे व जो एक शुद्धानंदाचा मार्ग आहे, त्याविषयीं थोडेंसें तरी लिहिलें पाहिजे.

धर्म शब्दांत दोन गोष्टींचा समावेश होतो. एक मनुष्याचें वर्तन व कर्तव्य, आणि दुसरी परमात्म्याचें स्वरूप व जीवात्म्याची मरणोत्तर अवस्था.

धर्मापासून मनुष्याचें समाधान व्हावें, त्यास सुमार्ग दिसावा, व त्याचें मन हळुवार व्हावें. धर्म हा बुद्धिकौशल्य दाखविण्याचा किंवा एकमेकांवर तुटून पडून खडाजंगी वाद करण्याचा विषय नाहीं. धर्माकरितां छळ झाल्यास, ज्या देवाच्या नांवानें तो होतो, तो देव मत्सरी, क्रूर व अन्यायी आहे, असें म्हणावें लागतें. आपण मनापासून झटून सत्यशोधन केलें म्हणजे पुरे; पुढें आपली गति काय होईल, ही विवंचना करण्याचें प्रयोजन नाहीं. अशी विवंचना केल्यास, देवाच्या चांगुलपणाविषयीं आपण साशंक आहों, असा आपल्या वर्तनाचा अर्थ होईल. धर्मसंबंधी ज्ञान करून घेते वेळीं, शब्दाकडे दृष्टि न देतां निवळ अर्थाकडेच पाहिलें पाहिजे; आणि परमेश्वराचे स्वरूपाची त्यास अनुरूप अशी कल्पना केली पाहिजे.

बहुत स्त्रीपुरुष परमार्थविषयक वादानें व संशयानें आपलीं मनें बावरीं करून घेतात. परंतु अशांपैकीं शेंकडा

नव्याण्णव लोक, जगांत आपलें कर्तव्य काय आहे याजविषयीं विचार करीत नाहींत. आपण जर आपलें कर्तव्य करूं लागलों, तर आपला सदसद्विचार आपणास स्पष्टपणें सुमार्ग दाखवितो. असें ह्या लोकांचे हातीं धर्मानें वागण्याचें उत्तम साधन असतां, तें टाकून धर्मतत्त्वाचा उगाच काथ्याकूट करीत बसतात. परमार्थविषयक ज्ञान हें एक गूढ शास्त्र आहे, म्हणून तें आपणास अवगत झालें नाहीं तरी फिकीर नाहीं. कारण, जोंपर्यंत प्रामाणिकपणानें व मनःपूर्वक सत्यशोधनाचे कामीं आपण परिश्रम करीत आहों, तोंपर्यंत जरी आपले हातून गैरसमजुतीनें प्रमाद घडला, तरी आपणास परमेश्वर दंड करील अशी भीति बाळगण्याचें मुळींच कारण नाहीं. देव तुम्हांस फक्त इतकाच बोध करितो कीं, न्यायानें वागा, दुसऱ्यावर दया करा आणि लीन होऊन मजवर भाव ठेवा. खऱ्या धर्मतत्त्वविचारांत मुळींच वादस्थळ नाहीं; जो वाद उत्पन्न होतो, त्याचें मूळ धर्मशास्त्राचा अभ्यास करणारे पंडित होत. धर्माचें खरें तत्त्व पाहिलें तर, पृथ्वीवर शांति असावी व मनुष्यमात्रांत प्रेम असावें, एवढेंच आहे. तेव्हां, ज्या धर्मामुळें मनुष्यमात्रांत परस्पर द्वेष उत्पन्न होऊन एकमेकांचा छळ होतो, त्या धर्माचे अनुयायी नुसती शब्दावर दृष्टि देतात, परंतु त्यांस त्याचा खरा अर्थ कळत नाहीं, असेंच म्हणावें लागतें.

ख्रिस्तानें सनाई डोंगरावर केलेला नुसता उपदेशच घेऊन ख्रिस्ती लोकांनीं वर्तन ठेविलें असतें, तर युरोप खंडाचा झालेला धर्मच्छल वांचला असता.

बुखाऱ्यांत एकंदर ३०० विद्यालयें होतीं. त्यांत ध-

र्मशास्त्राशिवाय दुसरें कांहींच शिकवीत नसत. याचा प-रिणाम असा झाला आहे कीं, या शहरासारखें हटवादी व दोषदृष्टीनें छिद्रें पहाणारें शहर जगतांत दुसरें क्वचितच सांपडेल. " विद्येनें मनुष्य गर्वी होतो; परंतु सहिष्णुतेनें ज्ञानी होतो." हेंच जाणून तुकारामानें म्हटलें असावें कीं -

( अभंग )

" बरा देवा कुणबी आलों, नाहींतर दंभेंच असतों मेलों;
भलें केलें देवराया, नाचे तुका, लागे पायां;
विद्या असती कांहीं, तरी पडतों अपाया,
सेवा चुकतों संतांची, नागवण हे फुकाची;
गर्व होता ताठा, जातों यमपंथें वाटा;
तुका म्हणे थोरपणें, नरक होती अभिमानें. "

जो सर्वांचे ठिकाणीं समदृष्टि ठेवितो, त्याची परमेश्वराराधना सर्वांत श्रेष्ठ होय.

( ओंव्या )

" जो सर्व भूतांच्या ठाया, द्वेषातें नेणेंच कांहीं,
आपपर जया नाहीं, चैतन्य जैसें.
कां रायाचे देह चाळूं, रंका परौतें गाळूं,
हें न म्हणेच कृपाळू, प्राण पैं गा. "

—ज्ञानेश्वर.

अशा पुरुषापुढें देवसुद्धां मान लववितो.—

( ओंव्या )

" म्हणोनि गा नमस्कारूं, तयातें आम्हीं माथां मुकुट करूं,
तयाची टांच धरूं, हृदयीं आम्हीं;
तयाचिया गुणांचीं लेणीं, लेववूं आपुलिये वाणीं,
तयाचि कीर्ति श्रवणीं, आम्हीं लेऊं;

तो पहावा हे डोहळे, म्हणूनि अचक्षुर्या मज डोळे,
हातींचेनि लीलाकमळें, पूजूं तयातें."

—ज्ञानेश्वर

पृथ्वीवर जे धर्मसंप्रदाय आढळतात, ते स्वमताभिमानी लोकांनीं स्थापिले आहेत. आजपर्यंत जे महान् धर्मगुरु होऊन गेले, त्यांपैकीं एकानेंहि एकादा धर्मपंथ स्थापण्याचें योजिलें नाहीं. फारसी भाषेत अशी एक म्हण आहे कीं, निरनिराळ्या धर्मपंथांमुळें एकंदर मनुष्यमात्राचे ७२ विभाग झाले आहेत. त्या सर्वांचीं धर्ममतें धुंडाळितां, परमेश्वर परमकृपाळू आहे, या एका तत्त्वाशिवाय दुसरें तत्त्व त्यांत आढळून येत नाहीं. फारसी भाषेत दुसरी अशी एक म्हण आहे कीं, ज्याच्याजवळ, आयुष्यरूपी सूत्रांत, प्रेम आणि मननरूपी मणी गोंविलेली स्मरणी आहे, त्यास दुसऱ्या नामस्मरणीची गरज नाहीं.

मूर्तिपूजक तत्त्ववेत्त्यांच्या ग्रंथांत जितका खरा खिस्ती धर्म आढळतो, तितका कित्येक खिस्ती धर्मोपदेशकांच्या ग्रंथांत आढळत नाहीं. प्लेटो, मार्कस अरिलिअस, एपिक्टिटस आणि प्लूटार्क यांचे ग्रंथ पाहिले असतां ही गोष्ट सर्वांचे प्रत्ययास येईल.

साक्रेटीस म्हणतो कीं, " पापपुण्यांच्या झडतीच्या दिवशीं, मला माझा आत्मा निष्पाप राखून देवापुढें कसें उभें राहतां येईल, एवढाच मला विचार पडला आहे. ज्या मानधनांचे मागें जगत् लागलें आहे, त्यांचा मीं त्याग केला आहे. आतां मला फक्त सत्य समजण्याची, माझ्यानें जितकें शुद्धाचरण ठेववेल तितकें ठेवण्याची, आणि मरण येईल तेव्हां मरण्याची इच्छा आहे. सर्व लो-

कांनीं असेंच वर्तन ठेवावें म्हणून मी सर्वांस मनापासून उपदेश करीत असतों."

"देवांचें अस्तित्व आहे आणि ते सर्व गोष्टी न्यायानें व सर्वांच्या कल्याणासाठीं घडवितात, असें मानणें हीच मुख्य भक्ति होय. तुम्हीं देवाचे आज्ञांकित रहा. घडून येईल त्याचा आदर करा आणि तें अत्यंत चतुर व शहाण्या देवानें घडवून आणिलें आहे असें मानून त्याप्रमाणें वागा."

"आपण दहा हजार वर्षे अमर आहों, असें मानून तुम्ही वागूं नका; कारण, मृत्यु हा नेहमीं तुमच्या सन्निध असतो. जोंपर्यंत तुम्हांस शक्ति आहे व तुमच्या जीवांत जीव आहे, तोंपर्यंत पुण्यमार्गानें चाला."

( श्लोक )

"अद्यैव कुरु यच्छ्रेयो मा त्वा कालोऽत्यगादयं,
[illegible]"

महाभारत

**भावार्थः** —तुला काय सत्कृत्य करणें असेल तें आजच करून टाक; कारण, लांडगा जसा मेंढरावर झडप घालतो, त्याप्रमाणें मृत्यु केव्हां येऊन अचानक तुला घेऊन जाईल हें कळणार देखील नाहीं.

"मृत्यु हा तुम्हांस केव्हां गांठील याचा नेम नाहीं असें मानून तुम्ही आपला वर्तनक्रम ठेवा. जर देव आहे, तर हा लोक सोडून मृत्युपंथानें जाण्यास भिऊं नका; कारण, देव कोणासहि कष्ट देत नाहीं. परंतु जर देव मुळींच नसेल अथवा असून मनुष्याविषयीं उदासीन असेल, तर ज्या जगांत परमेश्वर नाहीं, त्या जगांत राहून

१ एपिक्टिटस २ मार्कस अरिलिअस

मला काय करावयाचें आहे? पण देव आहे हीच गोष्ट मला सत्य वाटते. तो मनुष्याची ममतेनें काळजी घेतो; आणि त्यास दुःख होऊं नये म्हणून तो सर्व सुखसाधनें त्याच्या हातीं ठेवितो. या जगांत जर दुःख असेल, तर तें मनुष्यास टाळितां यावें अशी योजना त्यानें केलीच असली पाहिजे.

"देवास जे लोक मानितात, ते त्याच्या अखंड संपत्तीकडे किंवा विद्युल्लता आणि मेघगर्जना यांत प्रकट होणाऱ्या त्याच्या अपार शक्तीकडे पाहून, त्यास मानितात असें नाहीं; तर तो सर्वबुद्धिमान् व सर्वज्ञाता आहे म्हणून लोक त्याचे चरणीं लागतात."

वर जीं तिघां ग्रीक नीतिशास्त्रकारांचीं वचनें दिलीं आहेत, त्यांचें खरें मर्म काय, हें समजणें कांहींसें कठिण आहे; परंतु अशा अर्थाचीं वचनें आशिआ खंडांतील ग्रंथकारांचे कृतींतहि ठिकठिकाणीं आढळून येतात. उदाहरणार्थ—मृच्छकटिक नाटकांत, वसंतसेनेस ठार मार, तुझें हें कृत्य कोणी पहाणार नाहीं, असें शकार विटास सांगतो, तेव्हां विट म्हणतो कीं—

( श्लोक )

"ह्या देवता दशदिशा मज पाहतातीं
चंद्रार्कही गगन पाहत राहतातीं;
तो धर्मही, गगन, मारुत, अंतरात्मा
आहे तशी सुकृतदुष्कृतसाक्षिणी क्ष्मा."

नास्तिकांची लोक फार निर्भर्त्सना करितात; परंतु जो परमेश्वराचें अस्तित्व नाहीं असें प्रामाणिकपणानें मानि-

३ प्लूटार्क

तो. त्यानें अशी हेलना होण्यासारखा काय गुन्हा केला आहे हें कळत नाहीं ! प्लूटार्क म्हणतो कीं, " नास्तिक जे आहेत, ते देव नाहीं एवढेंच म्हणून स्वस्थ बसतात. परंतु जे धर्मभोळे आहेत, ते देव चंचल, तामसी, क्षणिकचित्त, खुनशी अशा प्रकारचा आहे असें मानितात. तेव्हां त्यांची परमेश्वरस्वरूपाची कल्पना नास्तिकांपेक्षांहि अधिक उग्र नाहीं काय ? धर्मभोळे लोक जसें देवास मानितात, तसाच मी क्षणिकचित्त, चंचल, तामसी व अल्प कारणावरून आकस धरणारा आहें असें लोकांनीं म्हणण्यापेक्षां माझ्या नांवाचा मनुष्यच पृथ्वीवर कधीं होऊन गेला नाहीं असें म्हटल्यास, तें म्हणणें मला अधिक मानवेल. "

पुष्कळ लोकांचा धर्म म्हटला म्हणजे निवळ स्वार्थ होय. नवस, भीति, आशा, संपत्ति, डामडौल इत्यादि गोष्टीहि कित्येकांच्या धर्मकल्पनेचा मुख्य पाया आहेत. कित्येक लोक रत्नें आणि जवाहीर हीं स्वर्गीं मिळतात, म्हणून स्वर्गसुखाची अपेक्षा करितात, व कित्येक खिस्ती देखील इहलोकसंबंधी स्वार्थासाठीं खिस्ताची उपासना करितात.

आजपर्यंत पृथ्वीवर जीं धर्मयुद्धें झालीं आहेत, त्यांपैकीं बहुतेकांचें मुख्य कारण म्हटलें म्हणजे केवळ शब्दवाद होय. हे वाद कसे उत्पन्न होतात, हें एका मौजेच्या गोष्टीवरून स्पष्ट होईल. – एकदां एक अरब, एक पारसीक, एक तुर्क व एक ग्रीक, अशा चौघांनीं एके ठिकाणीं रात्रीचा फलाहार करण्याचें ठरविलें. परंतु फलाहार काय करावा, यासंबंधानें ते आपसांत भांडूं लागले. तुर्क म्हणे, मला ' आझम ' पाहिजे; अरब म्हणे,

मला ' ॲनेब ' व पारसीक म्हणे, मला ' आंगूर ' पाहिजे; आणि ग्रीकानें तर आपणास ' स्टॅफिलीआन ' पाहिजे, असा आग्रह धरिला. असे ते चौघे भांडत असतां. सुंदर द्राक्षांच्या ओझ्यानें लादलेला एक गाढव त्यांचे समोरून जाऊं लागला. तेव्हां हे चौघे उठून उभे राहिले. व तीं सुंदर पिकलेलीं द्राक्षें त्यांनीं एकमेकांस दाखविलीं. तुर्क म्हणाला. ' हें माझें आझम पहा '; पारसीक म्हणाला, ' अहो ! यांसच मी आंगूर म्हणतों: यासारखें फलाहारास दुसरें फळच नाहीं. ' हें ऐकून अरब म्हणाला, ' माझें ॲनेब तें हेंच '; आणि ग्रीक म्हणाला. ' हेच माझेंहि स्टॅफिलिआन. ' अशी त्या चौघांची एकवाक्यता झाल्यावर, तीं द्राक्षें त्यांनीं विकत घेऊन मोठ्या आनंदानें फलाहार केला. चौघांस द्राक्षेंच हवीं होतीं. परंतु एका शब्दवादानें काय गोंधळ उडण्याचा प्रसंग आला होता तो पहा !

असें म्हणतात कीं, एकदां डीन स्टॅन्ले हा प्रसिद्ध धर्माधिकारी आपलीं धर्ममतें समजावून सांगत असतां लार्ड बिकन्सफील्ड म्हणाला कीं, " अहो महाराज ! तुम्ही सांगतां तें सर्व बरोबर आहे; परंतु एक गोष्ट मला सांगा:—धर्मांत निरनिराळीं मतें, आणि त्या मतांचे अभिमानी असे धर्मगुरु असतात, यांचें हो काय प्रयोजन ? "—आणि खरोखर पहातां, सर्व धर्मांची रचना निरनिराळ्या मतांवर झालेली नाहीं; परंतु कालानें त्यांत निरनिराळ्या मतांचा उद्भव होऊन त्यांखालीं खरें धर्मतत्त्व लोपून गेलें आहे.

खरें धर्मतत्त्व समजण्यास अत्यंत सुलभ आहे. स्पि-

नोझा म्हणतो कीं, " धर्माचें सार म्हटलें म्हणजे, परमेश्वराम न भितां अगर तो आपणास अमकें देईल अशी इच्छा न धरितां, तो अत्यंत दयाळू आहे असें जाणून त्याजवर निरपेक्षबुद्धीनें प्रेम करणें हें होय. कोणी एक अत्यंत दयाळू व न्यायी परमात्मा आहे, असा भाव ठेवून व त्याचें आज्ञांकित राहून, आपण नेहमीं न्यायमार्गानें गेलों व परोपकार केला, तर आपले हातून परमात्म्याची उत्तम सेवा झाली, असें समजणें, हेंच धर्माचें एकंदर सार होय. "

हें धर्माचें सार न समजतां, वितंडवाद मात्र माजला आहे. " धर्मपुस्तकांत ज्या शब्दांनीं धर्मतत्त्वें प्रतिपादन केलीं आहेत, त्या शब्दांचा अर्थ नियमित नसल्यामुळें, हे धर्मग्रंथ प्राचीन काळापासून वादास कारण झाले आहेत. अशीं वादजनक धर्मपुस्तकें आधारभूत धरून, लोकांनीं धर्माविषयीं विचार केला आहे; ज्या प्रतिज्ञा पुराव्यानें सिद्ध झाल्या नाहींत, त्यांवरून अनुमानें काढिलीं आहेत; शब्दांचा अर्थ निश्चित ठरविल्याशिवाय, प्रतिज्ञा केल्या आहेत; आणि ज्या शब्दांची त्यांस बरोबर व्याख्याहि करितां येत नाहीं, त्या शब्दवादानें मतभेद उत्पन्न होऊन, निरनिराळ्या धर्मसंप्रदायांतील लोकांचीं मनें एकमेकांविषयीं दूषित झालीं आहेत. "[1]

धर्मविषयक शंका दोन प्रकारच्या असतात. कित्येक लोक सबळ पुरावा नसल्यामुळें आपलें मत कायम ठरवीत नाहींत, हा एक प्रकार; व दुसरा असा कीं, चांगला पुरावा असूनहि कित्येक मनाच्या चलबिचलीमुळें, हें मत

१ जोवेट

खरें कीं तें खरें, असे साशंक रहातात. कोणतेंहि मत अपुरत्या पुराव्यावरून ठरविणें न्याय्य होणार नाहीं; परंतु जेव्हां एकादी कृति करण्याची आपल्यावर पाळी येते, तेव्हां आपल्याजवळ जो कांहीं उत्तम पुरावा म्हणून असेल, तो घेऊन त्याच्या आधारानें ती कृति करावी.

ह्या भुवनाची उत्पत्ति कशी झाली व त्याची पुढें काय गति होणार हें धर्मानें आह्मांस उलगडून सांगितलें पाहिजेच, अशी अपेक्षा करणें वाजवी नाहीं. विद्युल्लता व उष्णता, या विषयांवर जे नामांकित व विस्तृत ग्रंथ झाले आहेत, त्यांत देखील, त्यांची उत्पत्ति कशी होते, हें अद्यापि कोणीं सांगितलें नाहीं. तसेंच जीवाची कशी होते हें चराचरशास्त्रांत, अजून कोणीं सांगितलें आहे असें आढळून आलें नाहीं. मग धर्मावरच इतका भार कां घालावा?

सायराक्यूज एथे, हायरोनें सायमोनिडीज यास विनंति केली कीं, देव हा कोण व कसा आहे हें मला सांग. तेव्हां सायमोनिडीज यानें त्या प्रश्नाचें उत्तर देण्यास एक दिवसाची अवधि मागून घेतली. दुसरे दिवशीं त्यास विचारतां, विचार करण्याकरितां पुन्हां आणखी एक दिवसाची अवधि त्यानें मागितली. असे बरेच दिवस गेल्यानंतर हायरोनें त्यास पुसल्यावरून तो म्हणाला, मला विचारलेल्या प्रश्नाचें जों जों मी मनन करितों, तों तों माझें मन अधिकच गोंधळून जातें.

निरनिराळ्या धर्मग्रंथांत परमेश्वराचें रूप निरनिराळ्या रीतीनें वर्णन केलें आहे. ऋग्वेदसंहितेंत देवाचें वर्तुळाशीं सादृश्य कल्पून म्हटलें आहे कीं, ‘ ह्या परमेश्वररूपीं वर्तुळाचा मध्यबिंदु सर्व ठिकाणीं आहे; परंतु परिघरेषा

कोठे आहे याचा अंत नाहीं.' ख्रिस्ती लोकांचे धर्मपुस्तकांत देवाचें वर्णन केलें आहे तें असें:—' जो कृपाळू आहे. त्याचे ठिकाणीं हेवा नाहीं, त्यास गर्व नाहीं, ताठा नाहीं, तो कधीं दुष्कृति करीत नाहीं, तो स्वार्थी नाहीं, तामसी नाहीं व त्याचे ठिकाणीं अमंगलाची वार्ता देखील नाहीं; तो न्यायी, सत्यप्रिय, व सर्वसहनशील असून, कधीं कोणास अंतर देत नाहीं. सर्व भाषा व धर्मतत्त्वें हीं कधीं ना कधीं तरी नष्ट होतील, परंतु परमेश्वराचा लय कधींहि होणार नाहीं.'

मनुष्याचें मन धर्मसंबंधानें जरी साशंक असलें, तरी भक्तिहीन होण्याचें कारण नाहीं. कारण साधुसंतांनीं एका भक्तीनेंच देव आळविला आहे.

( अभंग )

" आतां कोणा शरण जावें, सत्य कोणाचें मानावें ?
नाना पंथ, नाना मतें, भूमंडळीं असंख्यातें.

रामदास सांगे खूण, भक्तिवीणें सर्व शीण."

कित्येक लोक पापाचरण ठेवून, जपजाप व दानधर्म यांचे योगानें त्याचें क्षालन करूं पहातात, परंतु हा यत्न अगदीं निष्फळ होय. कारण स्वर्गीं चढण्यास सदाचरणासारखा दुसरा सुलभ मार्ग नाहीं.

धर्मसंबंधें विचार करितां करितां अनेक स्थळीं मनुष्याचें मन आजपर्यंत साशंक झालेलें आहे व पुढेंहि तें असेंच साशंक राहील; परंतु, आपली उत्पत्ति कशी झाली व पुढें आपली गति काय होणार, याविषयीं निरनिराळ्या लोकांनीं जे विचार प्रकट केले आहेत, त्यांचें मन-

न केल्यास समाधान होण्याचा जरी संभव नसला, तरी त्यांची प्रत्येक मनुष्यानें माहिती करून घेणें गैर नाहीं.

( श्लोक )

" प्राणी जन्मासि आला, सकळ विसरला, घोर निद्राहि आली;
कोठूनी, कोण आलों? उमज न उमला, भ्रांति त्या पूर्ण झाली;
जीवात्मा त्यासवें जो उडुगण उदया येतसे, गर्भवासीं.
अस्तातें पावलासे इतर जगिं; बहु दूरचा तो प्रवासी ! "
परी नाहीं आम्ही विसर पडला पूर्ण भुवनीं;
नसे देहासंगें प्रकट जननीं नग्न असुनी;
विशुद्ध श्रीशोभावसनपरिधानें विलसुनी.
जगीं आलासे तो भुवनपतिच्या कीं जवळुनी. "

—वर्डस्वर्थ

जे लोक सत्य जाणण्याविषयीं प्रामाणिकपणानें श्रम घेतात अथवा धर्मास आपलें सर्वतोपरी जीवित वाहून प्रसंगीं त्याकरितां आपला प्राणहि वेंचितात, त्यांची आम्ही निर्भर्त्सना करितों, असें कोणींहि समजूं नये. परंतु आजपर्यंत ज्यांनीं असे धर्माकरितां प्राण दिले आहेत, त्यांपैकीं बहुतेकांनीं ते सत्याकरितां दिले नाहींत, म्हणून त्यांच्या कृतीस पुण्यकृति मानितां येत नाहीं.

" सत्यापरता नाहीं धर्म; सत्य तेंचि परब्रह्म. "

—रामदास

हें तत्त्व प्रत्येक मनुष्यानें मनांत बाळगिलें पाहिजे. कारण, " [1]आत्म्यास सत्य आवडतें, आणि सत्याकरितां तो सर्व कांहीं करितो. " सत्यशोधनाकरितां मनुष्यानें होतील तेवढे परिश्रम करावे; परंतु त्याच्या नांवानें दुसऱ्या कोणास जाच करूं नये.

१ प्लेटो

धर्मविषयक वादविवादानें धर्माचा प्रसार होत नाहीं, व धर्मच्छल केल्यानें कोणीहि मनुष्य धर्मांतर करीत नाहीं. जे लोक आमच्या धर्माचें अवलंबन करीत नाहींत त्यांस शेवटीं अनंतकाळ रौरव यातना निश्चयें भोगाव्या लागतील, असें कित्येक लोक मानितात. अशा लोकांनीं भिन्नधर्मानुयायी लोकांचा छल मांडिला, तर त्यांचें वर्तन दिसण्यांत तरी गैर दिसत नाहीं; कारण, अशा धर्मच्छलानें एक तर असत्यपंथाचा उच्छेद होतो व ते जर मनोभावानें स्वधर्म सत्य आहे असें समजत असतील तर त्यांच्या समजुतीप्रमाणें, ज्या यमयातनांपुढें हा छलभोग कांहींच नाहीं, त्या यमयातनाहि असत्यधर्मानुयायी लोकांस भोगाव्या लागणार नाहींत, हें दुसरें. परंतु सर्वांनीं एवढी गोष्ट लक्षांत धरिली पाहिजे कीं, जे लोक छल करण्यास प्रवृत्त होतात, ते देवाच्या चांगुलपणाकडे मुळींच लक्ष देत नाहींत, असें त्यांच्या कृतीवरून स्पष्ट ठरतें. शिवाय धर्मच्छलानें इष्ट हेतु साध्य होणार नाहीं व आजपर्यंत झाला नाहीं.

" सन १४१९ सालीं वुइकलिफ् ह्या धर्मसुधारकाचें पुरलेलें प्रेत त्याच्या प्रतिपक्षानें उकरून काढून जाळिलें व त्याची रक्षा जवळच एक ओढा वहात होता त्यांत टाकून दिली. ती ओढ्यांतून एव्हान नदींत गेली; एव्हान नदींतून सेव्हर्न नदींत, सेव्हर्न नदींतून समुद्रांत व समुद्रांतून महासागरास जाऊन पोंचली. ही वुइकलिफची अशा रीतीनें प्रवास करणारी रक्षा, त्याच्या मताचा सर्व जगभर कसा प्रसार झाला हें चांगलें व्यक्त करिते. "[१]

१ फुलर

एकानें शमाईस म्हटलें कीं. मला सर्व धर्म एका पै ठकींत सांगा. हें ऐकतांच शमाईनें रागावून त्याला हां कून लाविलें. नंतर त्या गृहस्थानें हिलेलकडे जाऊन त्याला हीच विनंति केली. तेव्हां हिलेल म्हणाला ऐक, "लो कांनीं जसें तुझ्याशीं वागावें असें तुला वाटतें. तसें तूं लोकांशीं वागत जा. हा काय तो सर्व धर्म होय; बाकी च्या सर्व गोष्टी धर्मावरील टीका होत."

( श्लोक )

"न तत्परस्य संदध्यात्प्रतिकूलं यदात्मनः
एष संक्षेपतो धर्मः कामादन्यः प्रवर्तते."

—महाभारत

**भावार्थः**—जो भोगण्याचा प्रसंग आला असतां आपणास दुःख होतें, तो दुसऱ्यावर आणूं नये, हें संक्षेपतः धर्माचें लक्षण होय.

**ख्रिस्तानें** आपल्या भक्तांस जेवढें समजणें जरूर होतें तेवढ्याचाच त्यांस बोध केला आहे. "जे लोक एकमेकांवर प्रेम करितात, तेच माझे खरे भक्त आहेत" हेंच काय तें त्या ख्रिस्तबोधाचें सार होय. "निराश्रित विधवा व पोरकीं मुलें यांस भेटून व त्यांस साहाय्य करून, त्यांचें समाधान करणें, व जगतांत राहून निष्कलंक आचरण ठेवणें, हाच शुद्ध धर्म होय."[1]

कमी सुधारलेल्या व रानटी लोकांचा धर्म प्रायः भयंकर असतो. त्यांच्या देवता मत्सरी, आकस धरणाऱ्या, क्रूर, दयाहीन, स्वार्थी व द्वेषी असून, पोरकट व थिल्लर अशा असतात. त्या मिष्टान्नानें, बलिदानानें, व कधीं कधीं नरबलि दिल्यानें संतुष्ट होतात. त्या

१ सेंट जेम्स

देवता जुलमी असतात इतकेंच नाहीं, तर अशा छांदि-ष्टहि असतात कीं. त्यांस संतुष्ट करण्याचे कसेहि प्रयत्न केले, तरी त्या प्रसंगीं तृप्त होतील कीं नाहीं याची शंकाच असते. तीरमंत्री, चेटकी, देवऋषि व इलमी लोक, आपल्या अंगीं जें सामर्थ्य आहे, तें आह्मीं ह्या उग्र देवतांपासून मिळविलें आहे, अशा लोकांत बाडा मारितात. अशा रानटी धर्मच्छायेखालीं राहणाऱ्या लोकांचा जीव कधीं स्वस्थ नसतो. आपणांवर केव्हां व कशी आकाशची कुऱ्हाड पडेल याचा नेम नाहीं, असें जाणून ते नेहमीं कावरेबावरेच असतात. क्षुल्लक कृतीपासून देखील आपणांस मोठा दगा होईल व अगदीं निर्दोष हेतूनें केलेल्या कृत्याबद्दल हे लहरी व अविचारी देव कदाचित् आपल्या प्राणासहि हात घालतील, अशी त्यांस सदैव भीति पडलेली असते. कित्येक लोक तर रोग वगैरे अनिष्टांसहि देव मानितात. ह्या देशांत ज्या ठिकाणीं देवीची सांथ आली होती अशा एके ठिकाणीं एक इंग्रज गेला. तेथे त्यास एक शितळा देवीचें देवालय दिसलें. परंतु ह्या गृहस्थानें लोकांचे मर्जीविरुद्ध त्या सर्वांच्या देवी काढल्यावर ती सांथ नाहींशी झाली. हें पाहून त्या लोकांस फार आश्चर्य वाटलें. त्या शितळादेवीच्या गुरवानें तर स्थापन केलेली त्या देवीची मूर्ति उपटून फेंकून दिली व त्या इंग्रजास विनंति केली कीं, ह्या देवीचे ठिकाणीं मांडण्यास तुम्हीं आपली एक मूर्ति मला द्या.

दुष्ट पिशाचें व उग्र देवता ह्या जगांत आहेत, असा आपल्या पूर्वजांचा समज असल्यामुळें त्यास किती दुःख व यातना भोगाव्या लागल्या असतील व त्यांचा जन्म

भीतीनें कसा कष्टमय झाला असेल, याची कल्पना या युगांत राहणाऱ्या लोकांस क्वचितच करितां येईल. परंतु जसजशी मनुष्याची सुधारणा होत गेली, तसतशीं त्याचीं धर्ममतेंहि विचारी व समंजसपणाचीं झालीं, आणि परमेश्वराविषयीं त्याची कल्पनाहि हळूहळू शुद्ध होत चालली.

आपल्या हातून प्रामाणिकपणानें चुकी झाल्याबद्दल, फार तर काय, पण अन्यायीपणाचा आरोप केल्याबद्दल देखील, दयाळू परमेश्वर आपणावर रोप करीत नाहीं, इत्यादि गोष्टी आतांशा कोठे आपणांस समजूं लागल्या आहेत. कारण, हल्लीं लोक शब्दावर दृष्टि न देतां अर्थाकडे लक्ष पुरवितात.

रस्किन् म्हणतो कीं, " लोकांच्या दोषाबद्दल ज्या ज्या प्रसंगीं त्यांचा निषेध करण्याचें आपणांस भाग पडतें, त्या त्या प्रसंगीं तसा त्यांचा निषेध न करितां, त्यांचे अंतःकरणास जर बोध केला, अमकी गोष्ट करा अशी देवाची तुम्हांवर सक्ति आहे असें न सांगतां, परमेश्वराचें दयालुत्व जर त्यांचे मनावर ठसविलें, तुम्हांस मरण हें ठेविलेंच आहे असें सांगतांना तुमचा आत्मा अमर आहे, असें सिद्ध करून जर त्यांचें समाधान केलें, सारांश, देव हा भयंकर आहे असें न दाखवितां, तो नेहमीं आपल्या सन्निध असून दिसण्यासारखा असतो, त्याशिवाय प्राणिमात्रास दुसरा थारा नाहीं, त्याची कास धरिली असतां तो अत्यंत उदार व दयाळू कधीं कोणास अंतर देत नाहीं व त्याच्या कृपेच्या योगानें ह्या पृथ्वीचा स्वर्गहि बनूं शकतो, असें जर लोकांच्या मनांत बिंबवून दिलें, तर रस्तोरस्तीं जी हालअपेष्टा आपल्या न-

जरेस येते त्यापेक्षां कमी येईल; अर्थात् लोकांचीं मनें उदार होऊन त्यांचे हातून अधिक परोपकार घडेल. "

भुवनाचें खरें प्रमेय आपल्या भाषेनें व्यक्त करितां येईल कीं नाहीं, अथवा एकाद्यास तसें व्यक्त करितां आलेंच तर तें आपणांस समजण्याची शक्ति आहे कीं नाहीं, अशी पुष्कळ लोक मोठ्या लीनतेनें शंका घेतात.

धर्मसंबंधें कोणाचें कसेंहि मत असो; परंतु त्याविषयीं विनाकारण वाद करीत बसणें, हें सर्वथैव त्याज्य आहे. जे लोक आपलीं धर्मसंबंधी मतें कायम करीत नाहींत, ते नास्तिक आहेत असें नाहीं. उलटें, जे आह्मांस धर्माची पूर्ण माहिती आहे असें म्हणतात, त्यांचींच मनें शंकाग्रस्त असतात.

जसें मुलांस अंधकारामुळें रात्रीं भय वाटतें, तशी अज्ञानामुळें मनुष्यास धर्मसंबंधी भीति वाटते. तीच भीति ज्ञानानें व प्रेमानें नष्ट होते. कालांतरानें सर्व जगांत शांति व प्रेम वाढून, ज्या शुद्ध धर्माचें अस्तित्व अज्ञानावर, व विस्तार वादविवादावर अवलंबून राहणार नाहीं, व जो ज्ञान आणि प्रेम यांच्या साहाय्यानें आपली सुखप्रद शीतल छाया सर्व मनुष्यमात्रांवर पाडील, तो खास भावी धर्म होय, अशी आशा करण्यास सबळ कारण आहे.

" ज्या ज्या ठिकाणीं मनुष्याचा मोठ्या झपाट्यानें उत्कर्ष होत आहे, त्या त्या ठिकाणीं जर सृष्टपदार्थविज्ञानाचा विस्तार होऊन मनुष्याची चौकसबुद्धि उत्तरोत्तर वाढत गेली, तर काय नवल दृष्टीस पडेल याचा आपणास आज अजमास तरी करवेल काय? "

—हर्शेल

# प्रकरण २२

## उत्कर्षाशा

मनुष्यमात्राचा उत्तरोत्तर दोन मार्गांनीं उत्कर्ष होईल अशी आशा करणें साहजिक आहे. कालांतरानें सृष्टींतील जडपदार्थांच्या धर्मांचें आणि आपल्या भोंवतीं घडणाऱ्या सृष्टचमत्कारांचें अधिक ज्ञान होऊन, ज्या गोष्टी हल्लीं आपणांस अनुकूल आहेत त्यांहूनहि अधिक गोष्टींची आपल्या मुलाबाळांस अनुकूलता होईल, हा उत्कर्षाचा एक मार्ग. दुसरा म्हटला म्हणजे, शिक्षणक्रमांत सुधारणा व त्याचा सर्वत्र फैलाव झाल्यानें, शास्त्र, कला, काव्य, गीत, आणि धर्म यांचे साहाय्यानें मनुष्यमात्रांच्या मनास सज्जनतेचें वळण लागून त्याचा उत्कर्ष होईल, व तो अनुकूल असलेल्या सुखसाधनांचा उपभोग घेण्यास विशेष पात्र व स्वावलंबी होऊन, 'ज्ञानाचे पोटीं आनंद' हें तत्त्व त्याचे मनांत चांगलें बाणेल.

जें जें कांहीं परमेश्वरानें घडवून ठेविलें आहे त्यांत मनुष्यानें सुधारणा करण्याचें साहस करणें, हा निवळ कृतघ्नपणा आणि ईश्वरविरोध आहे, असा बहुत लोकांचा ग्रह असल्यामुळें, मनुष्याच्या उत्कर्षाचें पाऊल जसें पुढें पडत जावें तसें गेलें नाहीं. प्रोमिथिअस यानें स्वर्गांतून अग्नि चोरून आणून मनुष्यांस अर्पण केला म्हणून जुपिटर देवाचा त्याजवर अत्यंत रोष झाला, ही प्रसिद्ध कथा वर सांगितलेल्या ग्रहांचें चांगलें दर्शक होय. मनुष्यानें पुष्कळ गोष्टींचा आजपर्यंत शोध लाविला आहे, परंतु त्यास त्याबद्दल शासन झाल्याचें कोठे आढळून न आ-

त्यामुळें, असे शोध लागून मनुष्यमात्राच्या सुखाची निरंतर वृद्धि व्हावी असाच परमेश्वराचा मनोदय आहे. अशी देवभोळ्या लोकांनीं कंडी पिकविली व वरील समज कायम रहाण्यास मदत केली. अद्यापिहि तो समज निर्मूळ झाला नाहीं. शस्त्रक्रियेंत क्लोरोफार्मचा उपयोग करण्याबद्दल खुद्द विलायतेंत कित्येक लोकांच्या मनांत किंतु येतो. कारण त्यांचा असा समज होता व आहे कीं प्रसंगोपात्त मनुष्यास ज्या देहयातना व कष्ट भोगावे लागतात, ते परमेश्वरानेंच ठरवून ठेविले आहेत; त्यांचा मनुष्यानें प्रतिकार करण्याचा यत्न केल्यास आज्ञाभंग केल्याचा दोष घडतो.

असें सांगतात कीं, प्राचीन काळीं नर्थंब्रियाचा राजा एडविन याचे दरबारीं एक ख्रिस्ती उपदेशक आला होता. त्याचा बोध ऐकावा कीं नाही याचा विचार करण्याकरितां राजानें दरबारच्या सरदारांची आणि भिक्षुकांची सभा भरविली. परंतु त्यांत कांहींच निकाल लागेना. शेवटीं एका म्हाताऱ्या सरदारानें उभें राहून म्हटलें कीं, " महाराज, एकादे वेळेस आपल्या अनुभवास आलेंच असेल कीं, आपण मंडळी घेऊन दिवाणखान्यांत रात्रीं जेवण्यास बसलों आहों, बाहेर डोळ्यांत बोट घातलें तरी दिसणार नाहीं असा अंधःकार पडून पाऊस आणि बर्फ पडत आहे, व दिवाणखान्यांत जिकडे तिकडे लखलखाट होऊन शेगड्यांच्या शेकामुळें सर्वांस ऊब आली आहे; अशा प्रसंगीं एकादी चिमणी बाहेरच्या अंधारांतून प्रकाशमय दिवाणखान्यांत शिरून, त्याभोंवतीं घिरट्या घालते व दिवाणखान्याचे दुसऱ्या बाजूनें पुनः अंधारांत निघून जाते. क्षणभर ती आपल्या दृष्टीस पडते खरी; परंतु अंधका-

रामुळें ती कोठून आली व कोठे गेली, याचा आपणांस पत्ता लागत नाहीं. तद्वत् आपलें हें जीवित थोडा वेळ सुखद असें भासतें; परंतु जन्मापूर्वी आपण कोण होतों व कोठून आलों, आणि मरणानंतर आपली गति काय होणार, हें आपणांस समजत नाहीं. तेव्हां, आपल्या दरबारीं आलेल्या उपदेशकास ह्या दोन गोष्टींचें ज्ञान करून देतां येईल तर त्याचा बोध ऐकणें मला प्रशस्त वाटतें." ह्या गोष्टीवरून पूर्वी ज्ञानविस्तारास लोकांची समजूत किती प्रतिकूळ होती हें व्यक्त होईल.

कित्येक लोक असें म्हणतात कीं, अलीकडे बुद्धिमान् पुरुषांनीं पुष्कळ मोठमोठे शोध लाविले आहेत खरे; परंतु अखेर असे कांहीं प्रश्न उरतीलच कीं, त्यांचा निश्चय मनुष्याचे बुद्धीस कधींहि करितां येणार नाहीं. परंतु असा सिद्धांत कोणींहि करूं नये. एकदां, पार्क यानें कांहीं अरब लोकांस पुसलें कीं, रात्रीं सूर्याचें काय होतें व प्रतिदिवशीं जो सूर्य उगवतो तो एकच आहे किंवा नाहीं? तेव्हां त्यांनीं त्यास उत्तर दिलें कीं, असला प्रश्न करणेंच वाजवी नाहीं; कारण असल्या गोष्टींचा शोध मनुष्याच्यानें लाववत नाहीं. एम्. कान्टे यानें सन १८४२त असा सिद्धांत करून ठेविला कीं, ग्रहांचे आकार, अंतरें, परिमाण आणि गति हीं मनुष्यास निश्चित करितां येतील, परंतु त्यांचे घटकावयव व रचना हीं त्यास कळण्याची आशाच नको. त्यानें हा सिद्धांत ठरवून फार वर्षे झालीं नाहींत, तोंच ग्रहांचे घटकावयव व रचना यांचा मनुष्यास शोध लागला. तेव्हां, शास्त्रज्ञान काय करील व काय न करील हें मनांत न आणितां एकादा सिद्धांत ठरविणें वाजवी नाहीं.

ज्ञान हा सागर विस्तीर्ण असून, अद्यापि त्याच्या मर्यादेचा कोणासहि शोध लागला नाहीं; परंतु ह्या मनूंत मनुष्यास मोठमोठे शोध लावण्याची संधि आली नाहीं असें कोण म्हणेल? कित्येक वेळीं असेंहि घडतें कीं, मनुष्यास एकादा मोठा शोध लागतो, परंतु अल्प कारणानें वर्षानुवर्षें त्यापासून त्यास कांहीं उपयोग होत नाहीं. उदाहरणार्थ विद्युद्दीप घ्या. ज्यांतून हवा काढून टाकिली आहे अशा कांचपात्रांत जर एक कोळशाचा तुकडा ठेवून विद्युल्लतेच्या साहाय्यानें पेटविला तर त्यापासून उत्तम प्रकाश पडतो खरा, परंतु तें कांचपात्र फार तापून फुटून जातें व मनुष्यास त्या दिव्याचा कांहींच उपयोग होत नाहीं, इतकाच विद्युद्दीपासंबंधानें शोध लागून बरींच वर्षें होऊन गेलीं. अलीकडे मात्र एडिसननें तोच कोळशाचा तुकडा सूक्ष्म व पातळ करून विद्युत्प्रवाहानें पेटवून पाहिला, तों पाहिजे तितका प्रकाश पडून त्यापासून उष्णता उत्पन्न झाली नाहीं. स्वान, लेन, फॉक्स वगैरे गृहस्थांनीं लाविलेले शोधहि, जरी एकंदरींनें मोठ्या महत्त्वाचे आहेत, तरी ते त्यांस हळूहळूच लागले. सर हंफ्रे डेव्ही यानें या शतकाचे आरंभीं 'लॉफिंग ग्यास' नांवाचा पदार्थ शोधून काढिला. हा पदार्थ मनुष्यास हुंगावयास दिला असतां, शरीरास इजा न होतां, त्यास देहयातनांचें ज्ञान होत नाहीं, असें त्या गृहस्थास आढळून आलें. पुढें या पदार्थाचा एका मनुष्यावर प्रयोग करून इजा न होतां त्याचा एक दांतहि काढण्यांत आला. वास्तविक पहातां ह्या वायूचे धर्म वैद्यांस बहुत वर्षें माहीत होते; इतकेंच नाहीं, तर मोठमोठ्या इस्पितळांतून

वैद्यकीचा अभ्यास करणाऱ्या विद्यार्थ्यांसहि शिक्षक ते समजावून सांगत असत. परंतु पन्नास वर्षे ह्या वायूचा उपयोग शस्त्रक्रियेंत झाला नाहीं. हा पदार्थ, व त्याचे सुखकर धर्म, वैद्यांस समजले असूनहि त्याचा योग्य स्थळीं उपयोग न होतां शस्त्रक्रिया चाललीच होती व तिजपासून रोग्यास भयंकर यातनाहि सोसाव्या लागत असत.

पंधरावे शतकांत छापण्याची कला निघून तिचा व्यवहारांत उपयोग होऊं लागला. परंतु हीच कला त्यापूर्वी बहुत वर्षे मनुष्यास माहीत होती. रोमन लोक शिक्क्याचा उपयोग करीत असत. तद्वतच असिरियन लोक आपल्या राजांचीं नांवें इमारती, स्मारकें इत्यादिकांवर छापून ठेवीत असत. परंतु ज्या शोधकानें छापण्याची कला काढिली, त्यानें रोमन आणि असिरियन लोकांस माहीत असलेल्या कलेंत एवढाच फरक केला कीं, निरनिराळ्या शब्दांचे ठशांऐवजीं निरनिराळ्या अक्षरांचे ठसे तयार केले. अशा अल्प फेरफेरानें छापण्याच्या कलेचा उदय झाला, परंतु तो होण्यास तीन हजार वर्षे लागलीं.

एकंदर सृष्टचमत्कार किती विचित्र व अनंत आहेत, हें आतांशा कोठे आपल्यास कळूं लागलें आहे व कालांतरानें मनास लुब्ध करून टाकणाऱ्या ह्या सृष्टचमत्कारांचें मनुष्यास विशेष ज्ञान होईल अशी उमेद आहे. हल्लीं उपलब्ध असलेल्या सूक्ष्मदर्शकयंत्रांत सुधारणा होईल. नवीन पदार्थांचा निरनिराळ्या कामांत कसा उपयोग करावा हें समजेल, आणि नवीन यंत्रांची पुष्कळ कामीं योजनाहि होईलः परंतु ज्या अणुरेणूंचा प्रत्येक पदार्थ बनला आहे, ते इतके सूक्ष्म आहेत कीं, अमक्या मार्गानें

त्यांचे धर्म आपणास कळतील असा अजमास करणें अत्यंत दुरापास्त आहे. ह्या अणुरेणूंचा व्यास एका इंचाचा $\frac{१}{५०००००००}$ आहे असें लाशमिट् ह्यानें ठरविलें आहे. सूक्ष्मदर्शकयंत्रांत कितीहि सुधारणा झाली तरी अशा सूक्ष्म अणुरेणूंचें आपणांस चांगलें ज्ञान होईल असें दिसत नाहीं. एका इंचाच्या $\frac{१}{५००००}$ अंतरानें भिंगावर रेषा काढिल्या, तर त्या हल्लींच्या सूक्ष्मदर्शकयंत्राच्या साहाय्यानें दिसतात; परंतु प्रकाशाचा असा कांहीं एक विशेष धर्म आहे कीं, ज्या सूक्ष्म पदार्थांचा व्यास इंचाच्या एकलक्षांशांहून कमी आहे, ते पदार्थ आपणास दिसतच नाहींत. हल्लींच्या सूक्ष्मदर्शकयंत्रांत निःसंशय मोठी सुधारणा होईल; परंतु प्रकाशाचे धर्म आपणांस पालटतां येणार नाहींत, म्हणून अणूरेणूंचें ज्ञानहि होणार नाहीं असें दिसतें.

एका इंचाचा $\frac{१}{८००००}$ ज्याचा व्यास आहे, असा अलब्यूमेन पदार्थाचा एक कण घेतला, तर त्यांत बारा कोटी पन्नास लक्ष परमाणु असतात, असा अजमास झाला आहे. पाण्यासारख्या पदार्थांच्या कणांत तर आठ अब्ज परमाणु आहेत. तेव्हां, सूक्ष्मदर्शकयंत्रात सुधारणा करून त्याची दर्शकशक्ति जरी अत्यंत वाढविली, तरी देखील असे परमाणु दिसून ह्या जडसृष्टीच्या रचनेची आपणांस कल्पना होईल असें नाहीं.

जे ध्वनि आपणांस ऐकूं येत नाहींत ते जनावरांस ऐकूं येतात. अत्यंत गर्द जांभळा रंग ( व्हायलेट् ) जनावरांस दिसतो, परंतु आपणास दिसत नाहीं व जसे तांबडा, पिंवळा, हिरवा व निळा हे निरनिराळे रंग आहेत, तसा तोहि एक सृष्टींत निराळा रंग असून त्याचें आपणांस ज्ञान नाहीं.

असे विचार मनांत आले म्हणजे, अशीहि कल्पना होते कीं, हें जगत् जसें आपणांस दिसतें त्याहून भिन्न असें दुसऱ्या प्राण्यांस दिसलेंच पाहिजे. आपल्या कानांत जो एक पडघमासारखा पडदा आहे, त्यावर हवेच्या लाटा आदळल्या म्हणजे ध्वनि उत्पन्न होतो. ज्या वेळेस ह्या लाटा थोड्या असतात, त्या वेळेस गंभीर ध्वनि ऐकूं येतो; त्याच वाढल्या म्हणजे कर्कश ध्वनि उत्पन्न होतो; व एका सेकंदांत हवेच्या चाळीस हजार लहरी त्या पड्द्यावर आदळल्या म्हणजे ध्वनि मुळींच ऐकूं येत नाहीं. प्रकाशाच्या लाटा डोळ्यावर आदळून जें ज्ञान होतें, त्यास प्रकाशज्ञान म्हणतात. एका सेकंदांत अशा चाळीस कोटी लाटा डोळ्याच्या बुबुळावर आदळल्या म्हणजे आपणांस तांबड्या रंगाचें ज्ञान होतें, व त्या लाटा जसजशा वाढत जातात तसतसे, प्रथम नारिंगी, नंतर पिंवळा, हिरवा, निळा व जांभळा अशा अनुक्रमानें निरनिराळे रंग दिसूं लागतात. परंतु ४० हजार व ४० कोटी यांच्या दरम्यान एखाद्या संख्येइतक्या लाटा डोळ्यावर आदळल्या असतां जें कांहीं दिसलेंच पाहिजे, तें दिसण्यासारखी आपल्या डोळ्यांची रचना नाहीं. आपणांस पंचेंद्रियें आहेत; त्यांहून अधिक इंद्रियें प्राण्यांस असतील असें वाटत नाहीं. परंतु अनंत सृष्टचमत्कारांचा थांग आपल्या अल्प व मर्यादित शक्तीस लावितां येणार नाहीं हें उघडच आहे.

शिवाय असेंहि आढळून आलें आहे कीं, ज्यांस पुष्कळ स्नायूंचें साहाय्य आहे अशीं ज्ञानेंद्रियें जनावरांस आहेत; परंतु तीं काय व्यापार करितात हें कळण्यास आपली शक्ति पंगू आहे. न जाणो, कदाचित् आपल्या

पंचेंद्रियांहूनहि भिन्न अशीं पन्नास दुसरीं इंद्रियें असतील, आणि आपले अंगीं ज्ञान होण्याची जेवढी पात्रता आहे, तेवढ्यांतच अनंत ध्वनींचें व अनंत भिन्न भिन्न रंगांचें अस्तित्व असेल, परंतु ते ध्वनि ऐकण्याची व ते रंग दिसण्याची आपणांस शक्ति नसेल. ह्या व अशाच दुसऱ्या हजारों गूढ प्रश्नांचा निर्णय व्हावयाचा आहे. जगाचें स्वरूप जसें आपणांस भासतें, त्याहून भिन्न असें स्वरूप इतर प्राण्यांस दिसत असेल व जें गीत आपणांस ऐकूं येत नाहीं, जे रंग दिसत नाहींत व जें ज्ञान होत नाहीं, त्या ज्ञानानें, रंगांनीं व गीतानें हें जगत् सर्वत्र भरून गेलें आहे असें त्यांच्या अनुभवास येत असेल.

पेंढा भरलेले पक्षी आणि प्राणी भिंगाच्या कपाटांत ठेवणें, व पेट्यांतून किडे व वाळलेल्या वनस्पति मांडणें, ही त्या पदार्थांचें ज्ञान करून देण्यासाठीं केलेली निवळ खटपट आहे. तिच्या योगानें त्यांचें खरें ज्ञान होत नाहीं. ह्या प्राण्यांचे व वनस्पतींचे नेहमींचे व्यापार लक्षपूर्वक पहाणें, त्यांचा अन्योन्यसंबंध समजून घेणें, त्यांच्या उपजतबुद्धीचें स्वरूप ताडणें, सृष्टींतील निरनिराळ्या शक्तींशीं ते कसे वागतात व त्यांच्याशीं त्यांचा काय संबंध आहे ह्याचा शोध लावणें व अशा प्राण्यांस जगाचें स्वरूप कसें दिसतें हें उमजणें, हेंच वास्तविक जीवशास्त्राचें खरें हृद्गत होय; आणि प्राण्यांविषयीं एवढें ज्ञान आपणांस झालें असतां, कदाचित् ज्या इंद्रियांचा व ज्या इंद्रियानुभवाचा आपणांस बिलकुल पत्ता नाहीं त्याचा ठाव लागण्याचाहि संभव आहे. अशा दृष्टीनें पाहिलें तर मनुष्यमात्राच्या उन्नतीस व उत्कर्षास सीमाच नाहीं असें दिसतें.

हल्लीं मनुष्यमात्राची स्थिति निर्विवाद चांगली सुधारलेली आहे. मध्ययुगांत विद्वत्ता व आचारसौजन्य कांहीं कांहीं राजदरबारीं मात्र आढळून येत असे. इंग्रज, फ्रेंच, आणि जर्मन् लोकांचा त्या काळचा आयुष्यक्रम अगदीं रानटी मनुष्यासारखा असे. एकानें असें म्हटलें आहे कीं, हल्लीं युरोपांतील लोक आस्ट्रेलिया एथील रानटी लोकांपेक्षां जितक्या पटीनें श्रेष्ठ आहेत, तितक्याच पटीनें अथेन्स नगरांतील लोक हल्लींच्या लोकांहूनहि एकंदरीनें श्रेष्ठ होते. परंतु हें म्हणणें जरी खरें धरिलें, तरी युरोपांतील हल्लींच्या उत्कर्षाचा विस्तार दूरवर पोंचून, एकंदरीनें लोक निःसंशय उंच पायरीस चढले आहेत. ह्या मनूंत गद्यपद्यादिक ग्रंथ सर्वांस अवलोकनार्थ मिळतात, याचा हा परिणाम आहे. ह्या ग्रंथांची थोरवी मेकॉलेनें गाइली आहे. तो म्हणतो कीं, " हे ग्रंथ उत्तम व अतिशुद्ध अशा ज्ञानानें भरले असून आमच्या देशाचें ते चिरकाल राहणारें वैभव होत. हा ग्रंथसंग्रह अमोल सत्यज्ञानानें व कादंबऱ्यांनीं सुशोभित झाला आहे. त्यांतच सर्व कवींचा मुकुटमणी आणि सर्व तत्त्ववेत्त्यांचा अग्रणी, यांचे ग्रंथ आहेत व ह्याच ग्रंथसंग्रहानें आमच्या व्यापारापेक्षां व आमच्या बाहुबलपराक्रमाहून अधिक सुपरिणाम मनुष्यमात्राचे मनावर घडवून आणिला आहे. "

अशीं साधनें जवळ असूनहि, थोडेच लोक आपल्या मनाचा उत्कर्ष करून घेतात. शरीराची वाढ थोड्या वर्षांनीं खुंटते, परंतु आपल्या मनाची शक्ति जर आपण वाढवीत गेलों, तर ती मरेपर्यंत वाढतच जाते.

यापुढें मनुष्यमात्राची जी सुधारणा होणार आहे, ती

केवळ जडसृष्टीच्या निरनिराळ्या धर्मगुणांचा शोध लागू-न होईल असें नाहीं. हल्लीं मनुष्यमात्रहि ज्या मार्गानें मनाची उन्नति होऊन त्याची शक्ति वाढेल त्याच मार्गानें जात आहे. ज्या प्रश्नांचा निश्चितार्थ आज मनुष्याचे कल्पनेबाहेर आहे, त्याचें त्यास ज्ञान होऊन तो क्रमाक्रमानें पुढें पाऊल टाकील व त्याची मानसिकशक्ति वाढून त्याची नीतिमत्ताहि वृद्धिंगत होईल.

इंग्लंड देशाचें सौंदर्य, तेथील नगरांचा विस्तार, अवाढव्य व्यापार, संपत्ति व विशाल राज्यविस्तार या सर्वांचा इंग्रज लोक अत्यंत गर्व बाळगितात. परंतु देशाचा राज्यविस्तार मोठा असला व जमीन सुपीक असली, म्हणजे तो देश खरा भाग्यशाली असतो. असा नियम नाहीं; त्यांतील लोक जर नीतिमत्तेनें व बुद्धिमत्तेनें श्रेष्ठ असले, तर मात्र तो देश खरा श्रेष्ठ व खरा भाग्यशाली होय.

मनुष्याचा जितका उत्कर्ष होणें शक्य आहे तितका, श्रीमंत लोक घ्या अगर गरीब घ्या, थोड्यांनींच करून घेण्याचा प्रयत्न केला असेल. जर अंतःकरणपूर्वक यत्न केला, तर आपणास सर्व साधेल; कारण मनुष्यप्राणी असातसा नाहीं:—" परमेश्वरानें मनुष्य निर्माण करून, आपली अलौकिक कर्तबगारी दाखविली आहे ! मनुष्याची विचारशक्ति किती अगाध ! बुद्धि किती अमर्याद ! आणि आकृति व हालचाल किती रेखलेली व अद्भुत !! "[१]

आपल्या लोकांचा असा समज आहे कीं, जो प्राणी मरतो तो पुनः दुसऱ्या योनींत जन्म पावतो; जे ह्या जन्मीं पुण्याचरण ठेवितात त्यांचा श्रेष्ठ योनींत जन्म होतो,

१ शेक्सपिअर

व जे पापकर्मे करितात ते नीचावस्थेंत जन्म पावतात. आपल्या ह्या मतामुळेंच, सद्गुण संपादण्याची व सत्कृति करण्याची आपणांस बलवत्तर इच्छा होते. जरी भावी गतीविषयीं हें आपलें मत खरें नसलें, तरी निदान ह्या जन्मीं तरी त्याच्या सत्यत्वाचा आपणास प्रत्यय येतो. जर आपण एकादा दिवस सत्कर्मांत घालविला, तर दुसरे दिवशीं प्रातःकाळीं आदल्या दिवसासारखेंच सद्वर्तन ठेवण्यास आपण प्रवृत्त होऊं; परंतु जर आपण षड्रिपूंच्या आधीन झालों, तर अशी खूणगांठ घाला कीं, आपलें पाऊल मागें हटून आपण निश्चयेंकरून नीच पायरीस पोहोंचूं.

ज्या वेळेस सर्व राष्ट्राचें एकचित्त होऊन, एकादें कृत्य सर्व समाजाचे हातून केलें जातें, तो वेळ त्या राष्ट्राचा उदयकाल होय. देशाचा उदय म्हणजे थोड्या मोठ्या मनुष्यांचे यत्नानें सर्वथैव होतो असें नाहीं. परंतु ज्या वेळेस हजारों लहान लहान लोक असा यत्न करितात, म्हणजे सर्व राष्ट्र आपल्या उन्नतीकरितां यत्न करितें, तेव्हां त्याचा उत्कर्ष होतो. ह्या वरील सिद्धांतानें ज्या लोकांस ईश्वरानें मोठी बुद्धिमत्ता दिली नाहीं, त्यांसाहि उद्योग करण्यास उत्तेजन मिळतें. पुढें नमूद केलेल्या दोन ओळींत बोध केल्याप्रमाणें, पृथ्वीवरील प्रत्येक व्यक्तीची मनोवृत्ति झाली, तर काय चमत्कार होईल याचा विचार करा.

( श्लोकार्ध )

" सत्कर्मयोगें वय घालवावें,
सर्वां मुखीं मंगल बोलवावें. "

—रामदास

ह्या जन्मीं अनेक गूढ गोष्टी पदोपदीं आड येतात. ज्या जगतांत आपण रहातों, तें ह्या अनंत विश्वांत एका बिंदूसारखें सूक्ष्म आहे. एका व्यक्तीचीचशी काय, परंतु सर्व मनुष्यमात्रांचीहि आयुर्मर्यादा अनंत अशा काळांत एका पळाएवढी अल्प आहे. ह्या जगद्विस्ताराची उत्पत्ति कशी झाली, याची आपणांस कल्पना होत नाहीं व त्याचा शेवट कसा होणार याचें आपणांस आज अनुमान करितां येत नाहीं. परंतु ह्या सर्व प्रश्नांचा निश्चय करण्यास अमका एक मार्ग आहे. असें जरी आपणांस सांगतां येत नाहीं, तरी एवढें खरें कीं, जों जों आपल्या ज्ञानांत भर पडेल, तों तों ह्या सर्व प्रश्नांचा ज्या मार्गानें उलगडा होऊं शकेल, त्या मार्गांत आपलें पाऊल पुढेंच पडत जाईल. सुधारणा होते. ती कधीकधी मंद गतीनें व कधीं कधीं मोठ्या झपाट्यानें होते. दुसरे लोक सुधारतील, परंतु आपण जशाचे तसेच राहूं. असेंहि घडण्याचा संभव आहे. आपण जर झटलों नाहीं, तर आपला उत्कर्ष कधींहि होणार नाहीं, परंतु कसेंहि झालें तरी, कधीं ना कधीं तरी सर्वांचा उत्कर्ष होणारच आहे. कारण,—

( आर्या )

“ वैश्वानर दग्ध करी, भग्न करी खड्गघात सकलांतें;
परि उपजे मनुज मनीं, विचार कल्पांतिं भी न तो त्यातें. ”

—स्विन्बर्न

तेव्हां मनुष्यास उत्तमावस्था प्राप्त होईल अशी आशा करण्यास सबळ कारण आहे, आणि त्याच्या सद्गतीविषयीं मनन केलें म्हणजे तिला तर कोठे मर्यादाच दिसत नाहीं.

" कोठें इहलोकची विपत्ति आणि कोठें मुक्ताचें स्वर्गसुख ! दोहोंची तुलना करण्यास त्यांच्यांत यत्किंचित तरी साम्य असावयाचें होतें ! "

—रोमन्स

# प्रकरण २३

## सद्गति

एकंदर मनुष्यजातीचा उत्तरोत्तर उत्कर्षच होत जाणार, अशी दृढ आशा आपणांस आहे खरी; तरी व्यक्तीच्या दृष्टीनें पहातां, मनुष्य जसजसा वयातीत होतो तसतसा त्याचा उत्कर्षच होतो असें नाहीं. कारण आपणांस वृद्धापकाळानें गांठिलें म्हणजे, तारुण्यांत ज्या उपभोगांनीं मनास परमानंद होतो, त्यांविषयीं हळू हळू आपण उदासीन होत जातों. परंतु आपण आपल्या आयुष्याचा जर सदुपयोग केला असेल व तारुण्यांत शुद्धाचरण ठेविलें असेल, तर ज्या तारुण्यसुखास आपण अंतरतों त्याहूनहि उतारवयांत आपणास विशेष सुख होतें. जों जों शक्ति क्षीण होत जाते तों तों मेहनतीची आवश्यकता वाटेनाशी होते. मनाची आशा, हुरूप व उमेद जाऊन, त्यांच्या जागीं भोगिलेल्या सुखाचें सुखकर स्मरण येऊन बसतें. परंतु या स्मृतीपासून आपणास आनंद होणें अगर न होणें हें केवळ आपल्या पूर्ववर्तनावर अवलंबून राहतें.

वृद्धापकाळ येतांच ज्यांच्या जन्माचा बेरंग होतो, ज्यांच्या भोगेच्छा एकामागून एक लयास जातात व ज्या कांहीं शेष राहतात त्यांचीहि ज्यांस गोडी वाटत नाहीं, असे कांहीं लोक आढळतात. परंतु सर्वांच्याच जन्माचा शेवटीं असा वीट होतो असें नाहीं. कित्येकांस तर वृद्धापकाळीं अशी कांहीं शांतवृत्तीची जोड होते कीं, त्यांत सर्व नष्ट झालेल्या भोगेच्छांचा वचपा निघतो; इतकेंच

नव्हे तर, तारुण्यांत जें सुख झालें असेल त्याहूनहि विशेष सुखसमाधान होतें. तारुण्यांतील सुखें अधिक गोड वाटतात, परंतु त्या अवस्थेंतहि आपलें मन थोडें तरी चिंताग्रस्त अथवा अस्वस्थ असतेंच असतें. ज्या पुरुषानें परोपकारार्थ देह झिजविला आहे, त्या पुरुषास वृद्धापकालीं जो समाधानाचा व सुखाचा लाभ होतो, त्याची थोरवी व ऐश्वर्य, तारुण्योपभोगांस कधींहि येणार नाहीं. अंतकाळ हा सायंकाळचे समयासारखा आहे. दिवस बुडण्याचे सुमारास, आकाशांत प्रसंगीं ढग दृष्टीस पडतात; परंतु तेंच जर का निर्मळ असले, तर रमणीय रात्र पडते. तद्वतच अंतकालीं कधीं कधीं कष्ट होतात खरे; परंतु जर आचरण शुद्ध असेल, तर तोच अंतकाल शांत व सुखावह होतो.

पूर्ववयांत भोगिलेल्या सुखाचें स्मरण होऊन वृद्धापकालीं मनुष्यांस अत्यंत सुख होतें; "[1]कारण, आनंद हा इतका उत्कृष्ट असतो कीं, तो फार वेळ टिकत नाहीं. परंतु त्याचा प्रत्यक्ष अनुभव नाहींसा झाल्यावर त्याचें स्मरण परमावधीचें सुखकर होतें."

**स्विडेन्बर्ग** म्हणतो कीं, "स्वर्गांत वास करणारे देवदूत दिवसानुदिवस एकसारखे तारुण्याच्या ऐन भरांत येत असतात; म्हणजे ज्यांनीं या विश्वांत पुष्कळ दिवस घालविले आहेत ते खरोखर अत्यंत तरुण होत." ही **स्विडेन्बर्ग**ची कल्पना सत्य आहे, असें आपले कांहीं मित्र आपल्या प्रत्ययास आणून देतात. कारण, अशा मित्रांचें अंतःकरण लहान मुलांसारखें निर्मल व आनंदी असल्या-

१ मान्ट मासरी

मुलें, जेव्हां त्यांस पहावें तेव्हां ते आपले रंगेल ते रंगेल "त्यांच्या अखंड आनंदवृत्तीचा कालांतरानें ऱ्हास होत नाहीं, अगर अतिपरिचयानें ती फिकी पडत नाहीं."

सिसरो म्हणतो कीं, "वृद्धापकालाविषयीं जेव्हां मी विचार करितों, तेव्हां तो चार कारणांमुळें मला दुःखद वाटतो. पहिलें कारण, जरा आली म्हणजे नेहमींचा उद्योगधंदा सोडून द्यावा लागतो; दुसरें, शरीरशक्ति क्षीण होतात; तिसरें, सर्व भोगेच्छा नाहींशा होतात व चवथें,–वृद्धापकालीं मृत्यु समीप येऊन ठेपतो." हीं कारणें कितपत लक्ष देण्यासारखीं आहेत याचा आपण विचार करूं.

जन्मभर जो उद्योगधंदा पाठीस लागलेला असतो, त्याचें व्यवधान सुटणें व विश्रांति आणि आराम यांचा हक्कानें उपभोग घेण्यास सांपडणें, हें खरोखर कांहीं अनिष्ट नाहीं. दुसऱ्या आक्षेपासंबंधानें जें सांगावयाचें तें 'शरीरसंपत्ति' या प्रकरणांत सांगितलेंच आहे.

तिसरा आक्षेप असा आहे कीं वृद्धापकालीं वासनांचा लय होतो. –"अहाहा! तारुण्याचा जो मोठा दोष, तो जर म्हातारपणीं नाहींसा होत असला, तर वृद्धापकालाचा हा का सामान्य अधिकार आहे?" शिवाय उतारवयांत आपली सत्त्ववृत्ति दुर्बळच होते असा कांहीं नियम नाहीं; उलट, आपल्या तामसवृत्तींच्या मलानें दूषित झालेल्या सत्त्ववृत्तीचा मल झडून ती वृद्धापकालीं तर विशेष शुद्ध होते.

मनूनें म्हटलें आहे कीं,–

१ शेक्सपिअर

( श्लोक )

" एकः प्रजायते जंतुः, एक एव प्रलीयते;
एकोऽनुभुंक्ते सुकृतम् , एक एव च दुष्कृतं.
मृतं शरीरमुत्सृज्य काष्ठलोष्ठसमं क्षितौ,
विमुखा बांधवा यान्ति; धर्मस्तमनुगच्छति
तस्माद्धर्मं सहायार्थं नित्यं संचिनुयाच्छनैः
धर्मेण हि सहायेन तमस्तरति दुस्तरम "

**भावार्थः**—प्राणी एकटा जन्मास येतो व एकटाच मृत्यु पावतो; एकटाच पुण्याची फळें भोगितो. व पापाबद्दल दंड होतो तोहि एकट्यासच होतो. मरणानंतर त्याचे आप्तमित्र त्याचा देह एखाद्या लांकडाप्रमाणें किंवा मातीचे ढेकळाप्रमाणें जमिनीवर टाकून देऊन, पाठमोरे होऊन आपापल्या घरा जातात; एक धर्म मात्र त्याच्या बरोबर जातो. म्हणून जन्मास येऊन मनुष्यानें परलोकीं साहाय्य होण्याकरितां यथाशक्ति पुण्य जोडावें. म्हणजे मृत्यूनंतर दुस्तर अंधःकारांतून प्राणी पार पडेल

" पुण्यवान् पुरुष, वस्तुतः खऱ्या सूर्यापेक्षां महिम्यानें जास्त असा, जगांत दुसरा सूर्यच आहे असें म्हणतां येईल. त्याच्या अलौकिक मनाचा अपूर्व प्रकाश हाच काय तो विचार करण्यासारखा जगांत प्रकाश व अग्नि आहे."[1]

असल्या एका मार्गानें गेलें असतां निदान आपणांस सुख तरी होणार नाहीं, असें पुष्कळ लोकांस कळत असून ते त्या मार्गाचा जाणून बुजून स्वीकार करितात, ही आश्चर्याची गोष्ट नव्हे काय ? असे लोक स्वतःस सुख करून न घेतां, उलटें दुसऱ्यास दुःख देतात, हें मोठें नवल आहे. प्लेटोनें हें विधान स्पष्ट करून दाखविलें आहे. त्यानें मनुष्य हा तीन स्वभावधर्मांचा बनलेला एक प्राणी

१ इमरसन

आहे असें वर्णन करून, पंखांचे घोड्याची जोडी जोडलेला रथ व त्यावरील सारथी, यांशीं त्यानें साम्य कल्पिलें आहे. तो म्हणतो कीं,—" त्यांतील एक घोडा उमदा व अस्सल असून, दुसरा कमअस्सल व नाठाळ आहे. असली जोडी हांकणें म्हणजे सोपें काम नव्हे." त्या जोडींतील उत्तम घोडा तो रथ वर नेण्यास यत्न करितो व दुसरा नाठाळ घोडा त्यास खालीं ओढण्याकरितां धडपड करीत असतो. सारथी जर हुषार व दृढनिश्चयी असेल, तर कालगतीनें आपल्या स्वभावांतील उत्तम वृत्ति आपल्यास उत्तरोत्तर उन्नतावस्थेप्रतच नेऊन पोंचवितील.

शेलीचें म्हणणें आहे कीं, " मनुष्य हें एक तंतुवाद्य असून, त्यावर आंतून व बाहेरून नानाप्रकारच्या संस्कारांचे आघात होत असतात. व वाऱ्याच्या चंचल लहरी सारंगीवरून वहात गेल्या असतां जसे तींतून निरनिराळे मधुर स्वर निघतात त्याप्रमाणेंच मनुष्याचे मनांतून ह्या आघातांनीं मनोवृत्तिरूप मधुरस्वर उमटतात."

सिसरोचा शेवटचा आक्षेप असा आहे कीं, मृत्यु सन्निध येऊन ठेपतो, हा एक म्हातारपणाचा दोष आहे. पुष्कळ लोकांचे मनांत मृत्यूची कल्पना सतत जागृत असते, व त्यामुळें त्यांचा जन्म त्यांस गोड वाटत नाहीं. परंतु मृत्यु हें एक खरोखर मोठें संकट आहे, असें मानणें आपणास उचित आहे काय ?

" जीवित हा रंगीबेरंगी कांचेचा घुमट, अनंत अशा काळाच्या शुभ्र व शुद्ध प्रकाशाचे आड येऊन त्यास उणेपणा आणितो, परंतु शेवटीं मृत्यु त्यास पायाखालीं तु-

डवून त्याचे तुकडे तुकडे करून टाकितो" ह्या शैलीच्या म्हणण्यांत त्याची दोन प्रकारांनीं चुकी दिसते. मनुष्याची जीवयात्रा अनंत अशा काळाच्या रिक्ततेस उणेपणा आणिते असें कां म्हणून म्हणावें? तसेंच मृत्यूनें तिचा नाश होतो असेंहि निश्चयानें म्हणतां येणार नाहीं.

कोलरीज म्हणतो कीं मनुष्यास.

( श्लोक )

" प्रेमा, ज्ञान, विवेकशांति, मनुजा हे तीन देवें दिले,
याचे मित्र तसेचि तीन असती आजन्म त्या लाधले:-
प्राणी आपण आपुल्या प्रियजना, स्नेही जगन्नायक;
तैसा मृत्युहि मानवा सकलही निर्वाणचा रक्षक.

" मृत्यूनें सर्वांचा शेवट होतो. व पुष्कळांस तो विपत्तीपासून मुक्त करितो; त्याची बहुत लोक इच्छा करितात व जीविताचा वीट येऊन आतां मृत्यु आला असतां बरा अशी वृत्ति होण्यापूर्वीं ज्यांस तो प्राप्त होतो, त्यांजवर त्याचें जितकें उपकाराचें ओझें होतें तितकें इतरांवर होत नाहीं.

ज्यांचें आयुष्य या जगांतील उत्पातांनीं व्यापून गेलें असतें त्यांस मृत्यूबरोबर स्वास्थ्य प्राप्त होतें. शेक्स्पिअरच्या पुढील उक्तीचा भावार्थ हाच आहे:- " डंकन हल्लीं स्मशानभूमींत स्वस्थ निजला आहे व जन्माच्या तापत्रयांतून मुक्त होऊन तो गाढनिद्रासुख अनुभवीत आहे. त्याच्या राजद्रोही वैऱ्यांनीं जेवढी त्याची हानि करावयाची तेवढी केली आहे. आतां शस्त्रें, विष, स्वराष्ट्रां-

१ सेनेका

तील मत्सर, व परचक्र यांजपैकीं कांहींहि त्यास अपाय करूं शकणार नाहीं."

मृत्यूनें सर्वांचा जर शेवटच होत असेल, तर आपण मृत झालों असें कोणास कधींहि कळून येणार नाहीं. बऱ्याच लोकांचा असा समज आहे कीं, "ज्या ठिकाणाचा कोणास कधीं थांग लागला नाहीं व जो म्हणून प्रवासी त्यांत शिरला तो कधीं माघाराहि आला नाहीं" अशा परलोकाची यात्रा कष्टमय व दुःखद असावी. परंतु वस्तुतः ही गोष्ट खरी नाहीं. कारण कित्येक लोकांचें चित्त मरणसमयीं शांत राहतें; व त्यांस क्लेश होतात असें दिसण्यांतहि येत नाहीं.

बिड हा आपल्या शेवटच्या दुखण्यांत बायबलाचा इंग्रजींत तर्जुमा करीत होता. मरणाचे दिवशीं सकाळीं त्याचा लेखक त्याचा फारच शक्तिपात झाला असें पाहून त्यास म्हणाला कीं, "अजून एक अध्याय भाषांतर करावयाचा राहिला आहे व आपल्यास तर बोलण्याचीहि शक्ति राहिली नाहीं." बिड म्हणाला, "तें काम फार अवघड नाहीं; एवढें मात्र कर कीं तुझ्यानें जितकें जलद लिहवेल तितकें जलद लिही." अध्याय संपल्यावर तो लेखक बोलला, "महाराज! ग्रंथ समाप्त झाला." त्यावर बिड म्हणतो, "तूं सत्य बोललास; सर्व ग्रंथ आटोपला खरा." नंतर त्याच्या इच्छेप्रमाणें नेहमींच्या प्रार्थना करण्याचे जागीं त्यास नेऊन बसविल्यावर, 'देवाचा जयजयकार असो' असें म्हणून त्यानें प्राण सोडिला.

गेटी हा, वसंतऋतु आला म्हणून आनंद प्रदर्शित

१ शेक्सपिअर

करून कांहीं लिहिण्याच्या तयारींत असतां, यातना न होतां मृत्यु पावला.

मोझार्टच्या मृत्यूबद्दलहि अशीच कथा सांगतात कीं, एक अपुरें गीत त्याचे बिछान्यावर पडलें होतें; त्यांत स्वरांची कांहीं विशेष खुबी करण्याच्या योजनेंत तो गुंतला असतां आपल्या बायकोच्या मांडीवर डोकें ठेवून मरण पावला.

प्लेटोचें देहावसान, लिहीत असतांना झालें. ल्यूकन् आपल्या एका पुस्तकांतील वेंचे वाचून दाखवीत असतां मरण पावला. ब्लेकचें गातांना, व वॉगनरचें झोंपेमध्यें देहावसान झालें. पुष्कळ लोक झोंपेमध्यें इहलोक सोडून गेले आहेत. ज्यांचें मरण अगदीं जवळ आलें आहे, अशा लोकांस क्वचितच भीति अगर दुःख वाटतें, असा बहुत वैद्यांनीं आपला अनुभव सांगितला आहे. ज्या लोकांस लढाई वगैरे प्रसंगीं अपघातानें एकाएकीं मृत्यु येतो, त्यांस मरणसमयीं मुळींच यातना होत नसतील, असाहि संभव आहे.

एथवर सर्व चर्चा इहलोकसंबंधानें झाली. परंतु परलोकसंबंधी विचार काय ? परलोकासंबंधानें मुख्यतः दोन प्रकारचीं मतें रूढ आहेत असें म्हटलें असतां चालेल. कांहीं लोक आत्मा अविनाशी आहे परंतु जीवात्मा नित्य नाहीं, असें म्हणतात. आपलें जीवित आपल्या संततीरूपानें पुढेंहि सतत चालतें. हें प्रमेय, " गव्हाचा दाणा पुढील वर्षाचे गव्हाचे रोपांत दृष्टिगोचर होतो " ह्या सेंट्पालचे उपमेंतून सहज निघतें.

जोंपर्यंत या जगांत सुख म्हणून आहे, तोंपर्यंत आ-

पल्यास त्याचा कितवा वांटा मिळेल, ह्याचा विचार करणें हा निवळ स्वार्थ आहे. आत्मा नित्य आहे परंतु त्यास मागल्या जन्मींचें यत्किंचित्‌हि स्मरण रहात नाहीं, असें गृहीत केल्यास. आपल्या जीवात्म्याची अगर इतर जीवात्म्यांची पुढें गति काय होते, ह्याचा विचार करण्यांत मोठीशी फलश्रुति नाहीं. कसेंहि असो, एकंदर सर्वसाधारण लोकांची अशी समजूत आहे कीं, आत्मा जरी देहपाशांतून मुक्त झाला, तरी अंतर्यामीं त्याची त्यास पुढेंहि ओळख रहाते, व जसें झोंपेंतून जागृत व्हावें तसा तो मृत्यूनंतर जागा होतो. " कोट्यवधि आत्मे वायुरूपानें आपण जागे अथवा निद्रित असतांना, पृथ्वीवर संचार करितात " असें जरी आपणांस म्हणतां येणार नाहीं, तरी आकाशांत कोठें तरी त्यांचें वास्तव्य असलेंच पाहिजे; व जेव्हां आपण तारांकडे पहातों तेव्हां ते जरी आपणांस दृष्टिगोचर होत नाहींत, तरी आपण त्यांकडे पहात असतों. कोणत्याहि दृष्टीनें पाहिलें तरी मृत्यु हें दुर्दैव मानितां येत नाहीं. काळानें शक्ति क्षीण होऊं नये व शरीरसंपत्ति नेहमीं जशीच्या तशी कायम रहावी अशी इच्छा करणें ही गोष्ट अगदीं स्वतंत्र आहे.

जर अमर होणें आपल्या नशीबीं नसलें, तर यथाकालीं आपणास मृत्यु यावा हें इष्ट आहे. म्हणून—

( श्लोक )

" नाभिनन्देत मरणं, नाभिनन्देत जीवितं;
कालमेव प्रतीक्षेत निर्देशं भृतको यथा. "

—मनु

१ मिल्टन्

**भावार्थः**—मनुष्यानें आपण होऊन मरणाची किंवा जीविताची इच्छा करूं नये; तर स्वाभाविक प्राप्त होणारा जो मरणकाल त्याची, जसा सेवक आपल्या हुकुमाची प्रतीक्षा करितो तशी, वाट पहावी.

सृष्टिनियमानें सर्व वस्तूंची कालमर्यादा नियमित झालेली आहे; त्याचप्रमाणें मनुष्याचे आयुष्यालाहि मर्यादा आहे. ह्या जन्मरूपी नाटकाचा, वृद्धापकाल हा शेवटचा प्रवेश होय. ज्या वेळेस वृद्धावस्थेंत मनुष्याचा शक्तिपात होऊन मन उदास होतें, व विशेषकरून जेव्हां हा जन्म पुरेपुरेसा होऊन जीवाचा कंटाळा येतो, तेव्हां तर ही इहलोकयात्रा संपावी हें इष्ट आहेच आहे. अशा दृष्टीनें पाहिलें असतां आपण मृतप्राणमात्राबद्दल जो शोक करितों तो वाजवी नाहीं. कारण

( श्लोक )

" मरणं प्रकृतिः शरीरिणां, विकृतिर्जीवितमुच्यते बुधैः ।
क्षणमप्यवतिष्ठते श्वसन , यदि जन्तुर्ननु लाभवानसौ ॥ "

**कालिदास**

**भावार्थः**—मरण ही प्राणिमात्राची प्रकृति ( ठरलेली गोष्ट ) आहे; जिवंत राहणें हें मात्र विकृतिरूप ( अनियमित ) आहे. करितां प्राणी क्षणभर जरी वांचला, तरी त्यास तो मोठा लाभच झाला, असें म्हटलें पाहिजे.

अथवा—

( श्लोक )

" वासांसि जीर्णानि यथा विहाय नवानि गृह्णाति नरोऽपराणि ।
तथा शरीराणि विहाय जीर्णान्यन्यानि संयाति नवानि देही ॥ "

**—श्रीमद्भगवद्गीता**

( ओंवी )

" जैसें जीर्ण वस्त्र सांडिजे, मग नूतन वेढिजे,
तैसें देहांतरातें स्वीकारिजे, चैतन्यनाथें. "

—ज्ञानेश्वर

अथवा—

( श्लोक )

" नको शोक मानूं जरी मृत्यु आला,
जग अश्रुचा आटुनी शुष्क झाला;
न जाणो मृता लाभलें सौख्य फार,
करी सद्गति, स्वर्गधामीं विहार."

ह्या संसारांतून श्रान्त झालेले कित्येक लोक खालीं लिहिलेल्या पद्यांतील विचार मोठ्या उल्हासानें मनांत घोळीत असतात :—

( ओंव्या )

" अल्प उरला जन्म-आयास, अल्प तैसे विरहक्लेश,
अल्प दुःखद प्रवास, शोकान्त येत समीप;
शीघ्र जाऊं सुखधामा, अखंड भोगूं विश्रामा,
तेथं आतां शोकग्रासा; सुकाळ जवळीं आलासे."

जसें निद्रेंतून जागें व्हावें, तसा मृत्यु आला असतां संसाररूप निद्रेंतून प्राणी जागृत होऊन भवबंधनापासून मुक्त होतो, असें कवि शेलीनें[1] म्हटलें आहे.

( श्लोक )

" निद्रा त्यागि न आलि; सोडुनि न हा गेला जगाभीतरी;
झाला जागृत, सुप्ति जीवित निकें, जाणा असें अंतरीं;
शोका कां करितां? सुसाध्य करि हा धामा तमापारच्या;
तुम्हीं मात्र फसूनिया भ्रमतसा या भोंवरीं आयुच्या."

परंतु, हा जन्म केवळ स्वप्नवत् असून, तो पूर्ण ज्ञा-

१ शेक्सपिअर

ल्यावर जीवात्म्यास गाढ निद्रा लागते " असें मानण्याकडे कित्येक लोकांची प्रवृत्ति होत नाहीं.

तथापि बहुतेकांचें असें मत आहे कीं, देहबंधनापासून मृत्यु आपणांस सोडवितो, व आपल्या पापपुण्याचा झाडा होण्याकरितां ईश्वराचे न्यायासनासमोर उभें करितो. सारांश, ज्यास आपण मृत्यु समजतों तो मृत्यु नाहीं, तर स्वर्गसुखाचें द्वारच आहे.

( श्लोक )

" अवगच्छति मूढचेतनः प्रियनाशं हृदि शल्यमर्पितम्;
स्थिरधीस्तु तदेव मन्यते, कुशलद्वारतया समुद्धृतम्. "

---कालिदास

**भावार्थः**—मूढ माणसास आपल्या प्रिय मनुष्याचा मृत्यु हृदयांत भाला टोंचल्याप्रमाणें दुःखदायक होतो. परंतु विचारी जनास तोच दुःख हलका करणारा वाटतो. कारण, मृत्यु हा आपले प्रिय माणसास अखंड सुखाचें द्वार मोकळें करून देतो.

आपण जिवंत आहों तोंपर्यंत देही आहों; तेच मरणानंतर विदेही आत्मे होतों. एपिक्टिटस म्हणत असे कीं, " मी एक प्रेत वाहणारा आत्मा आहें. " अजरामर आत्म्याचा शरीर हा केवळ नाशवंत व दृश्य असा एक आकार आहे. आत्म्यास मरणोत्तर सद्गति आहे असें मानिल्याशिवाय सर्व ईश्वरकरणी न्याय्य आहे असें म्हणतां येत नाहीं. कोणत्याहि दृष्टीनें पाहिलें तरी जराग्रस्तांना मृत्यु हीच मुक्ति होय. ख्रिस्ती धर्मांत ख्रिस्त म्हणतो " मी आपला शांतिप्रसाद तुम्हांस देतों; पण माझा प्रसाद जगांतील शांतीसारखा नाहीं, हें लक्षांत आणा. " जेथे " दुष्टांकडून आपला छल होत नाहीं व श्रांत झालेले

प्राणी आराम पावतात, तें स्थान स्वर्ग होय " असें ख्रिस्ती धर्मांत स्वर्गाचें वर्णन केलें आहे. परंतु स्वर्गसुखाचें स्वरूप तरी काय असावें? आपणास इतकेंच ठावकें आहे कीं,–

( आर्या )

" स्वर्गी निवास जोडिति, जे आत्मे, पुण्यराशि, साधु, खरे,
अन्योन्य प्रेमाकुल होतां, गाती सदैव मोदभरें. "

—वॉलर

स्वर्गांतहि जर एथल्यासारखा जीवनकलह असेल, तर स्वर्गांत काय आणि इहलोकीं काय, कोठेहि आपण असलों तरी सारखेंच. कारण इहलोकीं आपण सुखसमाधानानें राहिलों, तर ही पृथ्वी काय सुंदर कमी आहे? तथापि, केवळ शांतरीतीनें व समाधानानें, अथवा जडपदार्थाप्रमाणें, स्थिरपणें सदैव राहणें आनंदप्रद होणार नाहीं, व असें अस्तित्व दुःसहहि होईल. शिवाय स्वर्गांत देखील नेहमींच्या क्रमांत वारंवार बदल झाल्यास, जी मनास व्यग्रता येईल, ती पूर्णसुखोपभोगांत एक उणेंपणाच आहे. तथापि, त्याच स्वर्गांत अनंतकाळपर्यंत त्याच त्या सुखाचा पुनःपुनः उपभोग घेणें, यासारखी कंटाळवाणी अवस्था दुसरी कोणती नाहीं; कारण, अनंतकालपर्यंत आत्म्यास नेहमीं नवीन आनंद होण्यासारखी परमेश्वरानें स्वर्गी योजना केली असेल कीं नाहीं, असें राहून राहून मन साशंक होतें.

( श्लोक )

" विटुनि विलया जाई जी का त्वरें, क्षणभंगुरा,
अखिल नटवी शोभे भारी जगत्पति, ती धरा;
सकल नयना तोषायातें, करी अशि योजना;
निरखुनि तया शंका ग्रासी क्षणोक्षणिं या मनाः—"

" जगें बहु चिरायु जीं रचिलिं ईशसत्ताबळें;
तयांत रिघतां जिवा नयन दिव्य जे लाभले;
तयासि रिझवावया नवीन काय, हो ! निर्मिले,
अखंड रमणीय जें भुवन, त्याहुनी आगळें ? "

—ट्रेंच[1]

परंतु पदार्थविज्ञानशास्त्राकडे दृष्टि पोंचविली असतां, ह्या सर्व शंकांचें समाधान होण्यासारखें आहे; कारण, इहलोकीं आपणास बुचकळ्यांत पाडणाऱ्या गूढांचा स्वर्गांत निर्णय होऊन अखंडसुख होणार नाहीं कशावरून? तेथें आपणांस नवीन कल्पनांचा लाभ होईल. प्राचीन काळचा हल्लीं उपलब्ध नसणारा इतिहास समजेल व जगांतील नानाविध प्राण्यांचें व वनस्पतींचें ज्ञान होईल. अंतरिक्षांतील अनंत रहस्यें कळतील, अमित तारांचे चमत्कार व त्यापलीकडील आकाशप्रदेशांतील अद्भुत नवल दृष्टीस पडेल. फार तर काय, परंतु जी आपली पृथ्वी असंख्य तारांपैकीं एक आहे, त्यांतील अनेक सुंदर स्थळांची सर्वांबरोबर आपणांस माहिती होईल, ही काय अल्प गोष्ट आहे ? जेव्हां मी रात्रीं आकाशांतील सहस्रावधि तारांकडे दृष्टि लावून बसतों, तेव्हां कायाहीन होऊन मला त्या तारांवर हिंडतां येणें माझ्या नशीबीं आहे कीं नाहीं, असा विचार माझ्या आश्चर्यानें थक्क झालेल्या मनांत उद्भवतो. तेव्हां स्वर्गांत अनंतसुखोपभोगाचीं साधनें आहेत असें सिद्ध होतें व आलेल्या शंकांचेंहि समाधान होतें. परंतु इतकें करूनहि एक शेवटची शंका राहते ती राहतेच. ती ही कीं, " असें जें अमित स्वर्गसुख

१ ट्रेंच

त्याचा यथासांग व पूर्ण उपभोग घेण्यास, जरी आपणास चिरायु बनविलें, तरी अनंतकाल पुरेसा होईल काय?"

असो; "तापसी, धर्मवादी अथवा धर्माकरितां प्राण देणारे व दुसऱ्यांचा घेणारे, इत्यादिकांनीं मानिलेल्या स्वर्गांत देवानें माझी योजना केली नाहीं. जो स्वर्ग शुद्ध व नित्य प्रेमानें निरंतर पूर्ण भरला आहे व जेथे उज्ज्वल ज्ञानाचा वास असून तें साद्यंत आकळितां येईल अशी अमर्याद बुद्धिमत्ता आपणांस प्राप्त होते. जेथे आपल्या ममतेचीं माणसें नेहमीं आपल्या भोंवतीं असतात, जेथे त्या माणसांचा व आपला कधीं बेबनाव होत नाहीं व आपणहि त्यांस दुःख देत नाहीं, जेथे आपणांस महत्कार्य करावयाचें आहे व तें करण्यासारखें आपल्या अंगीं बुद्धिबलहि निपजतें, व जेथे सर्व गुह्य गोष्टींचा निर्णय व सर्व मनोरथांची इष्टसिद्धि झाल्याशिवाय राहत नाहीं, असा स्वर्ग ईश्वरानें मजकरितां राखून ठेविला आहे."

"ह्या कष्टमय व कलुषित इहलोकाचा संबंध तुटून ज्या दिवशीं मी स्वर्गवासी मुक्तजनांचे मेळ्यांत जाईन, तो दिवस महद्भाग्याचा होय! कारण, तेथे सर्व सत्पुरुषांची व माझी भेट होईल, इतकेंच नव्हे तर, माझ्या प्रियकर केटोलाहि मी भेटेन. कारण, त्या केटोसारखा सज्जन व दृढप्रेम करणारा गृहस्थ आजपर्यंत जगांत झालाच नाहीं. मी अगोदर मरून ज्यानें माझें उत्तरकार्य करावयाचें, त्यासच अग्नि देण्याचें माझ्या नशीबीं आलें. परंतु तो जेव्हां गेला, तेव्हां त्याचा आत्मा मला विसंबला नाहीं. तो जातांना वारंवार मजकडे उलटून पाही, व ज्या लोकीं आ-

१ प्रेग   २ सिसरो

पणा सर्वांस जावयाचें आहे, तेथे मलाहि कधीं तरी जावेंच लागणार, असें जाणून त्यानें मला शेवटीं सोडिलें. ह्या वियोगामुळें मला अत्यंत दुःख झालें खरें, परंतु मीं तें मोठ्या शांतपणानें सहन करून व हा वियोग फार दिवस राहणार नाहीं आणि माझा मित्र मजपासून फार दूरहि नाहीं असें समजून, मीं आपलें समाधान करून घेतलें आहे. आतां केटोची व माझी लवकरच गांठ पडणार, म्हणून मला वृद्धापकाळ दुःसह वाटत नाहीं. त्यापासून क्लेश होत नाहींत ते नाहींत. परंतु उलटा तो मला आनंदकारक भासतो.

मनुष्याचा आत्मा अमर आहे ही माझी समजूत जरी मिथ्या असली, तरीहि हा माझा भ्रम मी खुषीनें पाळीन; व माझ्या कुडींत जीव आहे तोंपर्यंत तो दूर व्हावा, अशी इच्छाहि करणार नाहीं, आणि कांहीं अप्रबुद्ध लोकांनीं मानिल्याप्रमाणें, जरी कदाचित् मेल्यावर मला पूर्वजन्मींचें कांहींच ज्ञान राहिलें नाहीं, तरी ह्या लोकांपैकीं मृत झालेले तत्त्वज्ञ, माझ्या भ्रममूलक समजुतीचा उपहास करितील अशी मला भीति बाळगण्याचें कारणहि राहत नाहीं.

हाच महाज्ञानी पुरुष एके ठिकाणीं मरणाविषयीं उल्लेख करितांना म्हणतोः–" मृत्यु इष्टच आहे, असें मानण्यास सबळ कारणें आहेत. मृत्यूनंतर मनुष्यास एक तर शून्यावस्था प्राप्त होऊन सर्व ज्ञान नष्ट होतें, अथवा आपलें स्थित्यंतर होऊन आत्मा हें जगत् सोडितो व दुसऱ्या जगतांत वास करण्यास जातो. जर मृत्यूनंतर सर्व ज्ञान नाहींसें होऊन जशी आपणास गाढ निद्रा येते

तशी आत्म्यासहि येत असली, तर मृत्यु हा अवर्णनीय लाभ होय. कारण, ज्या रात्रीं गाढ निद्रा लागते, त्यांची इतर रात्रींशीं तुलना करून पाहिली, तर केवळ गोरगरीबच काय परंतु सत्ताधीश राजे देखील कबूल करितील कीं, आम्हीं ज्या रात्रीं गाढनिद्रावश झालों आहों, अशा सुखकर रात्री आमच्या सर्व हयातींत थोड्याच असतील. तेव्हां मृत्यु ही जर खरोखर गाढनिद्रा असेल, तर तो एक लाभच समजावा. कारण, अनंतकाल ही एक लांबच लांब रात्र आहे. हा एक विचार झाला. आतां ज्या ठिकाणीं आजपर्यंत मृत झालेले सर्व प्राणी वास करीत आहेत, अशा जगांत, आपलें देहावसान झाल्यावर जर आपला आत्माहि जाईल, तर मृत्यूपेक्षां अधिक लाभ तो कोणता ? ह्या नवीन जगांत अवतीर्ण झाल्यावर, इहलोकच्या खोट्या न्यायाधीशांच्या हातून सुटका होऊन, स्वर्गांत सत्यप्रिय न्यायाधीशांकडून आपल्या पापपुण्याची झडती होईल. कारण, ज्यांनीं इहलोकीं सदाचरणानें वागून बहुत पुण्य संपादन केलें आहे, असे देवाचे प्यार पुत्र स्वर्गीं न्यायाधीश आहेत. तेव्हां, अशा स्थानीं आपला वास होणें, हें आपलें महद्भाग्यच होय. जर एकाद्यास आजपर्यंत पृथ्वीवर येऊन गेलेल्या महात्म्यांशीं तेथे भाषण करण्यास सांपडेल, तर त्याकरितां तो सर्वांवर पाणी सोडणार नाहीं काय ? मी म्हणतों हें जर सर्व सत्य असेल, तर मग मला वारंवार मृत्यु येवो ! मला स्वर्गलाभ झाल्यावर, ज्यांस इहलोकीं अन्यायानें देहदंड भोगावा लागला अशा प्राचीनकाळच्या वीरपुरुषांना भेटून त्यांशीं जर भाषण करण्यास सांपडलें आणि माझें

स्वतःचें दुःख त्यांच्या दुःखाशीं तोलून पहातां आलें, तर मला मोठा आनंद होईल; शिवाय, तेथे खरा ज्ञानी कोण व ज्ञानाचा नुसता आव घालणारे कोण, याचा निर्णय करण्याचीहि मला संधी मिळेल. अशा स्वर्गांत कोणी कसलाहि प्रश्न केला, तरी जसें तुम्हीं एथे मला शासन करीत आहां, तसें तेथे होत नाहीं; तेथे प्राण्यास नुसतें अत्यंत सुखच होतें असें नाहीं, तर ते अमरहि होतात.

"हे न्यायाधीशहो. तुम्हीं जें करीत आहां त्याविषयीं अगदीं शंका बाळगूं नका. बेलाशक करा; कारण, सत्पुरुषास जिवंत असतां अगर मरणानंतर कसलाहि कधीं अपाय होत नाहीं. तो व त्याचे इष्टमित्र यांजकडे देव कधीं दुर्लक्ष करीत नाहीं. माझा अंतकाळ एकाएकीं जवळ आला आहे, असें नाहीं; कारण. मला मरण येऊन या भवतापांतून मीं मुक्त व्हावें. हें माझ्या हिताचेंच आहे, आणि म्हणूनच मजवर दोषारोप करणारांवर व मला देहान्त दंड ठरविणारांवर मी राग धरीत नाहीं. त्यांनीं माझें कांहीं वावगें केलें नाहीं; मात्र माझें बरें व्हावें. अशी त्यांची मुळींच इच्छा नाहीं, म्हणून मी त्यांचा नुसत्या सौम्य शब्दांनीं निषेध करीन. माझा प्रस्थानकाल समीप आला आहे. आतां तुम्हीं आम्हीं आपापल्या मार्गानें जाणार आहों. मी मरण्यास जाणार; तुम्हीं इहलोकीं जिवंत राहणार. परंतु आपणांपैकीं कोणाची अवस्था चांगली हें एक परमेश्वर जाणे."

**सालोमन**चींहि ह्या विषयासंबंधानें फारच बोधपर वचनें आहेत:—

"पुण्यवान् प्राण्यांचे आत्मे ईश्वराचे सन्निध अस-

तात, व त्यांस कोणत्याहि उपाधींचा उपसर्ग देखील लागत नाहीं.

" हे पुण्यवान् प्राणी मृत्यु पावतात, व त्यांचा वियोग, ही एक विपत्तिच आहे, असें मूढ लोक मात्र समजतात.

" ते आपणांस सोडून गेले म्हणजे त्यांचा नाश झाला असें अज्ञ लोक मानितात, परंतु खरोखर पाहतां ते अखंड शांतिसुख जोडितात.

" त्यांस मृत्यु हें शासन होतें असें मनुष्याच्या दृष्टीस जरी भासलें, तरी ते अमर होतात.

" परमेश्वर अशा पुण्यशील प्राण्यांस अल्पस्वल्प दुःख देऊन कसोटीस लावून पाहतो व ते त्याच्या कसोटीस उतरले म्हणजे त्यांजवर मोठी कृपा करून त्यांस आपल्या सन्निध घेतो."

जर मरणकालीं दुष्कृत्यांबद्दल आपलें अंतःकरण आपणांस खात नसलें, तर आपणांस यत्किंचित् सुद्धां काळजी नको. व मरणानंतर आपली गति काय होणार, हें जरी निश्चयानें सांगतां येत नाहीं, तरी सद्गतीविषयीं आपण निराश होण्याचें कारण नाहीं. इहलोकींचा झगडा आटोपून, " ज्या ठिकाणीं दुष्ट लोकांच्या चेष्टा नाहींशा होतात आणि भागलेल्यांस विश्रांति मिळते, अशा ठिकाणीं जातांना —

( श्लोकार्ध )

" आहे कोठें मृत्यु ! तुझा तडाका ?
कोठें आहे श्री तुझी मृत्युलोका ? "

असें मोठ्या अभिमानानें म्हणण्यास, आपणांस मुळींच भीति वाटूं नये.

ज्यांचे गुणानुवाद आपण नुमते ऐकिले आहेत, ज्यांचे ग्रंथ वाचून आपण आनंद पावलों आहों, व ज्यांवर आपलें प्रेम आहे परंतु ज्यांचा आपणांस ह्या लोकीं वियोग घडला आहे, अशा सर्वांची व आपली ज्या स्वर्गांत गांठ पडेल, त्या स्वर्गांत सर्वशक्तिमान् व चराचरवत्सल पित्याचे कृपालुत्वावर, मोठ्या नम्रतेनें परंतु दृढ आशेनें भाव ठेवून, जेव्हां आपण प्रवेश करूं, सर्व ऐहिक बंधनांतून व तापांतून मुक्त होऊं, आणि देवदूत व इतर स्वर्गवासी पुण्यात्म्यांचे मेळ्यांत मिसळूं, तेव्हां मात्र खरोखर सर्व ऐहिक सुखें व उपभोग, स्वर्गांतील आपल्या धामीं प्राप्त होणाऱ्या चिरकाल सुखांपुढें आपणांस निर्माल्यवत् वाटतील.